न्या आंतड्यावर किती उत्तम परिणाम होतो, ही आश्चर्य वाटण्यासारखी गोष्ट आहे. कारण जी गोष्ट अंधाऱ्या व कोंदट हवेच्या शौचकूपांत कोणत्याही उपायांनीं साध्य होत नाहीं, ती उघड्या हवेंत सहज साध्य होते.

---

## भाग १४ वा.

### उष्ण हवेच्या देशामध्यें व कांहीं विशिष्ट हवेमुळें होणारे ताप.

### मलेरिया, पित्तज्वर, पीतज्वर व हींव.

ताप कोणत्याही प्रकारचा असो, त्याचें मूळकारण एकच आहे; हें कारण ह्मणजे शरीरांतील विजातीय द्रव्य नासणें हें होय. विजातीय द्रव्य नासण्याचें मुख्य कारण हवेच्या उष्णमानामध्यें एकाएकीं पडणारा फरक हें होय. असा फरक उष्ण कटिबंधामधील प्रदेशांतील हवेमध्यें फार असतो. या कारणामुळें तेथें विजातीय द्रव्य नासण्याचा व अर्थात् ज्वर येण्याचा संभव फार असतो, व ज्या प्रमाणानें विजातीय द्रव्य नासण्याची क्रिया जोरानें चालते, त्या मानानें ज्वर अधिक असतो. ज्या मनुष्याच्या शरीरांत विजातीय द्रव्य अगदीं थोडें असेल, अशा मनुष्यासही उष्णकटिबंधांतील देशामध्यें ज्वर येईल. असा प्रकार समशीतोष्ण कटिबंधांतील देशामध्यें घडून येत नाहीं. उष्णकटिबंधांतील प्रदेशांत जो ज्वर सामान्यतः येतो, त्याचे अनेक प्रकार आहेत. या सर्व प्रकारांमध्यें पीतज्वर अथवा पिंवळा ताप हा फार भयंकर आहे. या ज्वरास पिंवळा ताप हें नांव देण्याचें कारण असें आहे कीं, हा ज्वर झाला असतां, कांहीं दिवसांनीं अंग पिंवळें पडतें. त्वचेच्या वर्णामध्यें पडणारा अशा प्रकारचा फरक कदाचित्, या तापावर जीं औषधें देण्यांत येतात, त्यांमुळें होत असेल. या तापाचीं प्रथम लक्षणें येणेंप्रमाणें आहेतः-धकवा, डोकें दुखणें, पोटांत मुरडा करणें, शोष, त्वचा कोरडी व खरखरीत होणें. नंतर कांहीं वेळानें शौचास काळा मळ पडूं लागतो,

व ओकाऱ्या येऊन तोंडांतून काळे वेडके-वटक पडतात, व नंतर त्वचा पिंपळ्या रंगाची होते. कित्येक वेळां रोगी मेल्यानंतर त्वचा पिंवळी पडते.

असा हा भयंकर ताप प्रथम उत्पन्नच होणार नाहीं, अशी तजवीज करणें ही महत्त्वाची गोष्ट आहे. असें करण्यास आपणांजवळ साधनेंही आहेत. हीं साधनें ह्मणजे, मांसाहार वर्ज करून, आपण ज्या प्रदेशांत राहतों, त्या देशांत उत्पन्न होणाऱ्या अनुत्तेजक अशा पदार्थांचा नियमित आहार करणें, शरीराचे सर्व व्यापार सृष्टिनियमास अनुसरून करणें, व शीतस्नानें करणें, येणेंप्रमाणें आहेत. ह्या स्नानाकारितां समशीतोष्णकटिबंधांतील देशांइतकें उष्णकटिबंधांतील देशांत गार पाणी मिळत नाहीं. हें खरें; परंतु समशीतोष्णकटिबंधामध्यें हवेचें उष्णतामान व पाण्याचें उष्णतामान यांमध्यें जें प्रमाण असतें, तेंच उष्णकटिबंधामध्येंही असतें. यामुळें उष्णकटिबंधातील प्रदेशांत पाणी जितकें स्वाभाविकपणें थंड असतें तितकें चालतें. त्याप्रमाणेंच अशा देशांमध्यें ज्या उष्णतेमुळें शरीरांतील दोषिक द्रव्य नासतें; तीच उष्णता ज्वर अथवा दुसरा कोणताही विकार बरा करण्यास साहाय्यभूत होते; कारण अशा देशांमध्यें शीतस्नान झाल्यानंतर शरीरास ऊब आणण्याची व घाम आणण्याची क्रिया समशीतोष्णकटिबंधांतील देशापेक्षां लवकर घडते. कोयनेल अँटिपायरिन् ( घाम आणून ज्वर घालविणारें ज्वरनाशक-औषध ) व ज्ञानतंतूंचें चैतन्य नष्ट करणारी·शक्ति क्षीण-करणारीं अन्य औषधें, डाक्टर लोक ज्वरावर देतात. परंतु या औषधांपासून कोणताही ज्वर वास्तविकपणें बरा होणें अशक्य आहे, हें लोकांनीं ध्यानांत ठेवावें. या औषधासंबंधानें असें होतें कीं, एकदां ज्या प्रमाणानें औषध बरेच दिवसपर्यंत दिलें आहे, त्याच प्रमाणानें औषध देत गेल्यास पुढें त्याचा तितका परिणाम होत नाहीं, यास्तव पुढें औषधाचें प्रमाण वाढवावें लागतें. याप्रमाणें औषधें जास्त प्रमाणानें देतां देतां ज्ञानतंतु अशक्त होऊन पुढें त्यासंबंधीं भयंकर रोग उद्भवतात.

डा० कुन्हे यांचे उपायांचा ज्यांना अनुभव आला आहे, अशा पुष्कळ

लोकांनीं डा० कुन्हे यांस पत्रें पाठविलीं आहेत. यांपैकीं कांहींमधील उतारे खालीं दिले आहेत.

बटेव्हियांतील मिस्तर आर लिहितात "बटेव्हिया बेटांत आमचें कुटुंब व मोलकरीण तेथील तापानें आजारी पडल्या होत्या, त्या तुमच्या उपायांनीं बऱ्या झाल्या आहेत."

ब्रॅझिल येथील रेव्हरंड मि० एम् १६ डिसेंबर १८९० च्या पत्रांत लिहितात. "येथील हवेमुळें येणारा ताप आपण सांगितलेल्या भिन्न स्नानांच्या उपयोगानें कमी झाला आहे. त्याचप्रमाणें माझी पचनशक्तिही पुष्कळ सुधारली आहे. या कॉफीच्या ( कॉफी पिकणाऱ्या ) देशामध्यें आपण सांगितलेल्या नियमांप्रमाणें आहार ठेववत नाहीं. येथें आह्मांस गव्हांच्या ऐवजीं मक्याची भाकर खावी लागते. व आपल्या जर्मनींतील भाज्या, तांदूळ, इत्यादिकांच्या ऐवजीं, सफरचंद, केळीं, अंजिरें, नारिंगें, खरबुजें, खारका, वगैरे पदार्थ खावे लागतात."

आफ्रिकेंतील गोल्ड कोस्टमधील एका मि० जे० एम् नांवाच्या मिशनऱ्यानें आपल्या पत्रांत पुढें लिहिल्याप्रमाणें मजकूर लिहिला आहे "पित्तज्वरामध्यें आह्मीं आपल्या उपायांचा उपयोग केला. व आह्मांस कळविण्यास आनंद वाटतो कीं, आपल्या उपायांनीं ज्वर लवकर पाठीमागें हटतो."

मध्यअमेरिकेंतील ब्रिटिश हंडचूराज ( बेटांचें नांव ) येथील मि० एम एच. लिहितात "आपण आपल्या "नवीन चिकित्साशास्त्र" या पुस्तकाबरोबर उपदेशाचें जें पत्र पाठविलें, त्याबद्दल मी आपला फार आभारी आहें; होतां होईल तितकें आपल्या सांगण्याप्रमाणें वागण्याचा मी यत्न करितों. पूर्वीं येथील उष्ण हवेमुळें होणारे अनेक प्रकारचे ताप, हींव, व दुसरे रोग, यांपासून दरवर्षीं त्रास सोसावा लागत असे. परंतु ह्यावर्षीं आपले उपाय केल्यामुळें वर लिहिलेल्या रोगांपैकीं एकाही रोगाची बाधा झाली नाहीं.

अग्नेयी दिशेकडील ऑफ्रिकेच्या भागांतील मि० एफ्. एम्. नांवाचे गृहस्थ प्रथम आपल्या कुटुंबाची प्रकृति अत्यावस्थ बिघडली होती व ती अ-

साध्य आहे, असें डाक्टरांचें मत पडलें होतें, इत्यादि हकीकत सांगून पुढें लिहितात " ३० वर्षेपर्यंत आमच्या कुटुंबानें अन्य हजारों उपाय केले, परंतु त्यांपैकीं एकानेंही विकार हटेना. पचनशक्ति तर अतिशय क्षीण झाली होती. शिवाय अलीकडे मलेरिया तापही जडला होता. परंतु आपले उपाय शीतस्नानें करूं लागल्यापासून तिचा मलेरिया ताप बंद झाला आहे व पायांची सूजही कमी पडत चालली आहे. व बोटेंही लहान व क्वचिक ( सहज वळवितां येणारीं अशीं ) होत चाललीं आहेत. "

पूर्व आफ्रिकेंतील एक मिशनरी मि० जे. स्वतः आजारी असतां डा० कुन्हे यांच्या उपायांनीं बरें झाले. त्यांनीं एका ठिकाणीं खालीं लिहिल्याप्रमाणें डा० कुन्हे यांच्या उपायासंबंधानें उल्लेख केला आहे.

" रविवार ता० २२ जून १८९०. गेल्या आठवड्यांत माझा पुतण्या ५ दिवस मलेरियल तापानें आजारी होता. त्यास कोयनेल, अँटिपायरिन् अँटिफेब्रिन् ( ज्वरघ्न औषधें ) पेपर-मिठाचा चहा व नेचरक्यूअर पद्धतीप्रमाणें थंड पाण्यांत भिजविलेला कपडा अंगाभोंवतीं गुंडाळणें, वगैरे सर्व उपाय केले. परंतु कांहीं फायदा झाला नाहीं. ज्वर कमी झाला नाहींच पण उलट कांहींसा अधिक वाढला. शेवटीं आमचे सर्व उपाय थकून आह्मी निराश झालों. अशावेळीं आह्मांस डा० कुन्हे यांच्या 'नवीन चिकित्साशास्त्र' या पुस्तकाची आठवण झाली व या पुस्तकांतील उपाय करण्याचा आह्मीं निश्चय केला. या वेळीं रोग्याचें अंग तापानें अगदीं होरपळत होतें, तरी आह्मीं त्यास उचलून पाण्याच्या टबांत ( पातेल्यांत ) बसविलें व त्यास तीन मिनिटेंपर्यंत कुक्षिस्नान घातलें. फिरून ताप १०२ डिग्रीपर्यंत चढतो तों त्यास दुसऱ्यादां कुक्षिस्नान घातलें. यानंतर ताप कमी पडूं लागला आहे, असें आह्मांस दिसून आलें. रात्रीं बराच उतार पडला आहेसें दिसलें व पहाटें त्या रोग्यास बराच स्वभाविकपणें घाम आला. या प्रमाणें या साध्या उपायानें कांहीं तासांत माझ्या पुतण्यास आराम पडला.

या रोग्याकडून तीन मिनिटांच्या ऐवजीं २० मिनिटेंपर्यंत कुक्षिस्नान

करविलें असतें, तर गुण यापेक्षांही लवकर आला असता. अशा प्रसंगीं स्नानें जितका वेळपर्यंत व जितक्या वेळां अधिक करावीं तितकें अधिक चांगलें.

डॅरेस्‌-सलाम येथील मि० जी. नांवाचे गृहस्थ स्वतःसंबंधानें लिहितात "आपल्या उपायांनीं अनेक प्रकारचे ताप बरे केल्याविषयींची जी हकीकत मीं पूर्वीं आपणांस कळविली होती, तिची येथें पुनरुक्तता करण्याचें कांहीं कारण नाहीं. सध्यां या उपायांनीं मला जो गुण आला, त्याविषयीं फक्त लिहावयाचें आहे. अलीकडे आपले उपाय मी एतद्देशीय लोकांवर करीत असतों, व या उपायांपासून पुष्कळ फायदा होतो, असें मला आढळून आलें आहे.

गेल्या जूनपासून आमच्या सर्व कुटुंबांपैकीं कोणाही मनुष्यास मीं औषध दिलें नाहीं. औषधाच्या ऐवजीं आह्मी आपल्या सांगण्याप्रमाणें फक्त पाण्याचा उपयोग करितों. ज्या ठिकाणची हवा वाईट व रोगकारक आहे अशी ख्याति आहे, अशा या उष्ण हवेच्या देशांत आह्मी रहात असूनही आपल्या उपायामुळें आमच्या सर्वांच्या प्रकृति उत्तम निरोगी आहेत, पश्चिम आफ्रिकेंतील पिंवळ्या तापावर आपल्या जलचिकित्सापद्धतीपासून चांगला गुण येईल असें तुह्मांस वाटत नाहीं काय ?"

सर्व रोगांचें मूळस्वरूप एकच आहे व एकाच प्रकारचे उपाय सर्व रोगांवर चाललेच पाहिजेत, हें तत्त्व या गृहस्थास पूर्णपणें समजलें नव्हतें असें दिसतें. एरव्हीं त्यानें वरील प्रश्न केला नसता.

बोर्निओ बेटांतील एक मिशनरी मि. ए. हे तारीख २० जानेवारी १८९२ च्या आपल्या पत्रांत लिहितात.

"आपल्या नवीन चिकित्साशास्त्रांतील उपायापासून मला व दुसऱ्या कित्येक रोग्यांना जो गुण आला, त्याबद्दल आपले उपकार मानल्यावांचून आमच्यानें राहवत नाहीं. सुमारें वर्षापूर्वीं मी आपल्या एका स्नेह्याच्या घरीं राहिलों असतां, मला ताप (इंदियन फीव्हर) आला व त्या तापानें मी अगदीं घायाळ होऊन गेलों. नंतर आपले उपाय करण्याचा निश्चय करून एका वेताच्या खुर्चीवर बसून मीं बाष्पस्नान केलें, व त्यानंतर कुक्षिस्नान

केलें. या उपायांनीं मला इतका गुण वाटला कीं, ज्या मला पूर्वीं बिछाना सोडवत नसे तो मी आपला बिछाना सोडून हिंडूं फिरूं लागलों. गुण इतका लवकर आलेला पाहून माझा मित्र व त्याची पत्नी या दोघांसही आश्चर्य वाटलें. या प्रसंगापासून मी आपल्या **चिकित्सापद्धतीचा** कट्टा अनुयायी बनलों आहे. येथील **डॅक्स** या लोकांवर मीं आपल्या उपायांचे प्रयोग करून पाहिले व त्यांमध्येंही मला पुष्कळ यश आलें. या **डॅक्स** लोकांमध्यें वैद्य मुळींच नाहींत. परंतु फार प्राचीन काळापासून **बाष्पस्नानविधि** त्यांना माहीत आहे व त्याचा ते उपयोगही करितात. तथापि **शीतस्नानां**विषयीं त्यांना कांहीं माहिती नाहीं.

आपल्या उपायांनीं जे रोगी मीं बरे केले आहेत त्यांविषयींची हकीकत मी देत बसलों, तर मला कागदाचीं पुडकींच्या पुडकीं लिहावीं लागतील. मला मुख्यतः एवढेंच सांगणें आहे कीं, जेथें मनुष्यांची वस्ती फारशी नाहीं, व त्यामुळें जेथें औषधपाणी मिळण्याचा संभव नाहीं, अशा ठिकाणीं आपले उपाय फार उपयोगीं पडतात. वैद्यशास्त्रावरील इतर पुस्तकें आहेत, त्यांमध्यें पुष्कळ प्रसंगीं डाक्टराच्या मदतीवांचून कार्य व्हावयाचें नाहीं व अमुक प्रसंगीं डाक्टरासच बोलवावें असें लिहिलें असतें. परंतु अशा निर्जन प्रदेशांत डाक्टर तरी कोठून आणावा. आपल्या **चिकित्सापद्धतीस** डाक्टराची जरूर मुळींच लागत नाहीं, यास्तव आपलें नवीन **चिकित्साशास्त्र** हें पुस्तक ज्यास सर्व जगावर फिरावें लागतें व ज्यास वाटेल त्या देशांत रहावें लागतें, अशा मिशनऱ्यास अत्यावश्यक आहे. हें पुस्तक मजजवळ आहे, याजबद्दल मी ईश्वराचा फार आभारी आहें.

सुमारें तीन आठवड्यांपूर्वी एका झोंपड्यास आग लागल्यामुळें तेथें राहणाऱ्या एका बाईचें अंग भाजलें होतें. या बाईस सर्व दिवसभर थंड पाण्याच्या पट्ट्या लावण्यास दिल्या. याप्रमाणें एक आठवडाभर उपाय करितां ती बाई बरी झाली. मला वाटलें कीं, या बाईस डाक्टरी उपाय केले असते तर ती बरी होण्यास कित्येक आठवडे लागले असते.

कांहीं आठवड्यांपूर्वी माझ्या डाव्या हातावर पुरळ उठला. येथ या रोगास **किहिस्** हें नांव आहे. या जातीचा पुरळ फार वाईट असतो. कारण तो बरा होणें फार दुरापास्त असतें. मी या रोगास पूर्वी कांहीं मलमें लावून तो घालवीत असें, परंतु कांहीं वेळानें फिरून तो उद्भवत असे. विकारास आपल्या नवीन **चिकित्साशास्त्रांतील** उपाय करावे असा मीं निश्चय केला व त्याप्रमाणें मीं प्रथम **बाष्पस्नान** केलें, व त्यानंतर एकदां **कुक्षिस्नान** केलें. दुसऱ्या दिवशीं मी फक्त दोन वेळां **उपस्थस्नान** केलें **उपस्थस्नान** हा उपाय सुरू केल्यानंतर तिसऱ्या दिवशीं पुरळ आलेल्या ठिकाणीं त्वचा सुरकतलेली दिसली. यावरून आपला पुरळ लवकरच नाहींसा होणार आहे, असें मला समजून आलें. पुढें मी हातांस वाफारा देत असें, व त्यानंतर **उपस्थस्नान** करीत असें.

हातावर जेथें पुरळ उठला होता, त्या जागेवर सध्यां दोन व्रण झाले आहेत. असें होण्याचें कारण हें असावें कीं, शरीरांतील सर्व दोषिक द्रव्य या व्रणांखालीं जमलें आहे व त्यांतून तें पडून जाणार आहे. आतां हे व्रण बरे झाले कीं, पुरळ व त्याचें कारण साफ निघून जाईल. यापुढें मी आपल्या चिकित्सापद्धतीचाच उपयोग करीन. कारण आपल्या चिकित्सापद्धतीइतकी उत्तम दुसरी पद्धति मला आजपर्यंत आढळून आली नाहीं. या नवीन शास्त्राकडे माझ्या स्नेह्यांचें लक्ष लागावें ह्मणून मी नेहमीं प्रयत्न करीत असतों.

याशिवाय **डा० कुन्हे** यांच्या उपायांनीं पुष्कळ अन्य रोगी बरे केल्याबद्दल व स्वतः बरे झाल्याबद्दल कृतज्ञतादर्शक अनेक पत्रें **पश्चिम आफ्रिका, आस्ट्रेलिया, केप, वेस्ट इंडीज बेटें** वगैरे ठिकाणीं राहणाऱ्या गृहस्थांनीं डा० कुन्हे यांस पाठविलीं आहेत.

# भाग १५ वा.

## महारोग.



हा रोग बहुतेक असाध्य असा मानला आहे. हा रोग झालेल्या मनुष्यांना आपला कामधंदा सोडावा लागतो. व त्यांना मनुष्यवस्ति सोडून दूर पुष्कळ वेळां एकलकोंडेपणानें व अतिशय यातना सोशीत रहावें लागतें. अशा रोग्यांशीं लोक व्यवहार करीत नाहींत, व ते आपल्या मुलाबाळांस मुकल्यासारखेंच असतात. त्यांना कोणी आपल्याजवळ येऊं देत नाहींत. फार काय, पण संसर्गाच्या भीतीनें जवळ बसून त्यांच्याशीं कोणी फार वेळपर्यंत बोलत ही नाहींत. इतक्या हालअपेष्टा या रोगामुळें सोसाव्या लागतात, ह्मणून या रोगाचें सर्वांस फार भय वाटतें.

समशीतोष्णकटिबंधांतील देशांत हा रोग क्वचित् होतो. ज्या कारणामुळें उष्णकटिबंधांतील देशांत महारोग उत्पन्न होतो, त्याच कारणामुळें समशीतोष्णकटिबंधांतील देशांत संधिवात व जलोदर हे रोग होतात. ज्याप्रमाणें सर्व ठिकाणीं सूर्य, पाणी व जमीन, हीं एकच असलीं तरी स्वाभाविकपणें खजुरीच्या खारकेच्या झाडाची उत्पत्ति फक्त उष्णकटिबंधांतच होते व ओक झाडाची उत्पत्ति समशीतोष्णकटिबंधांत होते, त्याप्रमाणें ह्या रोगासंबंधानेंही आहे.

महारोग अथवा रक्तपिती या रोगाचे ओला व कोरडा असे दोन प्रकार आहेत. पहिल्या प्रकारच्या रोगामध्यें शरीर हळूहळू सडत जातें. व शरीरास भयंकर यातना नेहमीं होत असतात. रोग फार बळावला ह्मणजे रोग्यास रोगाच्या यमयातनांतून मुक्त करण्यास मृत्यु येतो.

कोरड्या रक्तपितीमध्यें ओल्या रक्तपितीप्रमाणेंच पचनशक्ति अगदीं बिघडून जाते, व हातापायांच्या शेवटाजवळच्या ( बोटांचे टोंकाजवळच्या ) भागास काळे चट्टे पडतात. हा भाग काळा पडण्याचें कारण शरीराच्या आंतील गुप्त ज्वराची तीव्र उष्णता हें होय. यानंतर हातापायांच्या बो-

टांचीं अग्रें सडावयास लागतात, व पुढें सर्व मांस सडून फक्त हाडें राहतात. त्याचप्रमाणें सर्व शरीरही वठलेल्या झाडाप्रमाणें वाळून जातें. अशा अवस्थेंत हाडें व सांधे कधीं कधीं जास्त मोठे दिसूं लागतात. याप्रमाणें मांस झडतां झडतां रोगी केवळ हाडांचा सांपळा दिसूं लागतो व क्षीण होऊन इहलोक सोडून जातो.

रक्तपितीचें कारणही इतर रोगांप्रमाणेंच विजातीय द्रव्य हें आहे. हें द्रव्य शरीरांत सांचण्याचे दोन प्रकार आहेत. एक आईबापांपासून प्राप्त होणें हा व दुसरा अपथ्य आहारविहार. या रोगाचें मूळस्थान पोटामध्यें अथवा पचनेंद्रियांमध्यें असतें. ह्या रोगाचें कारण शरीरांत विजातीय द्रव्य अतिशय सांचणें हें होय, हें पूर्वीं सांगितलेंच आहे. हें शरीरांतील विजातीय द्रव्य उष्णकटिबंधांतील उष्ण हवेनें नासून चोहोंकडे जोरानें पसरूं लागतें, व पसरतां पसरतां बोटांपर्यंत आलें ह्मणजे पुढें जाण्यास मार्ग नसल्यामुळें व पाठीमागून येणाऱ्या विजातीय द्रव्याचा त्याजवर दाब पडत असल्यामुळें, बोटांच्या अग्रांत सांचून राहतें. याप्रमाणें बोटांमध्यें व शरीराच्या सर्व अग्रांमध्यें विजातीय द्रव्य सांचून राहतें. व विजातीय द्रव्याचा त्या त्या भागांतील ज्ञानतंतूंवर दाब पडून ते निर्जीव व क्षीण होतात, आणि त्यांच्याकडून त्यांचा व्यापार होत नाहीं. रक्तपिती झालेल्या लोकांच्या अवयवांमध्यें जो निर्जीवपणा असतो, त्याचें कारण हेंच आहे. रक्तपिती झालेल्या रोग्यांचे अंगांत मोठा अंतर्ज्वर असतो, परंतु ह्यांच्या बाह्यांगास थंडी वाजत असते. ज्यांना कोरडी रक्तपिती झाली आहे, अशा रोग्यांच्या शरीराचीं अग्रें आंतील उष्णतेनें अगदीं शुष्क झालेलीं असतात. व अशा रोग्यांची पचनशक्ति अगदीं क्षीण झाल्यामुळें, त्यांनीं कितीही पौष्टिक अन्न खाल्लें तरी त्यापासून त्यांच्या शरीराचें पोषण होत नाहीं. कारण अन्नांतील पोषक रस काढून घेण्याचें शरीरांत सामर्थ्य नसेल, तर कसलेंही पौष्टिक अन्न खालें, तरी त्याचा काय उपयोग होणार! जलोदराप्रमाणें ओल्या रक्तपितीमध्येंही शरीरांतील द्रव्याचें पृथक्करण चाललेलें असतें. कारण या रोगामध्यें-

ही शरीरांत पाणी होण्याच्या पूर्वीं पुष्कळ दिवस कित्येक वर्षेंही शरीरांतील भाग कुजण्यास आरंभ झालेला असतो. यास्तव हा रोग होण्याच्यां पूर्वीं शरीरात जो बिघाड झालेला असतो, त्याची शेवटली अवस्था शरीरांतील भागाचें पृथक्करण सुरूं होणें ही होय. शिवाय वाहत्या रक्तपितीमध्यें शरीरांत पृथक्करण होऊन पाणी उत्पन्न होतें. परंतु ह्या पृथक्करणाचें स्वरूप जलोदरांतील पृथक्करणाच्या स्वरूपाहून भिन्न असतें. परंतु या दोन्ही क्रियांचा बराच संबंध आहे. जलोदर व रक्तपिती या दोन रोगांमध्यें बरेंच सादृश्य आहे, हें पाठीमागें ६ व्या भागांत दिलेल्या बटेव्हियाच्या एका रोग्याच्या हकीकतीवरून दिसून येईल. हा रोग इंग्लंड, जर्मनी वगैरे विशेष थंड हवेच्या देशांत फार करून होत नाहीं. याचें कारण असें आहे कीं, या देशांमध्यें उष्ण हवेच्या देशांप्रमाणें शरीरांतील विजातीय द्रव्य नेहमीं जोरानें पसरत जाऊन, शरीराच्या अग्रांमध्यें नेहमीं सांचून राहत नाहीं. परंतु थंड देशांमध्यें हें विजातीय द्रव्य शरीरांत नासतें व त्यामुळें फुफ्फुसें व इतर इंद्रियें कुजूं लागतात.

आपल्या शास्त्रांत रक्तपिती या रोगावर खातरीचा उपाय नाहीं, असें डाक्टर लोक उघड रीतीनें कबूल करतात. रक्तपिती एक ज्वराचाच प्रकार आहे, ही गोष्ट डाक्टरांस माहीत नाहीं. रक्तपितीला अंगभूत जो ज्वर असतो, त्यावर उपाय करणें, व शरीरांतील दोषिक द्रव्याचा निकाल करणें, हाच फक्त रक्तपिती बरी करण्याचा एक उपाय आहे. या गोष्टी होणें जेव्हां अशक्य असतें, तेव्हां हा रोग बरा होण्याची आशा नाहीं. मात्र रोग्याच्या स्थितीमध्यें कांहीं सुधारणा करितां येईल.

या रोगावर पोटांत औषधें दिल्यापासून प्रकृतीस जितका अपाय होतो, तितका प्रत्यक्ष त्या रोगानेंही होत नाहीं. बटेव्हिया येथील एका गृहस्थाची पूर्वीं सांगितलेली हकीकत हें या गोष्टीचें प्रत्यक्ष प्रमाण आहे. ज्या जंतूंमुळें रक्तपिती होते, ते जंतु रोग्याच्या रक्तांत आहेत, असें या रोगाचा विशेष अभ्यास केलेल्या एका डाक्टरानें सांगितलें होतें; परंतु त्या डाक्टरा-

च्या औषधानें किंवा दुसऱ्या कसल्याही विषारी औषधांनीं अथवा कोणत्या-ही अन्य उपायांनीं या जंतूंचा नाश झाला नाहीं.

ज्या डा० कुन्हे यांच्या चिकित्सापद्धतीनें याच गृहस्थाच्या अंगांतील रक्तपितीचे जंतु नाहींसे झाले, त्या चिकित्सापद्धतीची इतर पद्धतींशीं तुलना करून पहावी, ह्मणजे कोणती चिकित्सापद्धति श्रेष्ठ आहे, हें वाचकांस क-ळून येईल. हा रोग बरा करण्यास मुख्य दोन उपाय आहेत, ते अनुत्तेजक आहार व शीतस्नानें हे होत. परंतु ज्यांची पचनशक्ति व त्वचेची ( घामा-च्या रूपानें दोषिक द्रव्य बाहेर घालवून देण्याची ) क्रिया सुधारण्यासार-खी आहे, व ज्यांच्या प्रकृतीमध्यें बराच जोम राहिला आहे, असेच रोगी या रोगांतून बरे होतात.

डा० कुन्हे यांच्या उपायांचा उपयोग केल्यानें त्या रोग्यांच्या संस-र्गापासून आपल्या प्रकृतीस अपाय होण्याचा संभव टाळतां येण्यासारखा आ-हे. हें कार्य साधण्याकरितां सृष्टिनियमास धरून आहारविहार करणें व डा० कुन्हे यांचीं निरनिराळ्या प्रकारचीं स्नानें करून, शरीरांतील सर्व दोषिक द्र-व्य बाहेर काढून प्रकृति निरोगी व सदृढ करणें, या गोष्टीची अवश्यकता आहे. हे उपाय केल्यानें कोणत्याही रोगाचा संसर्ग आपणांस बाधणार ना-हीं; एवढेंच नव्हे, तर आपलें आरोग्य वाढून आपणांस शारीरिक व मान-सिक श्रम करण्याचें जास्त सामर्थ्य येईल.

महारोग झालेले रोगी ज्या जागीं निजत असतील, त्या जागेच्या सर्व खिडक्या बंद करण्याची जी चाल आहे, ती फार अपायकारक आहे. कार-ण असें केल्यानें त्या जागेंतील हवा महारोग्याच्या अंगांतून व श्वासावाटें बाहेर पडणाऱ्या विषारी व रोगोत्पादक वाफेनें दूषित होते, व ती हवा श्वा-सावाटें शरीरांत गेल्यानें शेजारचे लोकांस तो रोग होण्याचा संभव उत्पन्न होतो. संसर्गापासून रोग होण्याची जी भीति असते ह्मणून ह्मणतात, ती अशा वेळीं असते.

आतां रक्तपिती व ज्वर वगैरे अन्य रोग आपणांस होऊं नयेत, याविषयीं

आपण काय केलें पाहिजे, हें आपण पाहूं. हे सर्व रोग टाळण्याचा उत्तम उपाय ह्मणजे डा. कुन्हे यांचीं निरनिराळ्या प्रकारचीं स्नानें व अन्य उपचार हे होत. या उपायांनीं निदानीं एवढा तरी फायदा होईल कीं, एकादा रोग उद्भवल्यास त्यापासून आपल्या प्रकृतींत विशेष बिघाड होणार नाहीं, किंवा प्रकृतीस विशेष अपाय होणार नाहीं. हें पूर्वीं सांगितलेंच आहे कीं, ज्यांच्या शरीरांत विजातीय द्रव्य सांचलें आहे, त्यांनाच हे रोग होण्याचा संभव असतो. अशा लोकांच्या शरीरांतील विजातीय द्रव्य नासण्यास कांहीं अनुकूल कारण मिळालें, ह्मणजे रोग उद्भवतो, व जीवास धोका उत्पन्न होतो. अशा प्रकारची स्थिति प्राप्त होण्याची आपल्या प्रकृतींत पात्रता आहे किंवा काय, हें आपल्यास डा. कुन्हे यांच्या **मुखपरीक्षाशास्त्रानें** पुष्कळ वर्षें अगोदर कळून येतें. परंतु ज्यांना या शास्त्राचें ज्ञान नसेल, त्यांनाही अशा प्रकारची आपल्या शरीराची पात्रता जाणणें शक्य आहे. हें जाणण्याचें खात्रीचें साधन आपणांस आपल्या सृष्टिमातेनें दिलें आहे; मात्र त्याचा उपयोग करून घेण्याचें ज्ञान फार थोड्या लोकांना असेल. हें साधन ह्मणजे आपलें स्वाभाविक उपजतज्ञान होय. या उपजतज्ञानाच्या योगानें आपणांस शरीराची पात्रता जाणतां येते.

ज्यांना हे रोग होण्याची पात्रता आहे, ह्मणजे ज्यांच्या शरीरांत विजातीय द्रव्य सांचलें आहे, त्यांना अशा प्रकारच्या रोगांच्या संसर्गापासून स्वतःस रोग होण्याची स्वाभाविक भीति वाटते. अशा प्रकारची भीति ज्यांना वाटत असेल, त्यांनीं आपली प्रकृति रोग होण्यास पात्र आहे, असें जाणून, पूर्वीं सांगितलेल्या उपायांनीं आपली प्रकृति निरोगी–अर्थात् दोषिक द्रव्यापासून मुक्त करण्याच्या मार्गास लागावें.

बार्लिन व दुसरीं कांहीं शहरें येथील नाणावलेल्या डाक्टरांनीं असाध्य ह्मणून सोडून दिलेलीं रक्तपिती झालेलीं जीं तीन मुलें, डा० कुन्हे यांनीं बरीं केलीं, त्यांच्या रोगामध्यें फरक कसा पडत गेला, याची हकीकत खालीं दिली आहे.

हीं तीन मुलें अनुक्रमें ९,१३ व १९ वर्षांचीं होतीं. या रोग्यांची हकीकत बरीच महत्त्वाची वाटल्यावरून, त्यांचे डा. कुन्हे यांनीं निरनिराळ्या प्रसंगीं निरनिराळ्या भागांचे सात फोटो घेतले आहेत. हे फोटो वाचकांच्या माहितीकरितां पुस्तकाच्या शेवटीं दिले आहेत. ते आकृति नंबर १५,१६, १७, १८, १९, २०, व २१ पहा.

डा० कुन्हे यांनीं या मुलांना आपले उपाय सुरू केले, त्यावेळीं या मुलांची प्रकृति फारच वाईट स्थितींत होती. त्यांच्या हातांच्या बोटांचीं टोंकें व कांहीं बोटांचे दुसरे सांधे सडून गेले होते. बोटांचा बाकीचा भाग बराच सुजला होता, व तीं बोटें लवकर गळून पडतील असें वाटत होतें. ( आकृति १८ व १९ पहा. ) या मुलांपैकीं सर्वांत लहान मुलाच्या उजव्या हाताच्या तर्जनीचा (दुसऱ्या पोटऱ्याचा) सर्व भाग सडून चालला होता. व दुसऱ्या दोन्ही मुलांचीं पावलें इतकीं सुजलीं होतीं कीं, त्यांच्याकडे पाहण्याचीही भीति वाटत असे. ( आकृति २० व २१ पहा. ) हीं पावलें ह्मणजे दोषिक द्रव्यानें भरलेलें असे आकृतिविरहित मांसाचे गोळेच होते. कित्येक ठिकाणीं मांस सडण्यास लागलें होतें, व कांहीं ठिकाणीं क्षतें हाडांपर्यंत खोल जाऊन त्यांमधून पू वाहत होता. कोंपरापर्यंत हात व गुडघ्यापर्यंतचा पायांचा खालचा भाग त्यांच्यामधील सर्व स्पर्शज्ञान जाऊन, निर्जीव झाल्यासारखा झाला होता. या मुलांपैकीं एका मुलाच्या अवयवाच्या केवढ्या भागांतील स्पर्शज्ञान गेलें आहे, हें पाहण्याकरितां बर्लिन येथील एका डाक्टरानें त्या मुलाच्या हातांत एक लांब सुई, कोंपरापर्यंत आडवी घालून पाहिलें. तेव्हां त्यास आढळून आलें कीं, फक्त कोंपराजवळच्या भागांत स्पर्शज्ञान राहिलें आहे. या मुलाच्या प्रकृतीची स्थिति इतकी वाईट होती कीं, जेव्हां त्यास तीन आठवडे उपचार करून त्याची प्रकृति बरीच सुधारली, तेव्हां फोटोग्राफ काढण्यास कांहींवेळ बसण्याइतकी त्याच्या शरीरांत स्वस्थता आली. या मुलाचा अगदीं प्रथम फोटो घेतां न आल्यामुळें, त्याची प्रथम अवस्था किती भयंकर होती, या प्रत्यक्ष फोटोच्या रूपानें आह्मांस याविषयींची कल्पना वाचकांस करून देतां येत नाहीं.

दिवसांतून दोन किंवा तीन उपस्थस्नानें व मधून मधून ब-याच वेळां कुक्षिस्नानें, पथ्य, आहार, उघड्या व मोकळ्या हवेमध्यें बराचसा व्यायाम व अंगांतून घाम काढणें, हे उपाय डा० कुन्हे यांनीं या मुलांस केले. हे उपाय प्रथम सुरू केले, त्या वेळीं या मुलांच्या अंगांतून जो दुर्गंध बाहेर पडे, तो फार भयंकर असे; तरी पण हे उपाय चालू असतां, ज्या दुर्गंधी वाफा बाहेर पडत, त्यांना शरीरांतील भाग कुजल्याचा वास येई व त्या नाकास अगदीं असह्य वाटत असत. याचें कारण असें होतें कीं डा० कुन्हे यांच्या उपायांच्या योगानें शरीरांतील दोषिक व घाण द्रव्यामध्यें हालचाल उत्पन्न होऊन, तें द्रव्य शरीराबाहेर जाण्याचा यत्न करीत असे. ही गोष्ट विशेषतः स्नानाक्रिया चालू असतांना घडून येत असे.

या मुलांना सकाळीं फराळास चाळ न काढलेल्या पिठाची भाकरी व कांहीं ॲपल्स ( सफरचंद ) देत असत. दोन प्रहरीं भोजनास, ज्यामध्यें पीठ आहे, अशा धान्यांचे अथवा कंदाचे पदार्थ व ज्यांमध्यें लोणी व मीठ थोडेंसें टाकलें आहे व ज्या थोडक्या पाण्यांत शिजविल्या आहेत, अशा भाज्या व डाळ हे पदार्थ वाढीत असत. सर्व प्रकारचा मांसाहार अगदीं वर्ज्य केला होता, व पाण्यावांचून दुसरें कोणतेंही पेय त्यांना दिलें नाहीं.

एका पंधरवड्याच्या आंत पायांतून पाणी वाहण्याचें बंद झालें व पायांवरील जखमा बाहेरील बाजूनें भरून येऊं लागल्या. दुसरीं जीं दोन मोठीं मुलें होतीं; त्यांच्या प्रत्येकाच्या पायास एक मोठें भोंक पडलें होतें व तें नेहमीं वाहत असे. हीं भोंकें मात्र दुस-या महिन्यामध्यें भरून येऊं लागलीं. त्याचप्रमाणें हातामध्येंही फरक पडूं लागला होता. दुस-या महिन्यामध्यें हाताच्या बोटांची सूज उतरून, बोटें बारिक होत चाललीं होतीं. ही गोष्ट बोटांवरील कातड्यास सुरकुत्या पडल्या होत्या, यावरून समजण्याजोगी होती. नंतर जें पोटांतील विजातीय द्रव्य पसरत जाऊन शरीराच्या अग्रामध्यें सांचलें होतें, तें परत आपल्या उगमाकडे ( पोटाकडे ) जाऊं लागलें. ही गोष्ट या वेळीं हातांत, बाहूंत, पायांत, व विशेषतः सांध्यांत कोणी वर

भेोडल्यासारख्या ज्या वेदना होत असत, त्यांवरून त्या रोग्यांना स्पष्ट-पणें समजून आली.

या मुलांपैकीं वडील मुलगा प्रथम डा० कुन्हे यांचेकडे गेला, त्या वेळीं त्याचें शरीर रक्तपितीनें इतकें खराब होऊन गेलें होतें कीं, त्याच्या पायांस त्रास न व्हावा, यांकरितां मुद्दाम केलेले बूटही त्याच्यानें पायांत घालवत नव्हते. परंतु डा० कुन्हे यांचे उपाय चालू केल्यास चार आठवडे झाल्या-नंतर त्या मुलास साधे चामड्याचे ( नेहमींचे ) बूट पायांत घालून चालतां येऊं लागलें. शिवाय ज्या अवयवांचें स्पर्शज्ञान नाहींसें झालें होतें, त्यांचें स्पर्शज्ञान फिरून आलें. इतका फरक पडण्याचें मुख्य कारण हें होतें कीं, त्यांचें अन्नपचन सुधारलें होतें. हीं मुलें जेव्हां प्रथम डा० कुन्हे यांच्याकडे गेलीं, तेव्हां त्यांची क्षुधा अतिशय मंद होती. परंतु उपाय चालू केल्यावर एका आठवड्यांत त्यांची क्षुधा इतकी प्रदीप्त झाली कीं, पुष्कळ अन्न खा-ऊनही आपणांस पोटभर अन्न खावयास मिळालें नाहीं, असें त्यांना वाटे.

याप्रमाणें या मुलांच्या स्थितींत एवढ्या काळांत इतकी सुधारणा झाली. जीं मुलें पूर्वीं मृत्यूच्या दाढेंत दिल्यासारखींच होतीं, तीं यावेळीं आनंदांत राहूं लागलीं.

या तीन मुलांच्या उदाहरणावरून व पूर्वीं सांगितलेल्या बटेव्हिया ये-थील एका रोग्याच्या हकीकतीवरून रक्तपिती हा रोग बरा होणें अशक्य आहे, असें जें सामान्य मत आहे तें किती चुकीचें आहे हें समजून येईल.

डा० कुन्हे ह्मणतात कीं, "आजपर्यंत रक्तपिती झालेल्या रोग्यास उ-पाय करून मला जें यश मिळालें आहे, त्यावरून मी प्रतिज्ञेवर त्रिनदिक्कत असें सांगतों कीं, जें इतर रोगांचें कारण पूर्वीं सांगण्यांत आलें आहे, तेंच कारण रक्तपिती अथवा महारोग याचेंही आहे" हा रोग झालेल्या लोकां-पैकीं ज्यांचा रोग बराच वाढला आहे, ह्मणजे रोग वाढल्यानें ज्यांचीं मुख्य जीवनेंद्रियें ( जिवनास आवश्यक अशीं इंद्रियें ) कुजून गेलीं आहेत, त्यांचा रोग बरा होण्याची आशा नाहीं. तथापि अशा हतभागी लोकांना

डा० कुन्हे यांच्या उपायापासून बराच आराम वाटेल व त्यांच्या यातना कमी होऊन त्यांना सुखानें मरण येईल.

---

# भाग १६ वा.

## खरूज, जंत, *टेपवर्म व उवा इत्यादि दुसऱ्याच्या शरीरावर राहून उपजीविका करणारे क्षुद्रकृमि व अंतर्गल इत्यादि रोग.

या सर्व रोगांचीं बाह्य लक्षणें जरी भिन्न असलीं, तरी त्या सर्वांचें मूळकारण एकाच प्रकारचें आहे. ह्मणून या सर्व रोगांचें विवेचन एकाच भागांत केलें आहे. हे रोग झालेले जे अनेक रोगी बरे केले आहेत, त्यावरून या सर्व रोगांना एक सामान्य कारण आहे ही गोष्ट निर्विवादपणें सिद्ध होते. खरूज व इतर त्वचेस कीड उत्पन्न करणारे रोग यांवर उपाय कसे करावे, याचा विचार करण्याच्यापूर्वीं खरूज ज्या जंतूमुळें होते, त्या जंतूंची उत्पत्ति कशी होते, याचा आपण विचार करूं.

ही गोष्ट कित्येकांस ठाऊक असेल कीं, ज्यामध्यें सृष्टीमधील सर्व प्राणिमात्रामध्यें अतिशय उत्साह व चैतन्य उत्पन्न होतें, अशा वसंतऋतूमध्यें एका कीटकापासून एका दिवसांत लाखों किंवा कोट्यवधि कीटक उत्पन्न होतात. हे कीटक एखाद्या झाडावर बसून त्याचीं सर्व पानें खाऊन टाकून झाडाचा नाश करतात. हे कृमी मारून झाड वांचविण्याचा आपण प्रयत्न केला, तर तो अगदीं व्यर्थ जातो. कारण या कीटकांची संख्या एवढी मोठी असते कीं, त्या सर्वांचा नाश करणें अशक्य असतें. याप्रमाणें हे किडे झाडें अथवा पीक खाऊन त्यांचा फडशा करीत असतांना आपणांस वाईट वाटतें, तरी नाइलाजास्तव तें आपणांस निमूटपणें सहन करावें लागतें. परंतु एखाद्यावेळीं असा चमत्कार घडतो कीं, कांहीं दिवसांनीं एखाद्या रात्रीं खूप

---

*जंत, नारू इत्यादि रोगांप्रमाणेंच फितीप्रमाणें चपटा व लांब शरीरांत एक कृमी होतो त्यास 'टेपवर्म' असें ह्मणतात.

थंडी पडते, व मग दुसऱ्या दिवशीं पहावें, तों ज्याप्रमाणें ते किडे एकाएकीं उत्पन्न झाले होते, त्याप्रमाणेंच ते एकाएकी पार नाहींसे झालेले आपल्या दृष्टीस पडतात. याप्रमाणें जी गोष्ट करणें आपणांस जवळ जवळ अशक्य होते, ती गोष्ट फक्त एक दिवसाच्या हवेंतील फेरफारामुळें घडून आलेली आहे, असें आपणांस आढळून येतें. या किड्यांची जशी स्थिति आहे, तशीच खरूज अथवा अन्य त्वचेचे रोग यांस कारण होणाऱ्या जंतूंची आहे.

वर दिलेल्या उदाहरणाहून जास्त अनुभवांतील असें घुलयांचें अथवा सुरवंटांचें उदाहरण आहे. आश्लेषा नक्षत्राचा पाऊस पडला कीं, आदल्या दिवशीं यांचा कोठेंही मागमूस नसतांना दुसऱ्या दिवशीं त्यांचे थवेच्या थवे दृष्टीस पडतात. पुढें मघा नक्षत्राचा पाऊस लवकर पडला नाहीं, तर हे किडे बरेच दिवसपर्यंत जगतात. परंतु–मघाचा पाऊस पडला कीं, हे किडे सर्व मरून जातात, किंवा सांधीकोंदींत लपून बसतात हा फेरफारही मुख्यतः हवेनें होतो, असें ह्मणण्यास कांहीं हरकत दिसत नाहीं.*

वर दिलेल्या उदाहरणावरून असें अनुमान निघतें कीं, खरजेचे कृमी, जंत, उवा किंवा याच जातीचे प्राण्यांच्या देहावर उपजीविका करणारे कृमी, हे त्यांना ज्या ठिकाणीं भक्ष्य मिळतें, अशाच ठिकाणीं वास करतात. ह्मणजे जें शरीर रोगट आहे, अथवा ज्या शरीरामध्यें दोषिक द्रव्य सांचलें आहे, अशाच शरीरांत हे प्राणी आढळावयाचे. त्याचप्रमाणें या प्राण्यांची उत्पत्ति होण्यास व त्यांचें अस्तित्व कायम राहण्यास शरीरांत बरीच उष्णता असली पाहिजे. अशा प्रकारची उष्णता ज्यांच्या शरीरांत दोषिक द्रव्याचा संचय झालेला असतो, अशाच लोकांच्या शरीरांत असते. ही शरीरांतील उष्णता आपणांस कमी करून नेहमींच्या प्रमाणांत आपणांस आणतां आली व शरीरांतील सर्व दोषिक द्रव्य काढून टाकलें, ह्मणजे या कृमींच्या जीवनाचीं साधनें नाहींशीं होतात व ते आपोआप नाहींसे होतात.

---

* त्याचप्रमाणें विशाखा व अनुराधा या नक्षत्रांच्या पावसानें उंदरांचा अनुक्रमें उत्पत्ति व नाश होतो, ही गोष्ट लक्षांत घेण्यासारखी आहे.

वरील विवेचन ज्यांनीं लक्षपूर्वक वाचलें असेल त्याना कळून येईल कीं, शरीरांतील उष्णता कमी करण्याचा मार्ग ह्मटला ह्मणजे शीतस्नानें, अनुत्तेजक पदार्थांचा आहार व डा० कुन्हे यांचे अन्य उपाय हा होय. या उपायांमध्यें अर्थातच प्रकृतिमानाप्रमाणें फेरफार केला पाहिजे. ज्या अर्थीं या रोगांचें, व ह्या वेळपर्यंत वर्णन केलेल्या अन्य रोगांचे कारण एकच आहे, त्या अर्थीं जे उपाय इतर रोगांवर रामबाण ठरलें आहेत, त्यांपासून या रोगावरही उत्तम गुण आला पाहिजे, हें कोणासही दिसून येईल. या रोगावर औषधांचा उपयोग करण्यापासून प्रकृतीस विनाकारण अपाय मात्र होतो.

वर सांगितलेल्या गोष्टी मनांत चांगल्या ठसाव्या ह्मणून पुढें कांहीं उदाहरणें दिलीं आहेत.

एका गृहस्थाच्या पोटांत ( आंतड्यांत ) अनेक प्रकारचे कृमि झाले होते. या विकाराबरोबरच या गृहस्थास ज्ञाततंतूसंबधीं व पचनेंद्रियासंबंधीं बरेच विकार झाले होते. या सर्व विकारांनीं तो गृहस्थ अगदीं मरणोन्मुख झाला होता. त्याचें शरीर जणूं काय आंतून कृमी खाऊन टाकीत होते. त्याच्या मळामध्येंही पुष्कळ कृमी असत. या गृहस्थाची अशी अवस्था होती, परंतु त्यानें डा० कुन्हे यांचे उपाय सुरू केल्यावर दुसऱ्या महिन्यांत कृमींचें कारण जें शरीरांतलि दोषिक द्रव्य त्याचा निकाल झाल्यामुळें, शरीरांतील सर्व कृमी नाहींसे झाले. आणखी कांहीं दिवस उपाय केल्यावर या गृहस्थाचे सर्व जीर्ण विकार जाऊन त्यास आरोग्य प्राप्त झालें.

विजातीय द्रव्य नासण्याच्या ज्या क्रियेमुळें शरीरांत कृमी उत्पन्न होत असत, ती क्रिया शरीरांतील उष्णता कमी करून बंद पाडल्यानें व त्याच योगानें शरीरांतील विजातीय द्रव्याचा निकाल केल्यानें, या गृहस्थाच्या शरीरांतील सर्व कृमी नाहींसे झाले. या कामीं डा. कुन्हे यांचीं कुक्षिस्नानें, उपस्थस्नानें व शरीरांतून घाम येईल असे उपाय करणें व खाण्यास अनुत्तेजक व कच्चे पदार्थ देणें, या साधनांचा उपयोग केला.

दुसऱ्या एका रोग्याची हकीकत—

थं एक १७ वर्षांचा मुलगा बरेच दिवस खरजेनें पीडला होता. त्यानें निरनिराळ्या अनेक दवाखान्यांतील औषधें एका पाठीमागून एक घेऊन पाहिलीं, परंतु त्याचा रोग मुळींच कमी झाला नाहीं. शेवटीं एका वैद्यशास्त्राच्या प्रोफेसरांनीं " तुला आमच्याजवळ कांहींएक औषध नाहीं. तूं डा० कुन्हे यांच्याकडे जा " असें उपरोधिक भाषेनें सांगितलें. दुसरा कांहीं इलाज राहिला नाहीं, असें पाहून तो मुलगा डा० कुन्हे यांचेकडे गेला. ह्या रोग्याचे हात व पाय खरजेनें इतके खराब होऊन गेले होते कीं, त्यांचेकडे पाहवत देखील नसे. अन्नपचन बरोबर होत नसल्यामुळें उत्पन्न झालेला त्याचे पोटांत पुष्कळ दिवसाचा एक जीर्णरोग आहे, असें डा० कुन्हे यांना मुखपरीक्षाशास्त्राच्या साहाय्यानें समजून आलें. या कारणामुळें या रोग्याच्या शरीरांत जें दोषिक रस व अशुद्ध रक्त उत्पन्न होत असे, तें खरजेच्या कृमींना योग्य भक्ष्य असल्यामुळें, त्यांची वाढ शरीरांत होऊन, खरूज हा रोग झाला होता. प्लेग, पटकी इत्यादि रोगांमध्यें शरीरांत उत्पन्न होणाऱ्या जंतूंप्रमाणेंच खरजेच्या कृमींची वृद्धि जेथें पदार्थ कुजून त्यांचें पृथक्करण होत असेल, अशाच ठिकाणीं होते. या जंतूंना योग्य भक्ष्य मिळाल्यावांचून त्यांची उत्पत्ति व वाढ होणें अशक्य आहे.

या रोग्यास डा० कुन्हे यांनीं **शीतस्नानें** व मधून मधून बऱ्याच वेळां **बाष्पस्नानें** हे उपाय केले. पथ्य आहार अर्थात् होताच. या रोग्याचें अन्नपचन लवकरच सुधारलें व अन्नपचन सुधारल्यामुळें खरजेच्या कृमींच्या जिवनास आवश्यक जें विजातीय द्रव्य, त्याची उत्पत्ति बंद पडत चालल्यामुळें ते सर्व कृमी हळू हळू नाहींसें होत चाललें. या कृमींचा नाश होत चालला आहे, हें सूक्ष्मदर्शक यंत्रानें पाहिल्यावरून स्पष्टपणें समजून येत होतें. तिसऱ्या आठवड्यांत हे कृमि क्वचित् ठिकाणीं दिसून येत होते, परंतु चवथ्या आठवड्यांत हे कृमी पार नाहींसे झाले. त्यांचा मागमूसही राहिला नाहीं. त्या तरुण मनुष्याच्या आकारांत इतका फरक पडला कीं, अलीकडे त्याला ज्यानें पाहिलें नव्हतें, अशा गृहस्थास तो ओळखितां आ-

हा असता किंवा नाहीं, याची शंका आहे. प्रकृति निरोगी करण्याचें जें कार्य लोकांच्या पैशावर चरणाऱ्या व लांब लांब सर्टिफिकिटें जवळ बाळगणाऱ्या डाक्टरांच्याकडून झालें नाहीं, तें कार्य ह्या रोग्याच्या प्रकृतीनें आपोआप घडवून आणलें. इतर रोगांप्रमाणेंच या रोगामध्येंही औषधांचा उपयोग न करितां डा० कुन्हे यांनीं त्या रोगाचा समूळ नाश करून टाकला.

अंतर्गळ—पोटांत विजातीय द्रव्य सांचल्यामुळें व त्यापासून जो दाब उत्पन्न होतो, त्यामुळें ह्या विकाराची उत्पत्ति होते. पोटावरील त्वचेच्या आंतील बाजूस कला ह्मणून जो एक पातळ त्वचेचा पडदा असतो, त्यापैकीं ज्या ठिकाणीं आंतड्यास यत्किंचित् अडथळा होतो, त्याठिकाणीं आंतड्यावर वरून दाब पडल्यामुळें आंतडें त्या कलेस फाडून बाहेर पडतें. ज्याठिकाणीं आंतडें बाहेर पडतें, ती जागा सर्व रोग्यांमध्यें एकच असते असें नाहीं. परंतु असें होण्याचें कारण मात्र सर्व रोग्यामध्यें एकच आहे. शरीराच्या कांहीं भागास धक्का बसल्यानें किंवा आघात झाल्यानें अथवा मनुष्य पडल्यामुळें कला फाटून आंतडें बाहेर पडतें, असें ह्मणणें चुकीचें आहे. अशाप्रकारचे अपघात हीं या विकारास निमित्तकारणें होतात. परंतु हीं कारणें मुख्य नव्हेत, हें नेहमीं ध्यानांत धरलें पाहिजे. डा० कुन्हे यांच्या चिकित्सापद्धतीनें शरीरांतील सर्व दोषिक द्रव्याचा निकाल केला ह्मणजे अशाप्रकारचे विकार पूर्णपणें बरे होतात. कमरेंत पट्टा घालण्यापासून अशा प्रकारच्या विकारास विशेष फायदा होत नाहीं, यास्तव तो उपाय निरर्थक आहे.

या विकारावर डा० कुन्हे यांच्या उपायांपासून उत्तम गुण येतो, असें अनुभवानें सिद्ध झालें आहे. सर्व रोगांचें मूळकारण व मूळस्वरूप एकच आहे, या गोष्टीचा या विकारामध्येंही अनुभव येतो. गुण लवकर अथवा उशीरा येणें हें शरीरांतील विजातीय द्रव्याचा संचय व रोग नवीन आहे, किंवा जीर्ण आहे, या गोष्टीवर अवलंबून आहे. त्याचप्रमाणें वृद्ध मनुष्याचे अंगांत जोम व ताकद कमी असल्यामुळें, त्यास तरुण मनुष्याप्रमाणें गुण पूर्णपणें किंवा लवकर येत नाहीं.

# भाग १७ वा.

## व्रण.

व्रण हा भयंकर बाह्य कारणांनीं किंवा त्यापासून होणाऱ्या व्याधीपासून उत्पन्न होतो, असें ह्मणतां यावयाचें नाहीं. या सर्वसंहारक रोगाचें खरें कारण शरीरांत घडणाऱ्या कांहीं अन्य क्रिया आहेत. जलोदर व क्षय या रोगांप्रमाणेंच हा रोगही पूर्वी पूर्णपणें बरे न करितां औषधांनीं शरीरांत दबविलेल्या अनेक रोगांची शेवटची अवस्था आहे. हा रोग प्रायः गरमी व जननेंद्रियासंबंधीं अन्य रोग हे पूर्वी झाले असतां हा रोग प्रायः पाठीमागून उद्भवतो. आतां हे ( जननेंद्रियासंबंधीं ) रोग स्वतःच्या दुर्वर्तनानें झालेले असोत, किंवा कांहीं आनुवंशिक संस्कारानें अथवा अन्य कारणानें प्राप्त झालेले असोत, कारण या गोष्टीचें विशेष महत्त्व नाहीं. मुख्य मुद्याची गोष्ट ही आहे कीं, शरीरामध्यें दोषिक द्रव्य असेल तेव्हांच हा रोग होतो. हें विजातीय द्रव्य शरीरांत ज्या मार्गानें पसरत जाईल, त्या त्या भागांमध्यें व्रण—होतात. हा रोग प्रत्यक्षपणें होण्याच्या पूर्वी या रोगाची प्रवृत्ति डा० कुन्हे यांच्या मुखपरीक्षाशास्त्राच्या योगानें पुष्कळ वर्षे अगोदर ओळखितां येते. कारण हा रोग प्रत्यक्ष होण्यापूर्वी मानेवर कांहीं ठिकाणीं सूज अथवा गांठी उत्पन्न होतात व त्यावरून अशा प्रकारच्या लहान मोठ्या गांठी व फोड सर्व शरीरामध्यें व विशेषतः पोटामध्यें उत्पन्न झाले आहेत, असें कळून येतें. अशा प्रकारचे फोड किंवा गांठी पोटांत उत्पन्न झाल्यानें महास्रोतामधून ( जठरापासून तों मलद्वारापर्यंत ज्या नलिकेंतून अन्न जातें ती नलिका ) अन्नाचा रस जातांना त्यास अडथळा होतो व त्यामुळें कृत्रिम उपायांवांचून मलशुद्धि चांगली होत नाहीं. ज्या लोकांचा व्रण—हा रोग बराच बळावला होता किंवा दुःसाध्य झाला होता, त्या सर्वांचीं पचनेंद्रियें अगदीं बिघडून गेलीं होतीं, असें डा० कुन्हे यांना आढळून आलें. या लोकांना रेचक दिल्याशिवाय किंवा बस्तीचा उपयोग केल्यावांचून, मलशुद्धि

साफ होत नसे. शिवाय असें आढळून आलें आहे कीं, रेचक औषधें विशेषतः गोळ्याच्या रूपानें फार दिवस घेतलीं असतां पोटांतील कांहीं भाग कुजावयास लागतात व त्यामुळें पुढें क्षय किंवा व्रण वगैरे विकार होतात. रेचकादि ज्ञानतंतूंचा क्षोभ करणारीं विषारी औषधें, प्रकृति कांहीं दिवसपर्यंत सहन करिते. परंतु या औषधांच्या उपयोगामुळें ज्ञानतंतु इतके क्षुभित निर्बळ होऊन जातात कीं, त्यांना जास्त जास्त उत्तेजक औषधें दिल्यावांचून त्यांच्याकडून त्यांचें नेहमींचें कार्य होत नाहीं. अशा प्रसंगीं व्रणादि भयंकर रोग होतात. क्षयादि अन्य रोगांप्रमाणें व्रण होण्याचें कारण—ही एक खाण्यापिण्यांत नियमितपणा न ठेवणें, मादक किंवा उत्तेजक पदार्थांनीं ज्ञानतंतु क्षोभित करणें व एकंदरीत सृष्टिनियमांस सोडून आहारविहार करणें, इत्यादि गोष्टी होत.

इतर बळावलेल्या जीर्ण रोगांप्रमाणें चया रोगावरही डाक्टर लोकांचें कांहीं चालत नाहीं. शस्त्रप्रयोगानें अथवा दाहक औषधांनीं व्रण इत्यादि रोग बरे करण्याचा प्रयत्न डाक्टर लोक करितांना पाहून डा० कुन्हे यांचें शास्त्र जाणणारास फार खेद वाटेल. जर्मनीचा फ्रेडरिक बादशहा या रोगानें आजारी असतां, त्यावर अशाच प्रकारचे प्रयोग केले. हा रोग कोणत्या कारणांनीं उत्पन्न झाला असावा, याचा शोध डाक्टर लोक करीत नाहींत व त्यांना या रोगाचें खरें कारण समजलेंही नाहीं, असें दिसतें. कारण असें असतें तर शरीरांत रोगबीजक विजातीय द्रव्याचा संचय झाल्याच्या बाह्य लक्षणांपैकीं एक लक्षण, जे शरीरांतील एखादा भाग सडणें वगैरे त्यापुरतेंच बाह्य उपचार त्यांनीं केलें नसते. त्याचप्रमाणें त्यांना असेंही दिसून आलें असतें कीं, अशा प्रकारचे रोग होण्यास शरीरांत कांहीं तरी कारण असलें पाहिजे व असें दिसून आल्यावर हें कारण नाहींसें करण्यास काय योजना करावी, याचा त्यांनीं विचार केला असता.

व्रण झाला किंवा शरीरांतील कोणचाही भाग सडूं लागला ह्मणजे असह्य वेदना होतात. या वेदना शांत करण्याकरितां डाक्टर लोकांना पुष्कळ प्रसंगीं पिचकारीनें शरीरांत मॉर्फिया ( अफूप्रमाणें अम्मल उत्पन्न करणाऱ्या द्र-

त्यांपैकीं एक द्रव्य ) घालावा लागतो. या उपायानें तात्पुरता आराम वाटतो, परंतु त्यापासून सर्व शरीरास व विशेषतः ज्ञानतंतूंस फार अपाय होतो, व त्याचे परिणाम पुढें प्रकृतीस भोगावे लागतात. अशी एक गोष्ट सागतात कीं, अस्वल आपल्या धन्याच्या नाकावर बसलेल्या माशीपासून धन्यास त्रास होऊं नये ह्मणून माशीस धोंड्याचा टोला लगावतें, परंतु त्या टोल्यानें माशी व धनी हे दोन्हीही मरून जातात. अशाच प्रकारची जुन्या वैद्यकाची स्थिति आहे.

या रोगापासून व त्याचप्रमाणें अन्य प्रकारच्या रोगांपासून होणाऱ्या सर्व वेदना डा० कुन्हे यांच्या **उपस्थमार्जनादि** विधींनीं उत्तम प्रकारें बंद होत असतां, **मॉर्फिया** वगैरे अमली, विषारी व अपायकारक पदार्थांचा उपयोग आपण कां करावा ? या उपायांनीं सर्व इंद्रियांतील शक्ति जागृत होऊन इंद्रियें सुदृढ व जोमदार होतात. तसेच **डिप्सो मेनिया** ( मद्यादि मादक पदार्थ घेण्याची सतत इच्छा ज्यामध्यें होते असा एक रोग ) या रोगामध्यें ज्याप्रमाणें मादक पदार्थ सेवन करण्याची सतत इच्छा होते, त्याप्रमाणें या रोगावर मॉर्फिया वगैरे पदार्थांचा उपयोग केला असतां या पदार्थसंबंधानें इच्छा होते. या रोगास स्वाभाविक उपचार केले तरच ही इच्छा बंद होते.

**चवथ्या प्रकरणामध्यें** "जखमा कशा बऱ्या कराव्या" या भागांत वाहणाऱ्या जखमा या सदराखालीं व्रण या रोगाचें कारण व स्वरूप यांचें विवेचन केलेलें आढळून येईल. येथें या रोगाच्या चिकित्सेसंबंधानें दोन शब्द सांगतों. हा रोग कोणत्या भागांत झाला आहे, व कोणत्या रूपानें झाला आहे, या गोष्टीची विशेष मातबरी आपणांस नाहीं. व्रण जिभेला झाला आहे किंवा वक्षःस्थलास झाला आहे किंवा गर्भाशयास अथवा जठरास झाला आहे, ही गोष्ट विशेष महत्त्वाची नाहीं. कारण रोग कोठें व कोणत्या रूपानें उद्भूत झाला आहे, याच्यावर रोग लवकर किंवा उशीरां बरा होणें, हें मुळींच अवलंबून नाहीं. तर विजातीय द्रव्याचा संचय कोणत्या भागांत व किती

झाला आहे, व नासण्याच्या क्रियेमुळें त्याच्या अवस्थेमध्यें काय फरक झाला आहे, व त्याचा शरीराच्या कोणत्या भागावर दाब पडला आहे, यांवर अवलंबून आहे.

डा. कुन्हे यांच्या उपायांनीं हा रोग पूर्णपणें बरा करितां येतो. ज्यांचें अन्नपचन साधारण बरें आहे व ज्यांच्या प्रकृतींत जीवनसत्व बरेंच आहे, अशा लोकांना या उपायांपासून खातरीनें गुण येईल. क्षय, जलोदर वगैरे रोगांप्रमाणेंच हा रोग फार भयंकर आहे व ज्यांना डा० कुन्हे यांचें चिकित्साशास्त्र पूर्णपणें अवगत आहे, अशा लोकांनाच हा रोग बरा करितां येईल.

एका ५० वर्षांच्या गृहस्थास हा रोग झाला होता. त्याविषयीं त्यानें पुष्कळ प्रसिद्ध डाक्टरांचा सल्ला घेतला होता. ' तुमच्या नाकास व्रण झाला आहे " असें त्या सर्व डाक्टरांनीं सांगितलें, परंतु या रोगाचें स्वरूप व कारण यांसंबंधानें त्यांना कांहीं समजल्यामुळें त्यांना बरा करतां आला नाहीं.

त्या सर्व डॉक्टरांनीं व्रणाचीं बाह्य लक्षणें नाहींशीं करण्याकरितां नाकास विषारी औषधाचे उपचार केले. ज्याप्रमाणें एखाद्या झाडाची फांदी कुजली ह्मणजे, तें झाड फक्त त्या फांदीजवळच कुजलेलें नसतें, त्याप्रमाणें व्रण हा रोग झाला असतांना ज्या भागांतून कुजून पू वगैरे घाणेरडे पदार्थ वाहतात, तो भागच फक्त कुजलेला नसतो, तर शरीरामध्यें पुष्कळ ठिकाणीं कुजण्यास सुरवात झालेली असते. व ज्या भागास व्रण झालेला दृष्टीस पडतो, त्या भागामध्यें तो रोग अगदीं पूर्ण दशेस आलेला असतो. जेव्हां आपण कुजलेलें झाड पाडतों, तेव्हां तें झाड फक्त फांदीच्याच ठिकाणीं कुजलेलें नसतें, असें आपणांस आढळून येतें. व्रण झालेल्या एखाद्या रोग्याचें शरीर जर फाडलें, तर डॉक्टरास त्या व्रणाच्या रोग्याचें सर्व शरीर नासलेलें आहे, असें खातरीनें आढळून येईल. पण जर ही गोष्ट डॉक्टर लोकांस पूर्वींच ओळखितां येईल, तर रोग्यास ह्यापासून फारच फायदा होणार आहे.

असो. वर सांगितलेला गृहस्थ शेवटीं डा० कुन्हे यांच्याकडे गेला. या

गृहस्थाचें अन्नपचन फार वर्षांपासून अतिशय बिघडलेलें होतें. परंतु सांगण्याचें आश्चर्य हें कीं, ही गोष्ट डाक्टरांनीं मुळींच लक्षांत न घेतां, फक्त त्याच्या नाकालाच उपचार करूं लागले. डा० कुन्हे यांचें मुखपरीक्षाशास्त्र जर माहीत असतें, तर नाक कुजलें आहे असें पाहून, त्या रोग्याचें पोटही नाकाप्रमाणेंच कुजलेलें असलें पाहिजे, असें त्यांना खातरीनें कळलें असतें. फक्त नाकालाच औषध लावणें हें अगदीं निरुपयोगी आहे, असें या गृहस्थास वाटलें, व आपण बरे होऊं ह्या आशेनें तो डा० कुन्हे यांच्याकडे गेला. त्याचें नाक व वरील ओंठ व्रण होऊन अगदीं नासून गेले होते, व नाकाचा शेंडाही नाहींसा होण्याच्या बेतांत होता, व नाकावरील त्वचेच्या वर्णावरून तो भाग सडत चालला आहे, असें दिसून येत होतें, त्याला मलावरोध झाला होता, व लघवीस साफ होत नसे, व त्यामुळें त्यास अत्यंत वेदना सोसाव्या लागत असत. परंतु या गोष्टीमुळें सुदैवानें त्याच्या चित्ताची स्वस्थता ढळली नव्हती.

**डा० कुन्हे** यांच्या उपायांनीं त्याच्या प्रकृतीस लवकरच गुण वाटला. कारण त्याच्या प्रकृतींत अजून बराच जोम राहिला होता. त्याची पचनशक्ति लवकरच सुधारली, आणि ह्मणून त्यांची प्रकृति एकंदरींत पुष्कळ सुधारली. व्रणानें आलेली नाकावरील सूज दिवसेंदिवस औषध न लावतां कमी कमी होत चालली. पहिल्यानें नाक फारच लाल झालें, परंतु ४ महिन्यांतच त्याला नेहमींचा रंग आला. इतक्या वेळांत नाक व वरचा ओंठ आंतून बरे होत आले व त्यांवर चट्टा वगैरे कांहीं डाग न पडतां पूर्णपणें बरे झाले.

ह्या वेळेस त्या रोग्यास पचेल असें साधें कोरडें अनुत्तेजक व हलकें अन्न खावयास देणें, **शीतस्नानें** करविणें व आठवड्यांतून एक दोन वेळ सर्व शरीरास किंवा फक्त डोक्याला **बाष्पस्नान** घालणें, हेच कायते उपाय त्या रोग्यासाठीं योजिले होते. जेव्हां त्या रोग्यास व्रणापासून होणारा दाह व दुःख सहन होईनासें झालें, तेव्हां दोन दोन तासांच्या अंतरानें **शीतस्नानें** घालणें भाग पडलें. **शीतस्नानाच्या** योगानें त्या वेदना सारख्या कमी होत

होत्या व स्नान करीत असतांना त्या रोग्यास फार आराम वाटे. दुसऱ्या दिवसापासून कुजणाऱ्या भागाचें स्थान आपली पूर्वीची जागा सोडून खालीं खालीं जावयास लागलें. उपस्थमार्जन करीत असतांना जें घर्षण होई, त्यामुळें जे फोड उत्पन्न झाले होते, त्यावरून हें स्पष्ट दिसून येत होतें. या फोडांमुळें त्या रोग्यास फारच काळजी वाटू लागली, कारण त्या फोडांच्या ठिकाणीं तीव्र वेदना होत असत. ह्याचें कारण काय आहे हें डा० कुन्हे यांनीं त्यास चांगलें समजावून सांगितलें, व त्यास बजावलें कीं, ' माझे उपचार तरी धीर धरून केले पाहिजेत, किंवा मरणास तरी तयार झालें पाहिजे. शिवाय डा० कुन्हे यांनीं त्यास हेंही समजावून सांगितलें कीं, ज्या मानानें मार्जनविधि करितांना ज्या भागाचें ( उपस्थाचें ) मार्जन करावें लागतें, तेथें जितका दाह व वेदना उत्पन्न झाल्या होत्या, त्या तितक्याच मानानें नाकास व्रण झालेल्या ठिकाणचा दाह व वेदना कमी पडल्या होत्या. ही गोष्ट त्याला पटली. व डा० कुन्हे यांचे उपचार चालू ठेवण्याचा त्यानें निश्चय केला. या दुःखकारक स्थितींतून निघून जाण्यास फक्त स्नानाचेच उपचार त्यानें केले व त्यायोगानें त्यास गुणही लवकरच आला.

हे उपचार चालू असतांना त्या रोग्यास पूर्वीं झालेला मूत्रपिंडाचा विकार फिरून उद्भवला, व त्यानंतर तशाच प्रकारचा कांहीं जननेंद्रियासंबंधाचा विकार उत्पन्न झाला. परंतु हे दोन्ही रोग पूर्वींपेक्षां फारच सौम्यरूपानें उत्पन्न झाले होते, पूर्वीं जेव्हां हे रोग त्याला झाले होते, तेव्हां ते औषधांच्या योगानें वास्तविकपणें बरे न होतां अंगांत दबून राहिले होते. हे रोग पुढें नाकास होणाऱ्या व्रणाची पूर्वावस्था होते. परंतु औषधाच्या उपयोगानें ते रोग शरीरांत दबविल्यामुळें त्यापासून नाकास व्रण झालेला होता. या व्रणावर डा० कुन्हे यांचे उपाय चालू असतांना जे कांहीं घाणेरडे पदार्थ पू मलरूपानें बाहेर पडत असत. त्यांवरून वर सांगितलेली गोष्ट पूर्णपणें सिद्ध होत होती. त्याच्या व्रणामधून जो पू येई त्यास, कांहीं कांहीं वेळेस त्या गृहस्थास पूर्वीं जननेंद्रियाचा व मूत्रपिंडाचा रोग झाला असतां तो बरा

करण्याकरितां ज्या औषधांचा उपयोग केला होता, त्या औषधांचा वास येत असे. याचें कारण असें आहे कीं, जीं औषधें आपण पोटांत घेतों, तीं श्लेष्मारूपीं सूक्ष्म त्वचेच्या वेष्टनामध्यें सांचून त्याच्या गोळ्या बनतात व त्या शरीरांतील उष्णतेनें वाळून जाऊन घन होतात. नंतर प्रकृतीस योग्य प्रकारची जलचिकित्सा केली असतां या गोळ्या विरघळतात. व या उपायानें प्रकृतीमधील जीवनसत्व किंवा जोम वाढला असेल तर त्या गोळ्यांचें द्रव्य मलरूपानें शरीरांतून पडून जातें. पाण्याचे उपाय जर नीट रीतीनें केलें तर जे शेंकडों रोगी डा० कुन्हे यांच्या उपायांनीं बरे झाले आहेत, त्यांच्या त्या उदाहरणावरून जें वर ह्मटलें आहे तें खरें आहे असें आढळून आलें आहे. शिवाय पूर्वीं डाक्टरांचीं औषधें घेतलीं असतां डा० कुन्हे यांच्या उपायांनीं गुण येण्यास जास्त वेळ लागतो, याही गोष्टीचा पुष्कळ वेळां अनुभव आला आहे. पूर्वीं घेतलेलीं औषधें शरीरांतून बाहेर पडतांना तर रोग्यास फारच त्रास होतो. सदरहू रोग्याला देखील ह्यापासून फार त्रास सोसावा लागला होता. परंतु आपली प्रकृति हळू हळू सुधारत चालली होती, हें पाहून हे उपचार चालू ठेवण्याची त्याची उमेद कायम राहिली. व सरतेशेवटीं कांहीं दिवसांनीं तो अगदीं पूर्णपणें बरा झाला.

**उपस्थमार्जन** करीत असतांना ज्या ठिकाणीं मार्जन अथवा घर्षण करावें लागतें, त्या ठिकाणीं सर्वच रोग्यांना व्रण होतील असे मात्र आपण समजूं नये. व्रण आदिकरून जीर्ण रोगांमध्यें **उपस्थमार्जन** करीत असतांना फोड वगैरे होतात, ते विशेष प्रसंगीं व विशेष स्थितींतच होतात. शरीराच्या आंतील भागास गुप्त सूज नसेल अथवा विजातीय द्रव्याचा अन्य रीतीनें निकाल होईल, तर जें इंद्रिय आपण रुमालानें घांसतों, त्यास फोड किंवा सूज कधींहि येणार नाहीं. कित्येक रोगी रोज १॥ पासून २ तासपर्यंत अशा क्रमानें २ वर्षेपर्यंत शीतस्नानें करीत असतां, त्यांस असा प्रकार कधींही झाला नाहीं, असाही डा० कुन्हे यांचा अनुभव आहे. कित्येकांच्या जीर्ण रोगास तीव्र किंवा शीघ्रविपाकी रोगांचें स्वरूप प्राप्त होत असतां, त्यांना असा प्रकार कांहीं वेळपर्यंत होतो; परंतु

हा प्रकार शरीरांतील सूज व दाह वरून खालीं उतरेपर्यंत टिकतो व पुढें स्नानें करतांना एकदम नाहींसा होतो. कित्येकवेळां हे फोड व पुरळ मार्जन करावयाच्या भागापासून (उपस्थापासून) कांहीं अंतरावर होतात व त्यांमधून पुवाच्या रूपानें शरीरांतील सर्व दोषिक द्रव्य पडून जातें. हा पू इंद्रियांचें घर्षण किंवा मार्जन केल्यानें उत्पन्न होतो असें मानणें चुकीचें आहे. हा पू फक्त शरीरांतील विजातीय किंवा दोषिक द्रव्य नासल्यानें उत्पन्न होतो. अशा रीतीनें पू पडणें प्रकृतीस फार हितावह आहे, कारण त्या योगानें शरीरांतील दोषिक द्रव्याचा झपाट्यानें निकाल होतो. यास्तव शीतस्नानें करीत असतां, वर सांगितल्याप्रमाणें सूज किंवा पुरळ येऊन त्यामधून पू वाहणें हें अनिष्ट लक्षण आहे, असें समजून रोग्यानें घाबरून जाऊं नये. उलट डा० कुन्हे यांच्या उपायानें शरीरांतील दोषिक द्रव्य काढून टाकून शरीर निरोगी करण्याचा प्रयत्न करण्यास प्रकृति उद्युक्त होते, या गोष्टीचें वरील गोष्ट प्रत्यक्ष प्रमाण आहे. व्रणादि रोगांमध्यें जेव्हां शरीरांतील भाग कुजूं लागतो, तेव्हांच मार्जन करण्याच्या ठिकाणीं सूज किंवा फोड उत्पन्न होऊन त्यांतून पू वाहूं लागतो. अशा प्रकारें ज्या भागास सूज किंवा पुरळ येतो, त्या ठिकाणीं वेदना किंवा त्रास होऊं नये म्हणून स्नानाहून अन्य वेळीं त्या ठिकाणीं बऱ्याच पदरी फडक्याची थंड पाण्यामध्यें भिजलेली पट्टी ठेवावी.

व्रण झालेल्या रोग्याचें आणखी एक मजेदार उदाहरण पुढें दिलें आहे. एका ५० वर्षांच्या बाईच्या स्तनास रोग झाला होता. बर्लिन येथील ज्या प्रख्यात डॉक्टरांनीं जर्मनीच्या फ्रेडरिक राजाला औषध दिलें होतें, त्याच प्रख्यात डॉक्टरांनीं तिच्या डाव्या स्तनावर शस्त्रप्रयोग केला होता. पुढें तिच्या उजव्या स्तनासही व्रण झाला. त्यावर अगदीं "रामबाण" म्हटलेला उपाय जो शस्त्रप्रयोग, तो अगदीं निरुपयोगी आहे, असें तिला कळून आलें. खरोखर त्या बाईची प्रकृति पूर्वीपेक्षां फारच बिघडली. तो व्रण रोग फिरून कां उद्भवला, हें विचारण्याकरितां ती बाई फिरून त्या

पूर्वींच्याच डॉक्टरकडे गेली. पुष्कळ वेळ तपासून पाहिल्यावर त्या प्रख्यात डॉक्टरांनीं तिला असें सांगितलें कीं, "तुमच्या उजव्या स्तनावर देखील शस्त्रप्रयोग करावा लागेल. परंतु शस्त्रप्रयोगाचें दुःख सहन करण्याचें सामर्थ्य तुमचे आंगांत नाहीं. व त्यामुळें या प्रयोगानंतर तुह्मी जगणार नाहीं" याप्रमाणें शस्त्रप्रयोगाशिवाय बरा करण्याचा दुसरा उपायच उरला नाहीं. अशा प्रकारें जर्मनींतील अति उत्तम डॉक्टरांनीं तिच्या रोगापुढें हात टेंकल्यावर, ती बाई निराश झाली व तिला कांहीं सुचेना. अशावेळीं तिला डा. कुन्हे यांचेकडे आपण जावें असें वाटलें व त्याप्रमाणें तिनें केलेंहि. तिचा उजवा स्तन कुजला होता, व काखेपासून स्तनापर्यंत सर्व भागांत काळ्यानिळ्या रंगाचे मांसाचे कुजलेले गोळे बनून राहिले होते. या गोळ्यांपैकीं कांहीं कांहीं तर अंड्याएवढे मोठे होते. पोटावर देखील अशा प्रकारच्या पुष्कळ गांठी आल्या होत्या व पोट मोठें व कठीण झालें होतें. तिला अन्न बिलकुल पचत नव्हतें व तिला तीन किंवा चार दिवसांनीं एकदां शौचास होत असे व तें देखील बस्ति (enema) दिल्यावांचून होत नसे. शौचास मळ पडे, तो आंतील उष्णतेनें अगदीं करपून व शुष्क होऊन गेल्यामुळें काळ्या रंगाचा असे व त्याचे खडेच्या खडे पडत. लघवी देखील हवी तितकी होत नसे. तिच्या अंगांतील ताकद व हुषारी दिवसेंदिवस कमी कमी होत होती; व त्यामुळें तिला फारच काळजी वाटूं लागली होती, व डोकें दुखीनें तर तिची प्रकृति फारच निःसत्व झाली होती. ह्या बाईनें डा. कुन्हे यांचे उपचार फार धिम्मेपणानें व नेटानें चालू ठेवले होते. या उपायांनीं तिचें डोकें दुखणें लवकरच बंद पडलें. आठवड्या आठवड्यास तर तिची पचनशक्तिही सुधारूं लागली. त्या बाईच्या शक्तीप्रमाणें व रोजच्या प्रकृतीच्या मानाप्रमाणें स्नानें कमीजास्त करावीं लागलीं. हे उपाय चालू असतां पहिल्या ५।६ आठवड्यांत तिला बराच त्रास झाला, ह्यावेळीं बर्लिन येथील डॉक्टरांनीं केलेल्या व त्या वेळीं गुणावह ठरलेल्या शस्त्रप्रयोगाचा परिणाम काय झाला, हें दिसून आलें. पूर्वीं डाव्या स्तनावर ज्या ठिकाणीं पूर्वीं झा-

लेल्या व्रणांचा खोल चट्टा पडला होता, त्या ठिकाणीं व्रण उत्पन्न झाला व तो ४ आठवडेपर्यंत वाढत जातां जातां शेवटीं तो [ व्रण ] १५ चौरस इंच जागेभर पसरला. जसजसा डाव्या छातीवरील व्रण वाढत जात होता, तसतसा उजव्या छातीवरिल व्रण कमी कमी होत चालला होता. पूर्वी डाव्या स्तनावरील केलेल्या शस्त्रप्रयोगामुळें व्रणाचें मूळकारण नाहींसें झालें नव्हतें; तर फक्त ज्या भागामध्यें व्रणाचें मूळकारण जें दोषिक द्रव्य तें सांचलें होतें. त्या भागाचा जो बाह्य भाग फारच कुजला होता, तो मात्र कापून काढला होता. यामुळें प्रकृतीस त्या रोगाच्या बीजाचा पहिल्या द्वारानें निकाल करितां येईना व त्यामुळें तो रोग फिरून उजव्या स्तनामध्यें उद्भवला. या भागांत व्रण होण्याच्या पूर्वी काखेपासून छातीपर्यंतच्या भागांत काळ्या रंगाच्या कठिणशा गांठी आल्या होत्या. डा० कुन्हे यांच्या उपायांनीं तो रोग फिरून पूर्व स्थितीप्रत चालला होता, व त्यामुळें तो रोग फिरून डाव्या स्तनावर उद्भवला, ही कांहीं आश्चर्याची गोष्ट नव्हे. डॉक्टर लोक कृत्रिम उपायांनीं रोग बरा करण्याचा प्रयत्न करितांना प्रकृतीशीं जी दांडगाई करतात, ती दांडगाई प्रकृतीस मुळींच खपत नाहीं. या गोष्टीचें वरील उदाहरण हें ढळढळीत प्रमाण आहे. डॉक्टराचे शस्त्रक्रियेचे उपाय किती निरुपयोगी आहेत व त्यायोगानें रोग खरोखरीं बरे होणें हें किती अशक्य आहे, हें ज्यावर शस्त्रप्रयोग केला आहे, अशा प्रत्येक रोग्याच्या उदाहरणावरून स्पष्टपणें दिसून येतें. शिवाय हेंही लक्षांत ठेविलें पाहिजे कीं, पोटांत औषधें देण्याच्या उपायापेक्षांही शस्त्रप्रयोगाचा उपाय जास्त कृत्रिम व प्रकृतीस विरुद्ध आहे. ह्मणूनच या नवीन चिकित्साशास्त्राचे मुखपृष्ठावर नांव लिहितांना औषधोपचारावांचून रोग बरे करण्याचें शास्त्र एवढेंच न लिहितां **शस्त्रप्रयोगावांचून** रोग बरे करण्यांचें शास्त्र असें लिहिलें आहे.

परंतु त्या बाईचें काय झालें, हें आपणांस पाहिलें पाहिजे. डा. कुन्हे यांच्या रोगनाशक स्नानाच्या योगानें शरीराच्या क्रियेमध्यें उत्पन्न होणाऱ्या फेरफारामुळें ज्या कांहीं वेदना होत, त्या वेदना सहन करण्याइतकी

शक्ति नियमितपणें स्नानें केल्यानंतर तिच्या अंगांत येऊं लागली. पुढें लवकरच शरीराचा जो भाग मार्जन करितांना घांसावा लागतो, त्या ठिकाणीं व्रण उत्पन्न होऊन, त्यामधून पू वाहूं लागला; ही गोष्ट शरीरांतील कुजलेलें द्रव्य निघून जात आहे, याचें हें प्रत्यक्ष प्रमाण होतें. यानंतर लागलीच खांकेंतील सुजलेला भाग मऊ मऊ होत चालला, व सरते शेवटीं त्यांतील गांठी अगदीं विरघळून त्यांतील दोषिक द्रव्य खालीं उतरूं लागलें. पहिले दोन महिनेपर्यंत, ती बाई फक्त चाळून काढलेल्या पिठाची भाकरी व फळें खाऊन राहिली होती. अशा प्रकारचा आहार व डा. कुन्हे यांचीं ज्वरशामक स्नानें तीन महिने केल्यावर त्या बाईची प्रकृति इतकी सुधारली कीं, तिच्या डाव्या छातीवरील व्रण बहुतेक बरे झाल्यासारखेच होते, व आपल्या घरीं जाण्याइतकी शक्ति त्या बाईच्या अंगांत आली होती.

व्रण झालेले आणखी पुष्कळ रोगी डा. कुन्हे यांनीं बरे केले आहेत. त्यांमध्यें जिभेस व्रण झालेला एक व दुसरा घशास व्रण झालेला एक, अशा दोन रोग्यांची हकीकत विशेष सांगण्यासारखी आहे. ह्या रोग्यांच्या संबंधानें देखील डा. कुन्हे यांच्या उपायास यश आलें.

ज्या रोग्याच्या गळ्यास व्रण झाला होता, त्याच्या कांहीं आठवड्यांतच गळ्यांतील व्रणासंबंधाच्या गांठी मऊ झाल्या व त्यांतून पू निघून गेला. या योगानें त्या रोग्यास कांहीं त्रास न होतां, अन्न खातां येऊं लागलें.

ज्या रोग्याच्या जिभेला व्रण झाला होता, त्या रोग्यानें प्रत्येक वेळीं—मार्जनविधि केल्यावर तत्क्षणीं त्याच्या जिभेवर पिंवळसर व काळसर रंगाचा जो बुरा येत असे, तो तत्क्षणीं नाहींसा होई. त्या योगानें पोटांतील गांठींपेक्षां जिभेवरील गांठी लवकरच निघून गेल्या, व जिभही लवकरच पूर्वींप्रमाणें साफ झाली.

व्रण या रोगासंबंधाची विशेष भयंकर अशी गोष्ट ह्मटली ह्मणजे, ती पोटांतील रुधिरयुक्त गांठी या होत. जेव्हां रोग्यांना पातळ अन्नावांचून दुसरे प्रकारचें अन्न खातां येत नसेल, तेव्हां या गांठीमुळें होणाऱ्या वेदना

तरी डा० कुन्हे यांच्या उपायानें शांत करून, त्या रोग्याची उपासमार व त्या मॉर्फिया वगैरे औषधांनीं गुंगी आणून त्याची वेदना शांत करण्याची अवश्यकता टाळतां येते. त्याचप्रमाणें डा० कुन्हे यांच्या याच मार्गानें आपण पोटांतील गांठी विरघळवून रोग्याचा निद्रानाश हा विकार घालवून त्यास झोंप येईल, असें करितां येतें. परंतु ह्या योगानें तो रोगी खरोखर बरा होणार नाहीं, कारण पातळ अन्नाच्या योगानें ज्याप्रकारचें शौचास व्हावें तितकें होणार नाहीं.

कांहीं मोठे मोठे रोग झाले असतांना, श्वास कोंडल्यामुळें जे झटके येतात, त्यांवरही डा० कुन्हे यांच्या **उपमार्जनाच्या** उपायापासून फारच आश्चर्यकारक गुण येतो. ज्या कांहीं रोग्यांना असे झटके दिवसांतून पुष्कळ वेळ येत असत, त्यांवर **शीतस्नानाचा** प्रयोग थोडावेळ केल्यावर अगदीं थोडक्या वेळांतच ते झटके बंद होऊन, श्वास कोंडून प्राणांत होण्याची भीतिही समूळ नाहींशी झाली. जेव्हां एखादी गळ्यांतील गांठ विरघळते व त्यांतील पू श्वासोच्छ्वासाचे नळींत उतरतो, किंवा जेव्हां विरघळण्यापूर्वींच ती गांठ सुजून घसा बंद करितें व त्यामुळें श्वासोच्छ्वास करितां येत नाहीं, त्या वेळेस हे झटके येतात; परंतु **शीतस्नान** केल्यानें ते लागलेच नाहींसे होतात. इतके दिवसपर्यंत फक्त *ट्रॅकिओटोमीनेच्या पद्धतीनें हे झटके नाहींसे करण्याचा प्रयत्न डॉक्टर लोक करीत आहेत, परंतु याहून डा० कुन्हे यांचा उपाय फारच उपयोगाचा आहे. घटसर्पामध्यें श्वास गुदमरला असतां त्यावर शस्त्रप्रयोग करण्यावांचून, डॉक्टरांना गत्यंतरच नसतें; परंतु यावेळीं डा० कुन्हे यांच्या **शीतस्नानाचा** जो उपयोग होतो, तोच उपयोग एरव्हीं श्वास कोंडला असतांही होतो. हॉस्पिटलचे दरवर्षींचे रिपोर्ट वाचले ह्मणजे, आपणांस असें कळून येईल कीं, शरीरांत ‖सीरम घालण्याच्या यु-

---

* श्वासनलिका साफ करण्याचा शस्त्रवैद्यांचा एक प्रयोग.

‖ शरीरांतील रोगजंतु मारून रोगाचा प्रतिकार करण्याकरितां विशेष प्रकारें तयार केलेली शरीरांत घालण्याची लस

क्रीमुळें डॉक्टरांना कराव्या लागणाऱ्या शस्त्रप्रयोगांची संख्या मुळींच कमी झाली नाहीं. अशा प्रकारचीं औषधें पिचकारीनें रक्तांत घालणें, हा उपाय किती निपरुयोगी आहे, हें ह्यावरून स्पष्ट दिसतें.

ज्या व्याधीमुळें जखम झालेल्या शरीराच्या भागावर जे नासक्या मांसाचे गोळे जमतात, तो व्याधि व्रण या रोगापेक्षां कमी भयंकर आहे, व त्या रोगापेक्षां हा व्याधी लवकर बरा होतो; कारण डा० कुन्हे यांच्या उपायांनीं त्या नासक्या मांसाच्या गोळ्याचा पू करून त्याचा शरीरांतून निकाल करितां येतो, व असें होत असल्यामुळें शरीरांतील सर्व दोषिक द्रव्यें बाहेर काढून टाकण्यास फारसा वेळ लागत नाहीं, ही गोष्ट डा० कुन्हे यांनीं बरे केलेल्या पुष्कळ रोग्यांच्या उदाहरणांवरून सिद्ध झाली आहे. यांपैकीं एक उदाहरण खालीं दिलें आहे.

एका तीस वर्षांच्या बाईच्या बोटास कांहीं विकार झाला होता. पूर्वीं कांहीं दुखापत झाल्यामुळें तिच्या बोटाचें टोंक अगदीं सुजून गेलें होतें, व दुखावलेल्या ठिकाणाजवळ नासलेल्या मांसाची एक गांठ आली होती. त्या बाईस जो डॉक्टर औषध देत होता, त्यानें लगेच ती गांठ कापून टाकिली व त्याठिकाणीं **ल्युनर कॉस्टीक** व दुसरीं कांहीं दाहक औषधें लावून तो भाग जाळून टाकिला होता. परंतु ह्या कापण्याच्या योगानें व जाळून टाकण्याच्या योगानें, त्या बोटास बिलकूल गुण आला नाहीं; व कितीदां कापलें तरी ती गांठ फिरून येतच होती. शेवटीं तें सबंध बोट सडून गेलें व त्या डॉक्टरानें त्या बाईस असें सांगितलें कीं, रोग हाडापर्यंत जाऊन पोहोंचला आहे, करितां त्या रोगाचा पुढें फैलाव होऊं नये, ह्मणून बोट कापून टाकिलें पाहिजे. आपलें बोट कापून घेण्यास ती बाई राजी नसल्यामुळें ती डा० कुन्हे यांचेकडे गेली. " तुमचे बोट कापून टाकण्याची गरज नाहीं एवढेंच नव्हें, तर बोट कापल्यामुळें कदाचित् तुमच्या प्रकृतीस इजाही होईल, " असें डा० कुन्हे यांनीं त्या बाईस सांगितलें. व त्यांनीं तिची अशी समजूत घातली कीं, तें बोट कांहीं विवक्षित कारणामुळें कुजलें आहे,

व तें कारण नाहींसें केल्यावर तें बोट खातरीनें बरें होईल. या व्याधीवर प्रत्येक वेळीं अर्धा तासप्रमाणें दिवसांतून तीन किंवा चार वेळां **मार्जनविधि** करण्यास डा० कुन्हे यांनीं त्या बाईस सांगितलें. दिवसांतून तीनदां किंवा चारदां **मार्जनविधि** करण्यास व अनुत्तेजक आणि अर्थात् पथ्य अन्न खाण्यास व त्याचप्रमाणें पाहिले तीन चार दिवसपर्यंत **मार्जनविधि** करण्यापूर्वीं त्या बोटास वाफारा देण्यास डा० कुन्हे यांनीं सांगितलें. मध्यंतरीं ती स्त्री प्रसूत झाली व तशा स्थितींत **मार्जनविधि** करावा किंवा न करावा, याविषयीं तिला शंका येऊं लागली; परंतु ह्या प्रसंगीं ह्याच्यापेक्षां दुसरा चांगला उपायच नाहीं, असें जेव्हां डा० कुन्हे यांनीं त्या बाईस सांगितलें, तेव्हां त्यांच्या सांगण्याप्रमाणें करण्याचा तिनें निश्चय केला. एरव्हीं बोट कापून टाकण्यावांचून दुसरा उपायच राहिला नव्हता. डा० कुन्हे यांच्या उपायांनीं तें बोट फारच लवकर बरें झालें. प्रथम **स्नान** करण्याबरोबर तें नासकें मांस नवीन होण्याचें बंद झालें. तिसऱ्या दिवसापासून त्या नासक्या मांसाचा पू व्हावयास लागला, व ह्यावरून तें बोट सुधारत चाललें होतें, हेंही दिसून येत होतें. त्या बोटांमधील कुजण्याची क्रिया बंद झाली होती, ह्मणून दुसरें हाड किंवा इतर बोटें सडून जाण्याची भीति मुळींच राहिली नव्हती. एकंदरींत १४ दिवसांचे आंतच तें बोट पूर्णपणें बरें झालें व त्यावर चट्टा किंवा व्रण बिलकूल मागें राहिला नाहीं.

# प्रकरण चवथें.

## भाग १ ला.

### औषधें किंवा शस्त्रप्रयोगावांचून जखमा बऱ्या करणें.

शल्यतंत्रामध्यें [ शस्त्रचिकित्सा ऊर्फ सर्जरी या शास्त्रामध्यें ] जे उपाय सांगितले आहेत, त्यांच्या योगानें जखमा बऱ्या करण्याचा भ्रांतिमूलक प्रघात मोडून टाकणें, हें सोपें काम नाहीं. सध्यां बहुतेक लोकांचा असा समज आहे कीं, जखमा देखील फक्त शस्त्रप्रयोगानें व रोगजंतुनाशक औषधांनींच बऱ्या करितां येतात. ही कल्पना किती चुकीची आहे, हें डा० कुन्हे यांच्या उपायांना जें यश आलें आहे, त्यावरून सहज सिद्ध होतें. आणि विशेषतः अशाच प्रकारच्या व्याधींमध्यें जलचिकित्सेचा प्रभाव केवढा मोठा आहे, हें या गोष्टीची साक्ष पटवितें. पाण्याच्या योगानें जखमा बऱ्या करणाऱ्या प्रघातांचा प्रसार करण्यास डा० कुन्हे यांच्या चिकित्सापद्धतीसारखें दुसरें साधन नाहीं.

डा० कुन्हे यांच्या उपायानें बिलकूल त्रास होत नाहीं एवढेंच नव्हें; तर औषधाच्या योगानें जखमा बऱ्या करण्यास डॉक्टरांना जितका वेळ लागतो, त्याचा एक तृतीयांश देखील वेळ या उपायानें जखमा बऱ्या करण्यास लागत नाहीं; ही गोष्ट डा० कुन्हे यांनीं बरे केलेल्या अनेक उदाहरणांवरून सहज सिद्ध होते. ज्यामध्यें डा० कुन्हे यांच्या उपायानें एखादी जखम बरी झाली नाहीं, असें एकही उदाहरण नाहीं. शिवाय या उपायापासून दुसरा असा एक मोठा फायदा आहे कीं, ज्याप्रमाणें शस्त्रप्रयोगाच्या योगानें विद्रूप चट्टे अथवा वण पडतात, त्याप्रमाणें डा० कुन्हे यांच्या उपायांनीं पडत नाहींत, एवढेंच नव्हे, तर जखमा बऱ्या झाल्यावर त्यांच्या खाणाखुणा देखील मागें राहत नाहींत.

जेव्हां आपल्या शरीराच्या एखाद्या भागास जखम होते,—मग ती मो-

क्षण शस्त्रानें कापल्यामुळें अथवा भोंसकल्यामुळें असो, किंवा ठेंचल्यामुळें, भाजल्यामुळें अथवा गारा, बर्फ इत्यादिकांचा आघात झाल्यामुळें होवो, ती जखम बरी करण्याचा प्रयत्न आपली प्रकृति स्वतःच करूं लागते. व त्या जखमेमुळें झालेल्या मज्जाततूंच्या प्रकोपामुळें, त्या भागाकडे अधिक रक्त व शरीरांतील कांहीं अन्य द्रव्यें वाहतात. या कारणामुळें जखम झालेल्या ठिकाणीं नवीन द्रव्यें आल्यानें जें घर्षण उत्पन्न होतें, त्यामुळें सूज व आग किंवा दाह उत्पन्न होतो. जेव्हां जखम भाजल्यामुळें किंवा शरीराचा एखादा भाग ठेंचल्यामुळें झाली असते, तेव्हां जखमेच्या ठिकाणीं फार वेदना होतात. ती जखम बरी करण्याचा आपल्या प्रकृतीकडून प्रयत्न स्वाभाविकपणें होत असतो, त्यांस आपण मदत केली, तर ती जखम फारच लवकर व कांहींही इजा न होतां बरी होते.

जेव्हां प्रकृति जखम बरी करीत असते, तेव्हांच वर सांगितलेल्या प्रकारच्या वेदना उत्पन्न होतात. या वेदना ह्मणजे जखम झालेल्या भागामध्यें उत्पन्न झालेल्या ( स्थानिक ) ज्वरामुळें होतात.

हा थोडकावेळ असणारा ज्वर त्या जखमेपासून येतो. आपणांस ठाऊक आहेच कीं, कोणताही व्याधि झाला, ह्मणजे त्यास आनुषंगिक ज्वर हा असावयाचाच; त्याचप्रमाणें जखमेसंबंधानेंही आहे. आणि या व्याधीमुळें येणारा ज्वर जरी निराळ्या प्रकारचा असला, तरी हा व्याधि बरा करण्याची रीती शोधून काढणें विशेष अवघड नाहीं.

अशा प्रकारचे रोग बरे करण्यास जखम झालेल्या ठिकाणीं येणारा ज्वर प्रथम नाहींसा करण्यास उपाय योजिले पाहिजेत. व ती जखम जर मोठी असेल, तर हा ज्वर नाहींसा करण्याविषयीं आपण विशेष काळजी घेतली पाहिजे व तो सर्व आंगभर पसरून देण्याविषयीं आपणांस फारच जपलें पाहिजे.

आपणांस हा स्थानिक ज्वर नाहींसा करितां आला, तर जखमेच्या ठिकाणच्या वेदना लागलींच बंद होतील. ज्वर हा शरीरांतील रोग बरे कर-

ण्याचा स्वाभाविक उपाय आहे, ही गोष्ट दुसऱ्या कोणत्याही उदाहरणावरून इतकी स्पष्ट दिसून येत नाहीं. परंतु दुर्दैवानें जेथें जेथें डाक्टरी उपायांची योजना करितात, तेथें तेथें आपणांस नेहमीं असें आढळून येतें कीं, जखमेच्या योगानें आलेला हा ज्वर सर्व आंगभर पसरतो व त्यामुळें जखम भरून येण्यास फारच उशीर लागतो. याचें कारण फार महत्त्वाचें आहे. सशक्त मनुष्याच्या जखमा फारच लवकर व कांहीं त्रास न पडतां बऱ्या होतात. परंतु ज्यांच्या अंगामध्यें दोषिक द्रव्याचा संचय पुष्कळ झालेला असतो व त्याच्या योगानें ज्यांच्या शरीरामध्यें गुप्त जीर्णज्वर असतो, त्या मनुष्यांच्या जखमा लवकर बऱ्या होत नाहींत. व अशा ठिकाणीं त्या जखमेनें शरीरास झालेली इजा व तिच्या योगानें झालेला मज्जातंतूचा क्षोभ, या योगानें जखम झालेल्या भागांत नासण्याची क्रिया फार जारीनें चालू होते; परंतु जेव्हां अशी गोष्ट घडून येत नाहीं, तेव्हां देखील जखम लवकर बरी होत नाहीं. कारण शरीरांतील धमन्यांतून जखम झालेल्या भागांमध्यें अधीक रक्त जातें व त्यायोगानें त्या भागांत विजातीय द्रव्याचा संचय बराच होतो, ह्मणून अशा ठिकाणीं दोषिक द्रव्याचा संचय फार होऊन त्या जखमेंत पू होतो व ती जखम वाहूं लागते.

या विषयासंबंधानें डा० कुन्हे लिहितात. मला नेहमीं असें आढळून आलें आहे कीं, जर एखाद्या जनावरास जखम झाली व ती बरी करण्याविषयीं जरी कांहीं उपाय योजिले नाहींत, तरी ती जखम फारच थोड्या वेळांत बरी होते. ह्या अगदीं नेहमीं घडून येणाऱ्या गोष्टीविषयीं विचार करीत असतां, जनावरांच्या जखमा बऱ्या होण्यास जितका वेळ लागतो व मानवी प्राण्यांच्या जखमा बऱ्या होण्यास जितका वेळ लागतो, यांमध्यें जें महदंतर आहे, तें पाहून मी आश्चर्यचकित झालों; व त्यायोगानें सृष्टीच्या गूढ नियमांच्या संबंधानें शोध करण्यास मी प्रवृत्त झालों. बहुतेकांच्या समजुतीप्रमाणें पूर्वीं माझाही समज असा होता कीं, मनुष्यप्राणी हा **शस्त्रविद्या व औषधी विद्या** यांमध्यें प्रवीण असल्याकारणानेंच त्यास मदत

करण्यास व काळजी घेण्यास मायेचीं मनुष्यें मिळत असल्याकारणानें, त्यास जखम झाली असतां ती जखम लवकर बरी होत असेल, परंतु अशावेळीं जनावरांची तशी स्थिति नसल्यामुळें त्यांची अवस्था फारच शोचनीय होत असेल, त्यांचे फारच हाल होत असतील व त्यांची जखम लवकर बरी होत नसेल. परंतु अनुभवाअंतीं हा समज खोटा ठरला; कारण मला असें कळून आलें कीं, जनावरांच्या जखमा दवाखान्यांतील रोग्यांच्या जखमांपेक्षां पुष्कळ लवकर बऱ्या होतात. पुष्कळ उदाहरणांचें लक्षपूर्वक अवलोकन केल्यावर माझी अशी खात्री झाली आहे कीं, ह्या ज्या गोष्टी घडतात त्या केवळ काकतालीय न्यायानेंच घडतात असें नाहीं, तर त्यांचीं दुसरीं मोठीं सबळ कारणें आहेत. ही गोष्ट स्पष्ट करून दाखविण्याकरितां कांहीं उदाहरणें खालीं दिलीं आहेत."

एक मांजर एका लोखंडी सांपळ्यांत आडकलें, व त्याच्यायोगानें त्या मांजराचा उजवा पाय मांडीच्या भागाच्या सुमारास मोडला, व त्या सांपळ्यांतून सुटून जाण्याचा प्रयत्न करीत असतांना, तें मांजर सांपळ्यासकट पळत होतें, व त्या धडपडीमध्यें तो दुखापत झालेला पाय पुष्कळ वेळा मुरगळून आडवा तिडवा झाला होता, व त्या जखमेवर पुष्कळ धूळ व केर येऊन बसला होता. नंतर एका मनुष्यानें त्या मांजराला सांपळ्यांतून सोडविलें, त्याबरोबर तें मांजर तो दुखावलेला पाय वर लोंबत धरून तीन पायांवर लंगडत लंगडत जोरानें पळत गेलें. कांहीं दिवसपर्यंत तें मांजर कोठेंच दृष्टीस पडलें नाहीं, त्यामुळें तेथील सर्व लोकांस तें मांजर मेलें असावें असें वाटलें.

परंतु सात आठ दिवसांनीं एक मरतुकडें व अजारी असें मांजर जवळ असलेल्या एका धान्याच्या कोठारांत आढळून आलें. त्याकडे कांहींवेळ पाहिल्यावर अशी खात्री झाली कीं, तें मांजर पूर्वी सांपळ्यांत अडकलेलें होतें तेंच आहे, अशी खात्री झाली. व आश्चर्यकारक गोष्ट ही कीं, तेवढ्या वेळांत त्या मांजराचा पाठीमागील पाय बरा झाला होता; परंतु जेथें पाय मो-

डला होता, त्याठिकाणीं बरीचशी सूज आलेली होती. व त्या मांजराच्या रोडकेपणावरून असें स्पष्ट दिसून येत होतें कीं, त्यानें सबंध आठवडाभर कांहीं खाल्लें नव्हतें, इतकें होतें तरी त्याच्यापुढें ठेवलेल्या सुग्रास अन्नास व पाण्यास त्यानें स्पर्श देखील केला नाहीं. त्यानें आपला दुखावलेला पाय एकदां जो ताठ करून ठेविला होता, तो त्यानें हालवला नाहीं व ती जखम तें वारंवार चाटीत असे. तें मांजर ती जखम वारंवार चाटी, ह्यावरून असें दिसतें कीं, त्यायोगानें त्याचें दुःख कमी होत असे. तें मांजर उपाशी कां राहत होतें, त्याबद्दल मोठें सबळ कारण होतें. आपणांस माहीत आहे कीं, अन्नाचें पचन होण्यास जें रूपांतर होतें, ती एक नासण्याची क्रिया आहे; व ही क्रिया होत असतांना उष्णता उत्पन्न होते. यावेळीं त्या जखमेस थंडावा आणण्यास त्या प्राण्याजवळ पाणी नसल्यामुळें त्यानें अन्न खाण्याचेंच मुळीं सोडून दिलें. अशाकरितां कीं, अन्न खाण्यापासून अंगांत उष्णता जास्त होऊं नये. ही गोष्ट त्या प्राण्यास उपजतबुद्धीनेंच कळली. पुढें कांहीं दिवसांनंतर तें मांजर बाहेर येऊं लागलें, परंतु त्या वेळेस त्याचा फक्त अस्थिपंजर राहिला होता, परंतु त्यानें थोडकें दूध प्याल्यावर तें फिरून ताजें तवानें झालें. व एक महिन्यानंतर तें मांजर पूर्वीप्रमाणें गुटगुटीत व तयार झालें. त्या जखमेच्या ठिकाणीं फक्त एक मांसाचा कठीण गोळा राहिला होता, परंतु त्यायोगानें त्याला चालण्यास बिलकूल त्रास होत नव्हता.

आतां कल्पना करा कीं एका मनुष्यास अशी जखम झाली आहे. व रोगजंतुनाशक औषधें लावून बरी करण्याच्या डॉक्टराच्या पद्धतीप्रमाणें या जखमेस उपाय केले असते, तर काय प्रकार झाला असता बरें! बहुतकरून तो भाग कापून टाकावा लागला असता, व ती जखम बरी होईपर्यंत त्यास कित्येक महिने खितपत पडावें लागलें असतें; व पुढें सर्व जन्मभर लंगडेच रहावें लागलें असतें. परंतु समजा कीं, एखाद्या कुशल वैद्यानें मोठ्या चतुराईनें पाय न कापतां ती जखम बरी केली असती, तरी तो जखम झालेला पाय नेहमीं ताठ राहिला असता व पाय वळविण्यास फार श्रम पडले असते.

आणखी एक जनावर कसें बरें झालें त्याची हकीकत सांगतों. त्याजवरून डा० कुन्हे यांच्या जखमा बऱ्या करण्याच्या उपचाराची उपयुक्तता दिसून येईल. एक कुत्रा छरे लागून जखमी झाला. मागच्या व पुढच्या पायांत बरेच छरे गले होते, व दोन छरे तर मानेच्या उजव्या बाजूंत घुसून डाव्या बाजूच्या कातड्यांत शिरले होते. श्वासनलिकेला व रक्तवाहिन्यांना मात्र कोणत्याही तऱ्हेनें इजा झाली नव्हती. जखमा दुखूं लागल्या कीं, तो कुत्रा दलदलीच्या व सावलीच्या जागीं जाई व आपलें अंग व विशेषेंकरून जखमी झालेले भाग, ओलसर मातीवर पुनः पुनः घांसून गार करी. तो जखमा सारख्या चाटीत असे. त्यानें खाणें अगदीं सोडून दिलें होतें. फक्त दिवसांतून दोनदां पाणी पिण्यास जवळच्या तळ्यांत जात असे. एवढ्यानें तो लवकर बरा झाला. तो पायाच्या जखमा चाटीत असे. व त्याच जखमा पांच दिवसांत बऱ्या झाल्या. फक्त सूज मात्र राहिली होती. मान त्याला चाटतां येत नसे व ती जरी पायाइतकी दुखावली नव्हती, तरी ती उशीरानें बरी झाली. एक आठवडाभर त्या कुत्र्यानें कांहीं खाल्लें नाहीं, इतक्या वेळांत मानही बरी झाली. छरे कांतडें, व स्नायू यांच्यामध्येंच अडकून राहिले होते.

आणखी एक तिसरें उदाहरण सांगतों. एका मोठ्या न्यूफाउंडलंड कुत्र्याच्या उजव्या पंजावरून एका कोळशानें लादलेल्या जड गाडीचें चाक गेलें, व त्यामुळें त्याचा पंजा चेंगरला गेला. त्या पंजावरील कातडें निघून गेलें होतें व आंतील हडूक फुटलें होतें. म्हणून त्याला घरीं न्यावें लागलें. घरीं आल्यावर तो कुत्रा सावलीचे ठिकाणीं गेला, आणि आपला दुखावलेला पंजा सारखा चाटीत बसला. तो कुत्रा तीन दिवसपर्यंत अन्नास शिवला देखील नाहीं. तेवढ्या वेळांत तीन पायांवर चालतां येण्याइतकी ती जखम बरी झाली होती. वीस दिवसांनीं ती जखम अगदीं पूर्णपणें बरी झाली.

ह्या तीन उदाहरणांपासून आपणांस मनुष्यांच्या जखमा बऱ्या कशा कराव्यात, अशाविषयीं पुष्कळ उपयुक्त अनुमानें काढतां येतील. पाण्याच्या

पट्ट्यांनीं जखमेस थंडावा आणणें, लंघन करणें, किंवा निदान शरीरांत उष्णता वाढविणारें अन्न न खाणें, हें जखमा बऱ्या करण्याचे स्वाभाविक उपाय आहेत.

हल्लीं दवाखान्यांतून शस्त्रवैद्य जी पद्धत उपयोगांत आणितात व ज्या पद्धतीप्रमाणें रोग्याच्या अंगांत ताकद राहवी म्हणून मांस, सागुती, अंडीं, दूध, दारू वगैरे अतिशय पुष्टिकारक अन्न रोग्यास खावयास सांगतात, ती रीत अगदीं चुकीची आहे. असें अन्न रोग्यास खावयास देणें फार अपायकारक आहे. व असें करणें हें प्रकृतीस जें पाहिजे असतें, त्याच्या अगदीं उलट प्रकारचें आहे. माझें मत असें आहे कीं, जखम झाल्यावर प्रथम शरीरास कोणत्याही प्रकारचे श्रम पडणार नाहींत, अशी व्यवस्था करणें हें फार इष्ट आहे, कारण शरीरास श्रम पडले असतां त्यांपासून जखम बरी करण्याच्या प्रकृतीच्या प्रयत्नास मध्यें आडथळा होतो.

कॅर्बोलिक ॲसिड, आयोडाईन, कोकेन वगैरे औषधें देऊन डाक्टर लोक जखमा बऱ्या करूं पाहतात. यावरून शरीरांतील सर्व क्रिया कोणत्या प्रकारें चालतात व जखमा बऱ्या कशा कराव्या, याविषयीं आपण किती अज्ञानी आहोंत, हें ते जगास उघड करून दाखवितात. जलचिकित्सेपासून जखमा कशा उत्तम रीतीनें बऱ्या होतात, हें न जाणून शस्त्रवैद्य नेहमीं भलत्याच मार्गाचें अवलंबन करितात. आपल्या प्रकृतीसच रोग बरा करण्यास लावण्याची रीत त्यांना माहितच नाहीं. आतां प्रस्तावनेदाखल इतकें सांगितल्यावर आपण निरनिराळ्या प्रकारच्या जखमा कशा बऱ्या कराव्या याविषयीं विचार करूं. या भागांत डा० कुन्हे यांनीं बऱ्या केलेल्या कांहीं रोग्यांची हकीकतही देण्यांत येईल. कापल्यामुळें, टोंचल्यामुळें, ठेंचल्यामुळें व ओरखडल्यामुळें शरीरास जखम होते, तेव्हां शरीरांतील लहानमोठ्या रक्तवाहिन्यांचीं तोंडें मोकळीं होतात व शरीरांतील दाबामुळें, त्यांतील रक्त बाहेर पडूं लागतें, हें रक्त हवेचा बाह्य दाब व शरीराचा आंतील दाब, समतोलन झाल्याशिवाय बंद होत नाहीं. आणि जखमा बऱ्या करण्याच्या रीती-

संबंधानें ह्या गोष्टीचें महत्त्व फार असल्यामुळें आपणांस ह्याविषयीं बराच विचार केला पाहिजे. आपणांस माहीत आहे कीं, आपणाभोंवतीं जें वातावरण आहे, त्याचा आपल्या शरीरांतील प्रत्येक चौरस इंच जागेवर १४ पौंडांचा दाब आहे. या दाबाचें आपल्या शरीरांतील दाबाच्या योगानें जर आपणास समतोलन करितां आलें नसतें, तर आपणांस हवेचा दाब मुळींच सोसतां आला नसता. डोंगर चढून जातांना हवेच्या दाबामध्यें जो फेरफार पडतो, त्याचा अनुभव पुष्कळांस असेलच. अतिशय उंच पर्वतावर, अथवा विमानांतून हिंडतांना, हवेंतील दाब इतका कमी होतो कीं, त्याच्यानें शरीरांतील दाबाचा प्रतिकार होत नाहीं, व त्यामुळें शरीरांतील दाबाचा जोर वाढून व कधीं कधीं नाकांतून, तोंडांतून, डोळ्यांतून व कानांतून, रक्त जोरानें बाहेर येऊं लागतें. परंतु बाहेरील हवेचा दाब, व शरीरांतील दाब यांचें समतोलन झालें ह्मणजे रक्त वाहण्याचें बंद होतें. जेव्हां शरीरास एखादी जखम होते, तेव्हां जें रक्त शरीरांत वहात असतें, त्यास जो विवक्षित मर्यादेच्या आंत ठेवणारा पडदा त्यास भोंक पडतें व त्यामुळें जखम झाल्याबरोबर रक्त वाहू लागतें. जखम झाल्याबरोबर रक्ताचा प्रवाह प्रथम बंद करणें, हें आपलें पहिलें काम आहे. रक्ताचा बाहेर येण्याचा जोर हा जखमेचा विस्तार व खोली यांवर, व जखमेबरोबर लहान किंवा मोठ्या रक्तवाहिन्या कापल्या गेल्या असतील, त्यावर अवलंबून असतो. आपण रक्त वाहून देण्याकरितां जखमेचा वरचा भाग होतां होईल तों घट्ट बांधूं नये, कारण त्यामुळें शरीरांतील रुधिराभिसरणास अडथळा होतो. यापेक्षां चांगले असे दुसरे पुष्कळ उपाय आहेत कीं, ज्यांच्या योगानें बंधनानें रक्त थांबविण्याची अवश्यकता रहात नाहीं. बंधनानें रक्त फक्त जेव्हां जखमेच्या योगानें एखादी मोठी रक्तवाहिनी फुटली असेल व त्यांतून फार रक्त वहाण्याच्या योगानें कदाचित् मृत्यु येण्याचा संभव असेल, किंवा अवश्य लागणारे असे दुसरे पदार्थ जवळ नसतील, त्याच वेळेस फक्त अशा बंधनांचा उपयोग करणें वाजवी होईल.

जखम झाली असतां जो रक्तस्राव होतो, त्यानें वेदना उत्पन्न होतात. यास्तव योग्य उपायानें रक्तस्राव बंद केला ह्मणजे या वेदना बंद होतात.

या कामासाठीं थंड पाण्याच्या पट्ट्यांसारखें दुसरें उत्तम साधन नाहीं. थंड पाण्याची पट्टी जखम झालेल्या ठिकाणीं बरेच वेढे देऊन गुंडाळली. ह्मणजे रक्त वाहण्याचें बंद होतें व त्याबरोबरच त्या ठिकाणच्या वेदनाही बंद होतात, अशा वेळीं शक्य असेल तर जखम झालेला भाग वेदना कमी होईतोंपर्यंत थंड पाण्यांत धरावा. वेदना कमी होण्यास कधीं कधीं पुष्कळ तासही लागतात. परंतु असें करणें जर शक्य नसेल, तर त्या जखमेस थंडावा आणण्याकरितां त्या जखमेवर सारखी अगर मधून मधून थंड पाण्याची बारीक धार धरावी.

बांधण्याची पट्टी किती जाड—ह्मणजे तिच्या किती घड्या केल्या—पाहिजेत, हें त्या जखमेवर—ह्मणजे रक्ताच्या जोरावर अवलंबून आहे. जखम जर लहान असेल, तर पट्टी दोन-चार-किंवा सहा पदरी ( घड्यांची ) असावी; व मोठी असेल तर बंधनाची पट्टी दहा-पंधरा वीस किंवा तीस पदरी देखील घ्यावी. परंतु मोठ्या जखमेवरील पट्टी जर फारच पातळ ( कमी घड्यांची ) असेल, तर त्या पट्टीच्या योगानें जखमेंतील रक्त वाहण्याचेंही थांबणार नाहीं, व ती जखम लवकर बरीही व्हावयाची नाहीं. आतां ती पट्टी फार जाडही असूं नये. आपलें बोट कापलें असलें व त्यावर आपण वीस घड्यांची पट्टी बांधली तर ती जखम बरी होण्यास जो वेळ लागेल, त्याच्यापेक्षां कमी वेळ चार पदरी पट्टी बांधली असतां लागतो.

तागाची पट्टी एवढी मोठी असावी कीं, ती जखमेच्या पलीकडे १ इंचापेक्षां अधिक येऊं नये, ह्यायोगानें जखम बरी होत असतांना जखमेजवळील भागांतील रुधिराभिसरणास अडथळा येणार नाहीं, असें करणें हें फारच महत्त्वाचें आहे. त्या ओल्या पट्टीभोंवतीं एका लोकरीच्या कापडाच्या पट्टीचे एक दोन अथवा अधिक वेढे गुंडाळावे. ह्यायोगानें ती पट्टी जागच्या जागीं रहाते व निसटून जात नाहीं, आणि जखम झालेल्या भागा-

वरचा दाब कमी-जास्त करितां येतो. शिवाय या पट्टीच्या योगानें शरीरांत जेवढी उष्णता नेहमीं लागते, तेवढी उत्पन्न करितां येते. बांधण्यापूर्वी ती पट्टी स्वच्छ थंड व शक्य असेल तर क्षाररहित पाण्यांत बुडवावी व किंचित् पिळून मग बांधावी जोंपर्यंत त्या पट्टीच्या योगानें तो भाग थंड राहील तोंपर्यंत ती जखम फारशी दुखणार नाहीं. जेव्हां ती पट्टी वाळून जाईल, तेव्हां ती फिरून थंड व स्वच्छ पाण्यांत बुडवावी व जर जखम झालेला भाग दुखूं लागला, तर अधिक गार पाण्याची पट्टी लाविली पाहिजे. ही गोष्ट विशेषतः प्रथम वारंवार केली पाहिजे.

पण कांहीं वेळीं एकसारख्या पट्ट्या बदलणें, हें हितावह होणार नाहीं व अशा वेळीं जखमेस ओल्या मातीची पट्टी बांधणें अधिक हितावह आहे. ही तयार करण्याकरितां थोडी केर काढलेली माती एका भांड्यांत घालावी. व त्यांत गार पाणी आतून ती खळीप्रमाणें दाट होईपर्यंत ढवळावें. हें मिश्रण एका तागाच्या कपड्यावर पसरावें. व त्या पट्टीचा चिखल लावलेला भाग मांसाकडे करून ती पट्टी नीट रीतीनें जखम होतांक्षणींच जखमेवर बांधावी. कांहीं तासांनंतर ती पहिली पट्टी काढून तिच्या जागीं तिच्याचसारखी दुसरी एक पट्टी बांधावी. व्रण, भगंदर व जखमेमध्यें कुजलेल्या मांसाचे गोळे बनणें इत्यादिकांसही हाच उपाय करावा.

**जलचिकित्साशास्त्राच्या** खऱ्या ज्ञानाशिवाय कांहीं जुन्या मताच्या डॉक्टरांनीं कांहीं दिवसांपूर्वीं पाण्याच्या पट्ट्यांनीं जखमा बऱ्या करण्याच्या रीतीमध्यें कांहीं सुधारणा केली आहे व ती ही कीं, पाण्याच्या पट्टीच्या व लोकरीच्या पट्टीमध्यें एक इंडिया रबरचा तुकडा घालणें हा होय. अशा प्रकारच्या पाण्याच्या पट्ट्यांचा फारसा उपयोग होत नाहीं. कारण त्या रबराच्या योगानें पट्टींतील पाण्याची वाफ होत नाहीं व शरीराचा घाम निघून जात नाहीं, अशा प्रकारची जलचिकित्सा अगदीं भ्रांतिकारक किंवा निरुपयोगी आहे. अशा प्रकारच्या पट्ट्यांच्या योगानें आपणांस पाहिजे तो गुण कधींही येणार नाहीं; व हा उपाय कोणींही योजूं नये, अशी सर्वांना विनंति आहे.

अनुत्तेजक पदार्थांचा आहार करण्यापासून जखम बरी करण्यास किती मदत होते, हें आपणांस कळलेंच आहे. आणि अन्न जितकें कमी खाऊं व खाण्याचे पदार्थ जितके अनुत्तेजक असतील, तितकी लवकर जखम बरी होऊं लागते. बिन चाळलेल्या पिठाची भाकर, फळें व पाणी हाच आहार उत्तम होय. जें अन्न फारच लवकर व अल्पायासानें पचतें, तेंच अन्न उत्तम; कारण तें खाल्ल्यानें शरीरांत फारशी उष्णता उत्पन्न होत नाहीं. ह्या जखमा बऱ्या करण्यासंबंधानें ही फार महत्त्वाची गोष्ट आहे.

जखमा लवकर बऱ्या करण्यास **कुक्षिस्नान** व **उपस्थस्नान** हे दुसरे उपाय आहेत. या स्नानांच्या योगानें जखमेंतील उष्णता कमी होते व जखम झालेल्या भागांत ( स्थानिक ) ज्वर उत्पन्न झाला असेल, तर तोही कमी होतो. त्याचप्रमाणें या उपायानें शरीरामध्यें जोम व तरतरी उत्पन्न होऊन जखम लवकर बरी होईल; व ज्यांच्या शरीरांत दोषिक द्रव्य सांठलें आहे, त्यांनीं हीं स्नानें घेणें अत्यावश्यक आहे. वर जें काय म्हटलें आहे, तें खालीं दिलेल्या उदाहरणावरून चांगलें समजून येईल.

एका गिरणींतील ४९ वर्षांच्या मनुष्याचा डावा हात एका वाटोळ्या फिरत्या करवताखालीं सांपडला व त्यामुळें अंगठा व तर्जनीमधील मांसाचा भाग फाटला व तें मांस करवतास आडकून राहिलें. सुदैवेंकरून त्याच्या हाडास बिलकूल इजा झाली नव्हती. ही जखम झाल्यावर कांहीं मिनिटांनीं तो बेशुद्ध होऊन पडला व अर्धा तासपर्यंत तो शुद्धीवर आला नाहीं. तो बेशुद्ध असतांना त्याच्या जखम झालेल्या हाताभोंवतीं एकानें तागाच्या कापडाच्या सद्र्याचे पुष्कळ वेढे गुंडाळले, व त्याच्या योगानें रक्त येण्याचें बहुतेक बंद झालें होतें. अशा रीतीनें बांधलेला त्याचा हात थंड पाण्याच्या भांड्यांत बुडवून ठेविला होता. अशा योगानें त्याचें दुःख एका तासांत पुष्कळच कमी झालें, आणि दुसऱ्या दिवशीं तर तें अगदींच नाहींसें झालें. पहिल्या प्रथम थंड पाण्यानें जखम गार ठेवण्याचा उपाय एकसारखा करावा लागला; परंतु चवथ्या दिवशीं त्या जखमेभोंवतालची पट्टी लहान केली

व हाताचा बराच भाग मोकळा ठेविला. नंतर एक २० पदरीं घडी त्या जखमेवर बांधली, व ती घट्ट बसण्याकरितां एक लोंकरीची पट्टी सबंध हातावर बांधली, त्या योगेंकरून संबंध हातांत उष्णता उत्पन्न झाली व रक्त मोकळेपणें सबंध हातभर वाहूं लागलें. पहिल्या प्रथम दर अर्ध्या तासाला पट्टी थंड पाण्यानें ओली करावी लागत होती. परंतु नंतर अधिक अवधीनें ओली करावी लागत होती. १९ दिवसांत ती जखम इतकी बरी झाली कीं, प्रत्यक्ष त्या जखमेस उपचाराची अवश्यकता नाहींशी झाली. तो मनुष्य आपल्या हातानें काम करण्याइतका चार आठवड्यांत बरा झाला. येथें हेंही सांगितलें पाहिजे कीं, त्या रोग्यानें जखम झाल्याच्या दुसऱ्या दिवसापासून शीतस्नानें दिवसांतून दोन वेळ घेण्यास सुरवात केली होती, व त्यांचा बरें होण्यास फारच उपयोग झाला. कारण त्या रोग्याची प्रकृति पूर्वीं बरीच वाईट होती. जर त्यानें जखमेवर विषजंतुनाशक औषधांचा उपयोग केला असता तर ती जखम बरी होण्यास पुष्कळ वेळही लागला असता, व दुःखही फार सोसावें लागलें असतें. डॉक्टरानें बहुतकरून ती जखम शिवली असती व त्या योगें आंगठा खात्रीनें ताठ व बधीर झाला असता.

डा. कुन्हे यांच्या उपायानें या मनुष्याची जखम फार लवकर बरी झाली एवढेंच नव्हे, तर त्या जखमेच्या योगानें अंगावर चट्टाही मुळींच राहिला नाहीं. ती जखम जरी पहिल्या प्रथम फार मोठी होती, तरी ती आंतून आपोआप बरी होत आली, व जखमेभोंवतालचा भाग कांहीं वेळानें आपोआप गळून पडला. या जखमेच्या योगानें कांहीं ज्ञानतंतु तुटल्यामुळें, आंगठ्याच्या वरच्या अर्ध्या भागाचें स्पर्शज्ञान कांहीं वेळपर्यंत नाहींसें झालें, आणि ह्मणून त्या रोग्यास कांहीं महिनेपर्यंत बारीक बारीक पदार्थ आंगठ्याच्या योगानें उचलतां येत नव्हते; परंतु रोज कांहीं वेळां शीतस्नानें केल्यांवर तुटलेल्या ज्ञानतंतूंचा संबंध फिरून जडला व फिरून तर्जनीस स्पर्शज्ञान आलें.

## खरचटणें, ओरखडा निघणें, ठेंचणें इत्यादि कारणांमुळें होणाऱ्या जखमा.

पूर्वीं सांगितलेले उपाय सदरहू प्रकारच्या जखमांवरही चांगले लागू पडतात. कधीं कधीं खरचटल्यामुळें ठेंचल्यामुळें किंवा शरीराच्या आंतील भागास इजा झाल्यामुळें, रक्तामध्यें त्या जागीं गांठी बनतात व त्या योगानें सर्व इंद्रियांमध्यें बिघाड होतो. जेव्हां बाह्य उपचारानें आंतील जखमा बऱ्या होण्याचा संभव असतो, त्या वेळेस डा० कुन्हे यांचीं **शीतस्नानें** यांपासून फार उपयोग होतो. त्यांच्या योगानें शरीरांतील उष्णता कमी होते एवढेंच नव्हे, तर आंतील ज्ञानतंतूंची तरतरी वाढून ते सशक्त होतात. शीतस्नानानें ज्यांच्या शरीरांतील गोंठलेलें रक्त व कुजलेलीं कांहीं द्रव्यें लवकर बाहेर पडत नसतील, त्यांच्या जखम झालेल्या भागास वाफारा दिल्यानें फार उपयोग होतो. परंतु त्या वाफाऱ्यानंतर **शीतस्नान** फिरून करावें लागतें, हें ध्यानांत ठेविलें पाहिजे. वाफाऱ्यांच्या योगानें शरीरांतील नासलेलीं द्रव्यें बाहेर पडण्यास मदत होते.

एका मुलीच्या उजव्या हाताचें बोट पायमौजे वगैरे शिवण्याच्या यंत्रांत सांपडून चेंगरून भोंक पडलें होतें. ती औषध घेण्याकरितां डा. कुन्हे यांचेकडे गेली. जखम झाल्यापासून पहिले कांहीं आठवडे ती एका डाक्टरचें औषध घेत होती, व जरी त्या डाक्टरानें होते नव्हते तेवढे उपाय करून पाहिले, तरी जखम मुळींच बरी झाली नाहीं. त्यानें जखम बरी करण्याकरितां **आयडोफॉर्म, कॅर्बॉलिक, सॉलिसीलिक** वगैरे औषधांचा उपयोग केला होता, व शेवटीं तुझें बोट अथवा हात कापून काढावा लागेल, असें देखील तिला त्यानें सांगितलें. त्या मुलीला त्या जखमेपासून फारच इजा होत होती, व बोटाची सूज इतकी वाढली कीं, बोट अगदीं काळें निळें दिसूं लागलें होतें. २ आठवड्यांनीं तिचा सगळा हात सुजला व तो देखील बोटाप्रमाणें काळा निळा दिसूं लागला. सरतेशेवटीं त्या डाक्टरनें तिला हात कापवून घेण्याचें धैर्य तुझ्या अंगांत आहे किंवा नाहीं हें विचारिलें. ह्या प्र-

श्याच्या योगानें ती फारच भ्याली व डा० कुन्हे यांच्याकडे गेली. डा० कुन्हे यांनीं लगेच थंड पाण्याची पट्टी तिच्या हाताभोंवतीं गुंडाळली व हातास रोज दोनदां वाफारा देण्यास सांगितलें व शीतस्नान करण्यास सांगितलें. ह्या उपचारानंतर दोन तासांतच हाताचें सगळें दुःख नाहींसें झालें, व पुरा बरा होईपर्यंत तिचा हात मुळींच दुखला नाहीं. हाताची व बोटाची सूज सारखी तासातासास उतरत चालली होती, व दोन दिवसांनीं तर तिचा हात पहिल्याप्रमाणें झाला, व वर्णही पूर्वीप्रमाणें झाला. तीन चार आठवड्यांनीं घरांतील काम करण्याइतका तिचा हात बरा झाला.

अशा प्रकारें डॉक्टरास एक मजेचा शस्त्रप्रयोग करण्याचा प्रसंग आलेला गेला हें खरें, परंतु ती गरीब बिचारी मुलगी सर्व जन्मभर थोटी होण्याचा प्रसंगही चुकला.

एका सुताराच्या हातास दुखापत होऊन तो डा० कुन्हे यांच्याकडे उपचाराकरितां गेला. त्याचा डावा हात दोहींकडून चिरला होता व त्याच्या हातास जखम झाली होती. जखमेवर जे उपाय डॉक्टर करितात त्यापासून होणाऱ्या वाईट परिणामांचा अनुभव त्यास आल्यामुळें विषजंतुघ्न औषधांनीं जखमा बऱ्या करण्याच्या डॉक्टरांच्या पद्धतीवर त्याचा विश्वास नव्हता, ह्मणून तो डा० कुन्हे यांजकडे गेला. त्याचा खांद्यापर्यंत हात इतका सुजला होता कीं, त्यास तो हालवितां देखील येत नव्हता. परंतु डा० कुन्हे यांच्या औषधानें तीन तासांनीं त्याचें दुःख बरेंच कमी झालें व आठ्ठेचाळीस तासांनीं त्याची सूज अगदींच नाहींशी झाली. पंधरा दिवसांनंतर आपलें काम करण्याइतका तो बरा झाला.

खरें पाहूं गेलें असतांना विषजंतुघ्न औषधानें पूर्णपणें जखम बरी होत नाहीं, तथापि ती कांहीं बरी होते, हें खालील दोन उदाहरणांवरून स्पष्ट दिसून येतें.

एकाच यंत्रावर काम करणाऱ्या मुलींच्या पुढल्या बोटाला सारख्याच रीतीनें जखम झाली होती. टोंकापासून पहिल्या सांध्यापर्यंतचें हाड मोडून त्याचा चूर झाला होता. परंतु बाकीच्या बोटांस कांहीं इजा झाली नाहीं.

त्या मुली वयानें व प्रकृतीनें सारख्याच होत्या; त्यांपैकीं एक मुलगी डाक्टराकडे औषध घेण्यास गेली, व त्यानें त्या जखमेवर विषजंतुघ्न औषधांचा उपयोग केला. ती दुसरी मुलगी डा० कुन्हे यांचेकडे गेली. त्या डाक्टरानें बोटांतील मोडलेल्या हाडाचे तुकडे लागलींच काढून टाकले. हा प्रयोग करीत असतांना त्या ठिकाणीं त्यानें आयडोफॉर्माची पूड भरली. त्या मुलीला पुष्कळ दुःख सोसावें लागलें, तरी तिचें बोट एक आठवड्यांत फारच जरूर लागली तर काम करतां येईल इतकें बरें झालें. ह्या शस्त्रक्रियेच्या प्रयोगामुळें बोटाचा पहिला सांधा अगदीं बिघडून गेला होता व सर्व बोट अगदीं विद्रूप दिसूं लागलें होतें. जेव्हां हवेंत फेरफार होत, तेव्हां त्या जखमेच्या ठिकाणीं फार वेदना होत, असें पुष्कळ वर्षे होत होतें. ह्या वेदना वाईट रीतीनें शस्त्रप्रयोग केल्यामुळें व प्रयोग करीत असतांना विजातीय द्रव्याचा उपयोग केल्यामुळें होत होत्या.

जी मुलगी डा० कुन्हे यांचें औषध घेत होती, तिची स्थिति याहून फार चांगली होती. डा० कुन्हे यांचा पहिला प्रयत्न वेदना कमी करण्याचा होता, व पहिल्याच दिवशीं त्यांना ह्या प्रयत्नांत यश आलें. वेदना कमी करण्याकरितां ओल्या कापडाची पट्टी त्या मुलीच्या बोटास बांधिली. त्या मुलीच्या अंगांत विजातीय द्रव्य फार सांचलें असल्यामुळें, तिला शीतस्नानें करणें अत्यावश्यक होतें. दुसरे कोणतेही उपचार न करितां व कांहींएक त्रास न होतां, तें मोडलेलें हाड तिसरे दिवशीं आपोआप बाहेर पडलें. सहावे दिवशीं मोडलेल्या हाडाचा सगळ्यांत मोठा दुसरा तुकडा बाहेर निघाला; व एका महिन्यांत ती मुलगी काम करण्याजोगी झाली. दीड महिन्यानें तें बोट अगदीं बरें झालें, त्याचें स्पर्शज्ञान नाहींसें झालें नाहीं, व तें विद्रूपही झालें नाहीं, व जखमेच्या जागीं व्रणही राहिला नाहीं. हवेंतील फेरफाराच्या योगानें त्या ठिकाणीं फिरून आजपर्यंत वेदना देखील झाल्या नाहींत. मग कोणता चिकित्सक अधिक चां-

आणखी एका रोग्याचीही हकीकत अशीच बोधप्रद आहे. १८७९ सालीं एका गृहस्थाचा डावा पाय घोंट्यांत मोडला, ह्यामुळें त्या रोग्यास अंथरुणास खिळून रहावें लागलें, व त्याच्या पायास मलमाचे उपचार सुरू होते, तो पाय बरा झाला, तरी तो अशक्त राहिला, व सूज तशीच राहिली. चालतांना तो पाय वरचेवर मुरगळत वांकडा होई, व त्यायोगानें फारच वेदना होत असे. तो मनुष्य चालतांना स्पष्ट दिसून येत होतें. त्या मनुष्याची प्रकृति रोगट व अशक्त होती. त्यानें डा० कुन्हे यांचे उपचार १८८९ चे मार्च महिन्यापासून सुरू केले, व ते त्यास फार गुणकारक वाटल्यावर त्यानें ते बरेच दिवस तसेच सुरू ठेविले.

जेथें पुष्कळ वर्षांपूर्वी त्याच्या पायाला दुखापत झाली होती, तेथें १८९०चे ' आरंभास सूज व आग उत्पन्न होऊं लागली, व त्याठिकाणीं वेदना होत होत्या. डा० कुन्हे यांच्या उपायांच्या योगानें त्या वेदना चवथे दिवशीं अगदीं नाहींशा झाल्या; व त्यावेळेस पायाच्या घोंट्यांतील व शरीरांतील अशक्तपणा नाहींसा झाला. बारा वर्षांपूर्वी झालेली पुरी बरी न केलेली अशी जखम डा० कुन्हे यांच्या उपायानें कशी पूर्णपणें बरी होते, हें ह्या उदाहरणावरून आपणांस दिसून येतें.

**आंग भाजणें**—भाजून झालेल्या जखमांपासून बहुतकरून ज्या वेदना होतात, त्या वेदना कमी करण्यास थंड पाण्याच्या पट्ट्या फार उपयोगीं पडतात. दुःख अगदीं नाहींसें करण्यास ती जखम कित्येक वेळां पुष्कळ तासपर्यंत पाण्यामध्यें धरावी लागते. पण जखम जर फक्त थोडावेळच थंड पाण्यांत धरली तर दुःख कदाचित् जास्ती वाढतें, परंतु तें सहन करून तें अगदीं नाहींसें होईपर्यंत जखम पाण्यांत धरली पाहिजे. भाजल्या ठिकाणची आग कमी झाली ह्मणजे, मग जखमांप्रमाणें त्यांवर थंड पाण्याची पट्टी बांधावी. कारण झऱ्याच्या पाण्यामध्येंही अशी कांहीं द्रव्यें असतात कीं, त्याच्या योगानें जखम बरी होण्यास उशीर लागतो व दुःख अधिक होतें, ह्मणून झऱ्याच्या पाण्यापेक्षां नदीचें किंवा पावसाचें पाणी; हें जखम

थंड करण्यास अधिक चांगलें असतें. वरील उपायानें जखमा किती लवकर बऱ्या होतात, हें पाहून फारच आश्चर्य वाटतें. जे लोक होरपळून किंवा भाजून मेले, ते ह्या अशा रीतीनें वांचवितां आले असते, असें मी खात्रीनें सांगतों.

जेव्हां भाजलेल्या जखमा अशा रीतीनें लवकर बऱ्या होत नसतील, तेव्हां अशा रोग्यांच्या आंगांत दोषिक द्रव्यें फारच सांचलेलीं असतात, असें खात्रीनें समजावें.

अशा वेळीं सर्व शरीरांतील द्रव्यें बाहेर काढण्याकरितां **शीतस्नान** घेणें व अनुत्तेजक अन्न खाणें हें फार उपयोगी आहे.

ती जखम जरी नेहमींप्रमाणें लवकर बरी होत असली, तरी देखील हीं स्नानें करणें फार हितावह आहे. कारण यांच्या योगानें जखमा अधिक लवकर बऱ्या होण्यास मदत होते.

एका मनुष्याची मान भाजून त्याठिकाणीं दोन चट्टे पडले होते, व त्याचप्रमाणें पायही भाजून त्यावर एक मोठा चट्टा पडला होता. त्यावर त्यानें डाक्टरी उपाय केले. परंतु त्या उपायांमुळें ज्या वेदना होत असत, त्या दुःसह होऊन त्यानें ते उपाय बंद केले. नंतर जुन्या **नेचरक्युअरच्या** पद्धतीनें स्वतःच उपाय करण्यास त्यानें प्रारंभ केला. परंतु त्या उपायांनींही गुण चांगलासा न आल्यामुळें तो **डा० कुन्हे** यांच्याकडे गेला. **डा० कुन्हे** यांनीं भाजलेली जागा स्वच्छ धुवून त्यांतील पू वगैरे काढून टाकला व त्या चट्ट्यांवर थंड पाण्याच्या पट्ट्या लाविल्या. या उपायानें दोन तासांतच भाजलेल्या जागेच्या वेदना बंद झाल्या. अशा रीतीनें दोन दिवस उपचार केल्यानें त्या जखमांचें स्वरूप अगदीं पालटलें. मानेवरील अगदीं भाजलेला भाग बरा झाल्यासारखाच होता व बाकीचे भाजलेले भागही लवकर बरे होत चालले होते. पायावरची फारच मोठी व खोल जखम अर्धी भरून आली होती. व आणखी पांच दिवसांनीं तो मनुष्य गिरणींत काम करण्याइतका बरा झाला. मानेवरील भाजलेला भाग पुरा बरा झाला होता, व पायाचा भाजलेला भाग त्यास कसें तरी चालतां येईल इतका बरा झाला होता.

**बंदुकीच्या गोळीनें झालेल्या जखमा.**—ह्या जखमा ब-या करण्याचे उपायही शस्त्रानें कापल्यामुळें किंवा टोंचल्यामुळें होणा-या जखमांप्रमाणेंच आहेत. तथापि लढाईमध्यें बरेंच मोठें महत्त्व असल्यामुळें त्यांचें स्वतंत्र विवेचन करणें अवश्य आहे. जखम झाल्यावर काय उपाय योजिले पाहिजेत, हें प्रत्येक शिपायास माहीत असणें फारच जरूरीचे आहे. लढाईच्या प्रसंगीं एखाद्या शिपायास जखम झाली असतां, पुष्कळ वेळां डाक्टराची मदत ताबडतोब न मिळाल्यामुळें त्या शिपायास तसेंच खितपत बसावें लागतें. अशावेळीं डाक्टरांच्या जंतुघ्न औषधांचा जखमा ब-या करण्यास उपयोग केला असतां, बहुतेक प्रसंगीं जखम झालेला सर्व भाग कुजून जातो व तो भाग कापून काढला नाहीं, तर रोगी मृत्युमुखीं पडतो. शरीराचे धर्म काय आहेत व शरीराच्या जखमा आपोआप ब-या करण्याचा प्रकृतीमध्यें काय गुण आहे, यांविषयीं बहुतेक लोकांना पूर्ण अज्ञान असल्यामुळें मोठ्या जखमा झाल्या असतां ज्या भागास जखम झाली असेल, त्या भागाचा छेद करण्यावांचून दुसरा उपायच लोकांना ठाऊक नाहीं. परंतु लोकांनीं हें लक्षांत ठेवावें कीं, अशा प्रकारें शरीराचा भाग शस्त्रानें कापून काढल्यानें जखमा कधींही भरून येणार नाहींत. परंतु त्या (जखमा) उलट जास्त मोठ्या होऊन मनुष्यास अंगवैकल्य येतें (शरीराचा अवयव कापला गेल्यानें शरीराच्या समग्रत्वास कमीपणा येतो.)

बंदुकीची गोळी अथवा तिचा कांहीं भाग जर शरीरांत राहिला, तर सर्व शरीरास इजा होऊं नये ह्मणून ती गोळी अथवा तो तुकडा काढून टाकणें आवश्यक आहे ! असा सर्व डाक्टरांचा व बहुतेक लोकांचा ग्रह झालेला आहे. **हा ग्रह अगदीं चुकीचा आहे. व ह्याच्या योगानें आजपर्यंत हजारों लोक प्राणासही मुकले आहेत.** कारण गोळी ही बरीच मोठी वस्तु असल्यामुळें ती शस्त्रक्रियेनें बाहेर काढून टाकण्यास शरीरास बरीच मोठी जखम करावी लागते, व त्यामुळें प्राणघात होण्याची भीति असते. शिवाय हेंही पुष्कळांस माहीत असेल कीं, शरीराच्या आंतील भागास एका गुळगु-

ळीत पदार्थाचें आवरण असल्यामुळें गोळी त्याचे जवळून सहज सरकून जा-ते व जेव्हां ती गोळी एखाद्या भागांत शिरते, तेव्हां त्या भागास (तो भाग जणू काय रबराचा असल्यासारखें) अतिशय लहान छिद्र पडतें. त्याचें कारण असें आहे कीं, गोळीच्या अथवा छऱ्याच्या जोरामुळें त्वचेस ताण बसतो व त्वचा रबराप्रमाणें लवचीक असल्यामुळें, तिजमधून गोळी जातां-क्षणींच त्या छिद्राचा संकोच होतो. हा सर्व प्रकार रबराच्या तुकड्याला गो-ळी मारल्यानें किंवा त्यास दाभणानें भोंक पाडल्यानें जो प्रकार होतो तोच प्रकार या ठिकाणींही होतो. रबराच्या तुकड्यास एवढें भोंक पडतें कीं, तें ताणल्याशिवाय त्यांतून गोळी फिरून जात नाहीं, असें आपणांस दिसून येतें.

जखम झालेले भाग कशानें बरें फुगतात! बहुतकरून ही सूज लवक-रच नाहींशी होते व कांतड्यांचा लवचीकपणाही नाहींसा होतो. जखम झा-लेल्या भागांत रक्त व दुसरीं जखम बरी करणारीं द्रव्यें सांठतात व त्या-योगानें तो भाग ताठ होतो. अशा वेळीं गोळी ज्या मार्गानें आंत गेली, त्याच मार्गानें बाहेर काढण्याचा जर आपण प्रयत्न केला, तर तो निरर्थक होतो असें आपणांस आढळून येईल. कारण ज्या मार्गानें गोळी आंत गेली, तो मार्ग व त्याचें तोंड सुजून गेलें असतें, व त्या भागाचा लवचीकपणा ना-हींसा झालेला असतो. ह्मणून अशा प्रसंगीं शस्त्रप्रयोगानें गोळी काढण्याचा यत्न केला तर विनाकारण कापाकापी करावी लागेल व त्यामुळें शरीरास निरर्थक अपाय मात्र होईल.

अशा प्रकारच्या शस्त्रप्रयोगामुळें शरीरावर किती अपायकारक परिणाम होईल, याची सहज कल्पना करितां येण्यासारखी आहे. **गोळी जबरीनें शरीरांतून बाहेर काढल्यामुळें शरीरास जी इजा होईल त्यापेक्षा गोळी आंतच असल्यानें शरीरास कमी इजा होईल.** शरीरामध्यें गोळी राहिली असतां, त्याभोंवतीं प्रथम पाण्यासारखा एक पदार्थ जमतो व त्या रूपांतर होतां होतां, त्याचें त्या गोळीभोंवतीं एक भक्कम कवच बनतें, त्यायोगेंकरून त्या गोळीपासून शरीरास बिलकूल त्रास नाहींसा होतो. अ

पायकारक अशीं जंतुघ्न औषधें देऊन आपण शरीर निःसत्व केलें नाहीं, तर आपली प्रकृति ती गोळी किंवा छरे शरीरास अपाय न होईल अशा रीतीनें शरीराबाहेर काढून लावील. उदाहरणार्थ पुष्कळ वेळीं असें घडतें कीं, जी गोळी खांद्यांत शिरली आहे ती कित्येक महिन्यांनीं अथवा वर्षांनीं ढुंगणाजवळच्या भागांतून किंवा मांडींतून बाहेर पडते.

यास्तव ती गोळी काढण्याकडे आपलें विशेष लक्ष नसावें, तर त्या जखम झालेल्या ठिकाणची आग कमी करण्याकडे व रक्तस्राव बंद करण्याकडे लक्ष असलें पाहिजे. हें कसें करतां येईल, हें मीं पूर्वींच सांगितलें आहे. नडीच्या प्रसंगीं त्याला त्यांचा तत्क्षणींच उपयोग व्हावा ह्मणून प्रत्येक शिपायास तागाच्या व लोंकरीच्या कापडाच्या पट्ट्या लढाईवर जातांना दिल्या तर फार बरें होईल. बहुतेक वेळां दुसऱ्या उपायांपेक्षां पाणी मिळण्याचा अधिक संभव असतो. पाणी न मिळेल तेव्हां ओलें गवत, चिखल किंवा ओलसर मातीचा जखमेस थंडावा आणण्याकडे शिपायांनीं उपयोग करावा. ती जखम घट्ट बांधल्यानंतर जखमेची आग कमी करण्याच्या कामीं यांचा उपयोग केला तरी चालेल. जोंपर्यंत शिपायास हालण्याइतकी शक्ति असते, तोंपर्यंत त्या शिपायास अशा रीतीनें आपणा स्वतःस प्रथम मदत करितां येईल, व दुसरे शिपाई त्यास मदत करण्यास येईतोंपर्यंत त्याचा वेळ फुकट जाणार नाहीं. ह्मणून कोणताही औषधोपचार न करितां जखम आपोआप बरी करण्याची रीत प्रत्येक शिपायास पूर्णपणें समजावून देणें, हें फारच महत्त्वाचें कार्य आहे. ह्यायोगानें प्रत्येक शिपायास आपणा स्वतःस मदत करितां येईल, व डॉक्टर येईपर्यंत, त्यास उगीच कण्हत पडावें लागणार नाहीं. शिवाय ज्या शिपायास थोडी जखम झाली असेल, त्याला अधिक जखम झालेल्या आपल्या मित्रास बरीच मदत करितां येईल.

१८७०–७१ मध्यें फ्रान्स व जर्मनी या दोन राष्ट्रांमध्यें झालेल्या लढाईवरून डाक्टरांच्या उपायामुळें किती वाईट परिणाम होतात, ह्याचा अनुभव पहाण्याचे पुष्कळ प्रसंग डा० कुन्हे यांस आले. त्यांपैकीं फारच आ-

श्चर्यकारक उदाहरण येथें देतों. १८७० मध्यें झालेल्या लढाईमध्यें एका मनुष्याच्या पोटांत एक गोळी गेली होती. हा गृहस्थ १८८३ मध्यें डा० कुन्हे यांचेकडे गेला. ती गोळी पाठीच्या कण्याजवळून बाहेर पडली होती. त्यानें सगळ्या प्रकारचे डाक्टरी उपाय योजिले होते, तरी ती जखम १३ वर्षांत देखील पूर्णपणें बरी झाली नव्हती, व त्यांतून सारखा पू वहात होता. कांहीं वेळां ती जखम भरून येत असे, परंतु थोडेंसें कारण होतांक्षणींच ती फिरून वाहत असे. त्या रोग्याची प्रकृति बिघडतां बिघडतां इतक्या स्थितीस येऊन पोहोंचली कीं, त्या रोग्यास हालतां देखील येईनासें झालें. डा० कुन्हे यांनीं जखम झालेल्या भागापुरतेच उपाय न योजितां सर्व शरीरांतील जीर्णज्वर नाहींसा करण्याचा प्रथम प्रयत्न केला. त्यांचे योगानें एका अठवड्याचे आंतच ती जखम बरी झाली व ती फिरून कधींही उद्भवली नाहीं. आपली जखम फारच लवकर ह्मणजे दोन आठवड्यांतच बरी झाली, असें पाहून त्या मनुष्यास फार आनंद झाला, व पंधरा दिवसांनीं त्या मनुष्यास पायांनीं चालतां येऊं लागलें. डा० कुन्हे यांच्या सांगण्यावरून या गृहस्थानें शरीरांतील सर्व दोषिक द्रव्य जाऊन प्रकृति निरोगी होईपर्यंत ते उपाय आणखी कांहीं दिवस चालू ठेविले.

ह्याच लढाईंत एका शिपायाच्या गुडघ्याची वाटी फुटली होती व ती बरी करण्याच्या प्रयत्नामध्येंही डा० कुन्हे यांस यश आलें. सर्व शक्य उपचार केले होते, तरी ती जखम बरी झाली नव्हती. ती मांडी जरी अगदींच ताठ झाली नव्हती, तरी ती मागेंपुढें करण्यास व हालवण्यास त्याला फारच त्रास पडत असे. या गृहस्थास जुन्या नेचरक्युअरच्या तत्त्वाप्रमाणें जरी वीस वर्षेंपर्यंत उपचार सुरू होते, तरी त्यास विशेष गुण आला नाहीं, ही गोष्ट विशेष ध्यानांत ठेवण्यासारखी आहे. ती जखम झाल्यानंतर वीस वर्षांनीं त्यानें डा० कुन्हे यांचे उपचार सुरू केले; परंतु ते गुडघा बरा करण्याकरितां नव्हते, तर डा० कुन्हे यांच्या चिकित्सापद्धतींत काय राम आहे, हें पाहण्याकरितां होते. उपचार सुरू केल्यावर कांहीं दि-

वसांनीं गुडघ्याची वाटी सुजली, व तिचा दाह होऊं लागला, त्यावरून हें स्पष्ट दिसून येत होतें कीं, हा विकार पूर्वी पूर्णपणें बरा झाला नव्हता. हें पाहून त्यास फारच आश्चर्य वाटलें. तथापि त्यानें माझे उपचार तसेच पुढें चालूं ठेविल्यानें तो दाह लवकरच नाहींसा झाला. आणखी कांहीं दिवस उपचार चालूं ठेविल्यावर गुडघ्याचें सांध्याचा ताठपणा अगदीं नाहींसा झालेला पाहून व आपणास नेहमींप्रमाणें चांगलें चालतां येऊं लागलें, हें पाहून त्याला अधिकच आश्चर्य वाटलें.

हाड मोडणें—शरीराच्या बाह्य भागास इजा झाल्यामुळें जे विकार होतात, त्यांपैकीं हाड मोडणें हा एक आहे. मोडलेलें हाड बरें होण्यास बराच वेळ लागतो. डॉक्टर लोक बहुतकरून प्लॅस्टर आफ् पॅरिसची पूड जखम बरी करण्याकरितां जखमेवर लावितात, परंतु त्याहूनही डा० कुन्हे यांच्या उपायानें जास्त चांगला गुण येतो. सर्व उपायांपेक्षां डा. कुन्हे यांच्या उपायामध्यें असा एक गुण आहे कीं त्यानें जखमेच्या जागची आग व वेदना बंद होतात, त्या जखमेस थंडावा येतो, व हाड फुटून झालेल्या जखमेस जी सूज येते व त्यामुळें ज्या वेदना होतात, त्या नाहींशा होईपर्यंत तो थंडपणा टिकतो. अशा प्रसंगीं शीतस्नानाचा देखील उपयोग केला पाहिजे, कारण त्यामुळें जखम लवकर बरी होण्यास पुष्कळ मदत होते. जो कोणी हे नैसर्गिक उपचार न करितां प्लॅस्टर आफ् पॅरिसच्या पुडीचा जखम बरी करण्याकडे उपयोग करितो, त्या मनुष्यास सृष्टिधर्माचें ज्ञान नाहीं असें ह्मटलें पाहिजे. ज्या प्रसंगीं जखम झालेला भाग योग्य स्थितींत ठेवितां येत नसेल, त्यावेळीं त्या कामाकरितां लांकडाच्या तुकड्याचा, कागदाच्या पुठ्याचा, अथवा असल्या प्रकारच्या दुसऱ्या पदार्थांचा उपयोग करावा. परंतु प्लॅस्टर ऑफ् पॅरिसची पूड जखमेवर कधींही बांधूं नये.

जे लोक डा० कुन्हे यांच्या सांगण्याप्रमाणें उपाय करतील, त्यांना ह्या उपायांनें मोडलेलें हाड किती लवकर भरून येतें व वेदना किती लवकर कमी होतात, हें पाहून आश्चर्य वाटेल.

एका तीस वर्षांच्या मनुष्याचा उजवा हात कोंपराजवळ मोडला होता. आपली प्रकृति आपले रोग आपोआप बरी करते, ह्या तत्त्वाचा तो अनुयायी असल्यामुळें त्यानें पाण्याच्या पट्टयांचा व स्थानिक **बाष्पस्नानांचा** उपयोग केला. ज्या वैद्याचें औषध घेण्यास तो पूर्वी गेला होता, त्यानें त्या रोग्याला **प्लॅस्टर ऑफ् पॅरिस**ची पट्टी हातास लावण्यास सांगितलें, व तो हात मग बहुतकरून नेहमीं ताठच राहील, असें सांगितलें. असें करण्यापासून फार त्रास होईल, असें त्या रोग्यास वाटल्यामुळें तो रोगी **डा० कुन्हे** यांचेकडे उपचारासाठीं गेला. डा. **कुन्हे** यांनीं तो हात तारेची जाळी व कागदाचा पुठ्ठा यानें बांधून काढला. **शीतस्नानें** व अनुत्तेजक आहार हीं चालू होतींच. या उपायांचा, परिणाम फारच आश्चर्यकारक झाला. २४ तासांमध्यें सूज व वेदना अगदीं नाहींशा झाल्या. एका आठवड्यांतच त्या रोग्याला त्या हातानें थोडें थोडें लिहितां येऊं लागलें. दुसऱ्या आठवड्यांत कांहीं त्रास न पडतां खुर्ची उचलण्याची शक्ति त्याचे हातांत आली, व तीन आठवड्यांत तो मोडलेला हात अगदीं पूर्णपणें बरा झाला.

**वाहतीं क्षतें.**—लढाईंत व द्वंद्वयुद्धांत झालेल्या जखमा लवकर व सहज बऱ्या होतात. परंतु वाहत्या जखमा व व्रण लवकर बरे होत नाहींत. या व्रणांस डाक्टर लोक वाटेल तें नांव देवोत, परंतु यासंबंधानें एक गोष्ट खरी आहे कीं, ह्या व्रणांवरून शरीरामध्यें शरीराचा कांहीं भाग कुजण्याची क्रिया चालू आहे, ही गोष्ट सिद्ध होते. डाक्टरांच्या औषधांच्या योगानें शरीरांतील कुजण्याची क्रिया बाहेर दिसेनाशी जरी करितां येते, तरी त्या औषधानें वास्तविकपणें अशा प्रकारच्या व्रणांचें मूळबीज नाहींसें करून तें निर्मूळ करितां येत नाहीं. या रोगाचा प्रतिकार करण्याचीं साधनें अथवा शक्ति प्रचलित वैद्यकपद्धतींत नाहीं. यामुळें असें होतें कीं, या पद्धतीच्या औषधानें शरीराच्या एका भागांतील क्षतें बरीं करावीं तों तीं अन्य भागांत नव्यानें उद्भवतात. जखमा वगैरे अन्य अभिघातज व्याधींपासून जितक्या वेदना होतात, तितक्या या वाहत्या क्षतापासून होत नाहींत हें खरें आहे;

परंतु तीं बरीं होण्यास–डाक्टरांच्या औषधांनीं तीं पूर्णपणें बरीं होतात, असें मानून चाललें तरी–फार अवधि लागतो. यास्तव हा व्याधि भयंकर मानला गेला आहे. क्षतें हीं शरीरामध्यें गूढ रीतीनें असलेल्या कांहीं जीर्ण रोगांमुळें होतात. अशा प्रकारचाच कांहीं जीर्ण व गुप्त रोग शरीरांत असल्यामुळें पुष्कळ लोकांना आत्महत्या करण्याची स्वाभाविक इच्छा होते व त्याकारणानें पुष्कळ लोक आत्महत्या करून, आपल्या आप्तइष्टांस दुःखसागरांत लोटण्यास कारणीभूत होतात. या सर्व प्रकारांचें कारण हें आहे कीं, आपल्या शहाण्या व ममताळू सृष्टि मातेनें घालून दिलेले नियम सोडून, आहारविहारादि गोष्टींमध्यें वर्तन करितों. असो. आतां या वाहत्या क्षतांचें कारण काय असावें, हा वाचकांकडून प्रश्न येईल. या प्रश्नाचें उत्तर असें आहे कीं, शरीरांत दोषिक द्रव्य सांचल्यामुळें किंवा पूर्वीं झालेला एखादा रोग शरीरांत औषधांनीं दबविल्यामुळें हीं क्षतें पडतात. कित्येक वेळेस हीं क्षतें पूर्वीं उपयोग केलल्या **पारा, आयोडाईन, पोटॅशिअम् आयोडाइड, ब्रोमाइन सॅलिसिलिक ॲसिड डिजिटेलिस, कोयनेल** इत्यादि विषारी व अपायकारक औषधांमुळें त्यांचें विष शरीरांत भिनून उत्पन्न झालेलीं असतात. देवी टोंचणें हा एक शरीरांत विष घालण्याचा गर्हणीय प्रघात आहे. हा प्रघात फार अपायकारक आहे, कारण देवी टोंचण्याच्या चालीमुळें सर्व लोकांचीं शरीरें विषांनीं दूषित होऊन, तीं दिवसेंदिवस निःसत्व होत चाललीं आहेत. देवीची लस शरीरांत घातल्यामुळें शरीरांतील जीवनसत्व व रोगाची प्रतिकारशक्ति हे गुण कमी होतात. शरीरांत अशी स्थिति झाली म्हणजे देवी, गोंवर इत्यादि रोगांच्या सांथीमध्यें शरीरास रोग उत्पन्न करून, त्यांतील दोषिक द्रव्याचा निकाल करण्याचा प्रयत्न शरीराकडून होत नाहीं. व त्यामुळें आपल्या शरीरांत रोगमूलक द्रव्य आहे किंवा नाहीं, याची सूचना आपणास मिळत नाहीं. परंतु देवी, गोंवर, किंवा साधा ज्वर इत्यादि तीव्र किंवा शीघ्रविपाकी रोग शरीरास होऊन. त्यामधील दोषिक द्रव्याचा निकाल झाला नाहीं, तर पुढें गरमी

व्रण, अपस्मार, वेड लागणें, क्षय वगैरे फार दिवस टिकणारे व दुःसाध्य असे रोग होतात. शरीरांतील जीवनसत्व अथवा जोम याचें स्वरूप काय आहे, याची कल्पना डाक्टरांना बिलकूल नाहीं. कारण तसें नसतें तर टोंचून अथवा मर्दन करून शरीरांत औषधें घातल्यानें त्यापासून जो अपायकारक परिणाम शरीरावर होतो तो–मग तो परिणाम लागलींच होवो किंवा कित्येक वर्षांनीं होवो,–या डाक्टरांच्या लक्षांत आल्यावांचून राहिला नसता.

ज्यांचा शरीरावर काय परिणाम होतो, याविषयीं डाक्टरांना अद्याप पूर्ण ज्ञान झालें नाहीं, अशा औषधांचा उपयोग केल्यानें शरीरांत दोषिक द्रव्यांचा संचय होण्यास मदत होते व त्यामुळें पुढें क्षतें किंवा व्रण इत्यादि रोग होतात.

नवीन औषधें, नवीन वायुशोधक द्रव्यें, नवीन रोगजंतुघ्न ( कीड मारणारीं ) औषधें शोधून काढण्याविषयीं वैद्यशास्त्राचे नेहमीं प्रयत्न चालले आहेत, ही गोष्ट सर्व लोकांस माहीत आहेच. हे उपाय एकापेक्षां एक जालीम अर्थात् प्रकृतीस विषवत् असतात, आणि असें असणें हें अगदीं स्वाभाविक आहे. रोग (ज्वर) उत्पन्न होतांक्षणींच **ॲन्टिफ्रेब्रियन** ( ज्वरशामक औषधें ) वगैरे औषधें देऊन, डाक्टर लोक प्रकृतीमधील सत्व कमी करून टाकतात. अशा वेळीं शरीरांतील रोगमूलक द्रव्याचा निकाल करून रोग बरा करण्याचा प्रकृतीकडून जो प्रयत्न चाललेला असतो, त्यास मदत करून प्रकृति रोगमुक्त कशी करावी, हें त्यांना माहीत नसतें. डाक्टरी औषधानें रोगाचीं बाह्यलक्षणें बंद होतात, परंतु तो रोग पूर्णपणें जात नाहीं कारण या उपायांनीं रोगाचें मूळकारण नाहींसें झालेलें नसतें. अशी स्थिति आहे, तरी बाह्यलक्षणें बंद झालीं ह्मणजे रोग बरा झाला आहे, असें डॉक्टर लोक मानतात. ज्वर आला असतांना डॉक्टरी औषध दिल्यानें शरीरांतील रोगाचा प्रतिकार करणारी शरीरांतील स्वाभाविक शक्ति दबून जाते. तिचा फिरून प्रादुर्भाव झाला असतां, पूर्वींचा तोच किंवा अन्य प्रकारचा ज्वर उत्पन्न झाला, तर पूर्वींच्या विषजंतुघ्न औषधांचा चांगलासा उपयोग

होणार नाहीं, तर त्या औषधाऐवजीं अधिक जालीम औषध दिलें पाहिजे, ह्मणजे पूर्वीच्या इतका परिणाम शरीरावर घडेल. शरीरांतील सत्व किंवा जोम जितका जास्त असेल, तितक्याच प्रमाणानें रोगाचीं बाह्यलक्षणें बंद करून रोग कृत्रिम रीतीनें बंद करण्यास कमी शक्तीच्या औषधाची गरज असते, व याच्या उलट ज्याच्या प्रकृतीमध्यें जीवनसत्व अथवा जोम जितका कमी असतो, तितकें अधिक शक्तीचें औषध त्याच कार्यास्तव लागतें. प्रत्येक औषध हें शरीरास विषारी आहे व अर्थात् शरीरास अपायकारक आहे. शरीरांत जितका जोम जास्त असेल, तितका अशा प्रकारच्या ( औषधाचा ) विषाचा परिणाम कमी अपायकारक होईल. औषधरूपी विष शरीरांत गेलें ह्मणजे त्याच्या भोंवतीं एका चिकट पदार्थाचे वेष्टन बनतें. परंतु शरिरांतील शक्ति किंवा जोम कमी झाला असेल, तर कमी वीर्याचें किंवा कमी प्रमाणांत औषधरूपी विष दिलें असतां, त्या विषाचा प्रतिकार करण्याची शरीरांतील शक्ति जागृत होत नाहीं. शिवाय ती शक्ति जागृत झाली तरी त्या विषाचा प्रतिकार करून ते अपायकारक करण्याची क्रिया फार सावकाश चालते.

वर जें सांगितलें आहे, त्याच्या समर्थनाकरितां डा० कुन्हे यांच्या प्रत्यक्ष अनुभवांतील एक उदाहरण खालीं दिलें आहे. जर्मनींतील एका डॉक्टरास असें वाटलें कीं, पायावरील वाहत्या जखमांवर आपण एक रामबाण औषध काढलें आहे व त्यायोगानें तो फार प्रसिद्धीस आला. त्या औषधाचा इतका सुरेख उपयोग होत असें कीं त्या औषधामुळें जखमा फारच थोड्या वेळांत भरून येत असत. हा गुण तात्पुरताच होता. कारण वास्तविक स्थिति अशी होती कीं, त्या औषधामुळें जखमेंतील दोषिक द्रव्य शरीरांत दबविलें जात असे. एका मनुष्याच्या गुडघ्याच्या नळीभोंवतीं पुष्कळ व्रण झाले होते, तेव्हां तो मनुष्य दुसऱ्यांदां त्याच डॉक्टराकडे औषध घेण्यासाठीं गेला. परंतु खेदाची गोष्ट ही कीं, त्या रामबाण औषधानें यावेळीं त्या मनुष्यास गुण मुळींच आला नाहीं, हें पाहून तो डॉक्टर गोंधळून गेला.

" ह्या खेपेचा रोग पूर्वींच्या क्षतांहून भिन्न प्रकारचा आहे, पूर्वीं दिलेलें औषध या रोगावर चालणार नाहीं व पाय कापून काढण्याखेरीज आतां दुसरा कोणताही इलाज राहिला नाहीं." असें विधान त्या डॉक्टरानें ठोकून दिलें.

कोण हें अज्ञान ! अशा प्रकारची ह्या वैद्यशास्त्राची स्थिति खरोखरीं अत्यंत शोचनीय आहे. देवी वगैरे रोगांपासून रक्षण करण्याकरितां, शरीरांत विषारी द्रव्य घालणें, व कांहीं रोगांमध्यें एखाद्या अवयवाचा छेद करणें, याहून अन्य प्रकारचे ( साधे व स्वाभाविक ) उपाय या डॉक्टर लोकांस माहीतच नाहींत.

शरीरास वाहतीं क्षतें पडण्याचें कारणही इतर रोगांप्रमाणेंच आहे; हें कारण म्हणजे अर्थात् शरीरांत विजातीय अथवा दोषिक द्रव्य असणें हें होय. क्षतांतून किंवा त्या जखमेंतून जो पू वहात असतो, तो विजातीय द्रव्यच असतो, या गोष्टीवरून ह्या जखमा विजातीय द्रव्य शरीरांत आल्यामुळेंच उद्भवतात, हें सहज दिसून येईल.

अशा प्रकारें जेव्हां शरीरास क्षतें पडतात, तेव्हां शरीरामध्यें दोषिक द्रव्य सांचलें आहे, व त्यामुळें शरीरांत बरीच उष्णता झाली आहे, असें समजावें. ही उष्णता शरीरांतील अन्य विजातीय द्रव्य नासण्यास कारणीभूत होते व हें विजातीय द्रव्य नासलें, म्हणजे त्यामध्यें रोगजंतूंची उत्पत्ति होते. अशा स्थितीमध्यें शरीरांतील उष्णतेच्या मानाप्रमाणें विजातीय द्रव्यास भिन्न स्वरूपें प्राप्त होऊन, भिन्न प्रकारचे रोग उत्पन्न होतात.

अशा प्रकारची स्थिति शरीरांत कोणत्या कारणांनीं होते, हें आपण लक्षांत घेतलें म्हणजे, ही स्थिति कशी घालवावी, व शरीरांतील विजातीय द्रव्यामुळें उत्पन्न होणाऱ्या रोगमूलक जंतूंचा कसा नाश करावा, हें कळून येईल. हें कमी करण्याचा उपाय ह्मणजे ज्या उष्णतेमुळें ह्या सर्व गोष्टी घडून येतात, ती उष्णता कमी करणें हा होय. ज्याप्रमाणें रोगाची परीक्षा करण्यास **मुखपरीक्षाशास्त्र** हें खात्रीचें आहे, त्याप्रमाणें डा० **कुन्हे** यांचें **बाष्प-**

स्नान व शीतस्नानें व अनुत्तेजक आहार हे उपाय अगदीं रामबाण आहेत.

गरमीमुळें वद झालेले व क्षतामुळें व्रण झालेले व सर्व अन्य प्रकारचीं क्षतें झालेले पुष्कळ रोगी, डा० कुन्हे यांचेकडे उपचाराकरितां येत असत, व त्यांपैकीं ज्यांच्या प्रकृतींत थोडें तरी सत्व राहिलें होतें व ज्यांचें शरीर औषधांच्या पुटांनीं खराब होऊन गेलें नव्हतें, ते सर्व योग्य वेळांत बरे होऊन गेले.

ज्या एका रोग्यास सामान्यतः अशा प्रकारचा रोगी बरा होण्यास जितका काल लागतो, त्याच्या तीन पटीपासून सहा पटीपर्यंत अधिक वेळ लागला; त्या रोग्याची हकीकत खालीं दिली आहे.

एका ६० वर्षांच्या गृहस्थाच्या गुडघ्यापर्यंतच्या पायाच्या भागास क्षतें पडून त्यांमधून पू वाहत होता. त्याच्या पायावर एका जवळ एक अशीं तीस ते चाळीस क्षतें पडलीं होतीं, व त्यांतील सर्वांत मोठें क्षत ४ चौरस इंच होतें. त्या क्षतांतून पातळ व घाण असा पूं सारखा वाहत होता. हीं क्षतें प्रथम थोडा वेळपर्यंत बरीं झालीं होतीं, परंतु लागलींच त्या क्षतांच्या जागीं इतकी कंडू ( खाज ) सुटली कीं, त्या मनुष्यास ती सहन न होऊन, त्यानें त्या जागीं सपाटून खाजविलें व त्यायोगानें ती क्षतें फिरून वाहूं लागलीं.

त्या मनुष्याच्या शरीरांतील विजातीय द्रव्य नासल्यामुळें, त्यामध्यें तीव्र ज्वलन सारखें चालू होऊन जी उष्णता उत्पन्न झाली होती, त्यामुळें ती कंडू उत्पन्न झाली होती. परंतु तीं क्षतें फिरून वाहूं लागल्याबरोबर ती कंडू व त्यामुळें होणाऱ्या वेदना बंद झाल्या. गुडघ्याखालचा पायाचा भाग काळा निळा पडला होता, व त्यावरून तो सर्व पाय कुजून गेला आहे, असें दिसून येत होतें. पायावरील कांहीं क्षतें इतकीं खोल होतीं कीं, तीं हाडापर्यंत जाऊन पोंचलीं होतीं. त्या रोग्यानें त्या क्षतांवर जे उपचार केले ते सर्व व्यर्थ गेले. आतां एक पाय तरी कापून टाकावा किंवा सर्व शरीर कुजून जाऊन मरून जावें यावांचून अन्य उपाय राहिला नव्हता. या गृहस्थाचा

सर्व आशा खुंटल्यामुळें तो डा० कुन्हे यांचेकडे निरुपायास्तव गेला.

मुखपरीक्षाशास्त्रानें डा० कुन्हे यांस असें कळून आलें कीं, त्याच्या शरीरांतील पचनेंद्रियें अगदीं बिघडून गेलीं आहेत. अगदीं हलकें अन्न देखील पचविण्याची शक्ति त्याच्या पोटास राहिली नव्हती, व त्यामुळें शरीरास अवश्य लागणारें रक्त त्याच्या शरीरांत उत्पन्न होत नसे. त्याच्या फुप्फुसांची क्रिया देखील बरोबर चालत नसे. या सर्व लक्षणांवरून असें दिसून येत होतें कीं, त्याच्या शरीरांत विजातीय द्रव्याचा संचय फार झाला होता, व तो दिवसेंदिवस वाढत चालला होता. पोट व फुप्फुसें यांची अशी स्थिति होती कीं, तिच्या योगानें शरीरांतील विजातीय द्रव्यास भर पडत चालली होती. आपल्या पायाला जो रोग झाला आहे, तो विजातीय द्रव्य शरीरांत सांचल्यामुळें झाला आहे, असें त्या रोग्यास वाटत नव्हतें. यामुळें डा० कुन्हे यांनीं फक्त पायालाच उपचार न करितां त्याच्या सर्व शरीरास उपचार कां करित होते, याचें कारण त्यास कळलें नाहीं. डा० कुन्हे यांनीं पायावरील क्षतांवर फक्त तागाच्या कापडाच्या ओल्या पट्ट्या बांधल्या व त्या पट्ट्यांच्याभोंवतीं लोंकरीच्या कापडाची पट्टी गुंडाळली. शिवाय अनुत्तेजक, साधें व पथ्यकर अन्न खाणें, नेहमीं मोकळ्या व स्वच्छ हवेंत राहणें व फिरणें, दिवसांतून चार वेळां **मार्जनविधि** करणें व स्वाभाविक उपायांनीं शरीरांतून रोज घाम काढणें, या गोष्टी नियमानें करण्यास डा० कुन्हे यांनीं त्या रोग्यास बजावून सांगितलें. परंतु त्या रोग्यास रोगनाशक **मार्जनविधि** व अनुत्तेजक व हलका आहार या गोष्टींचें महत्त्व न कळल्यामुळें, त्यानें या गोष्टींपेक्षां पायावर थंड पाण्याच्या पट्ट्या बांधण्याकडे विशेष लक्ष दिलें. ह्याचा परिणाम असा झाला कीं, सहा महिने-पर्यंत त्या रोग्याच्या स्थितींत फारशी सुधारणा झाली नाहीं. सरतेशेवटीं त्याच्या स्वतःच्या सर्व कल्पना सोडून देऊन आपल्या सांगण्याबरहुकूम वागण्याविषयीं, डा० कुन्हे यांनीं त्याचें मन वळविलें. यानंतर सहा महिन्यांत त्याच्या प्रकृतीमध्यें फारच सुधा-

रणा झाली. जीं क्षतें मोठीं होतीं, तीं हळू हळू भरून येतां येतां लहान होत चाललीं होतीं; व जीं क्षतें लहान होतीं तीं तेव्हांच भरून आलीं; पायांतील सर्व कंडू अगदीं नाहींशी झाली होती, व पू वाहणेंही थोडथोडें बंद झालें होतें. त्या रोग्याची एकंदर प्रकृति व अन्नपचन पुष्कळच सुधारलें होतें. त्यांच्या फुफ्फुसाचा विकारही वाढण्याचा बंद झाला होता. या उपायांनीं आपल्या प्रकृतीस फायदा होत आहे, असें पाहून त्या रोग्यास डा० कुन्हे यांचे उपचार आस्थेनें चालू ठेवण्याची उमेद आली. दुसऱ्या वर्षीं खालच्या पायावरील क्षतें बरीं होऊन तीं मांडीचे वर उठूं लागलीं, व जशीं जशीं खालील क्षतें बरीं होत चाललीं, तशीं तशीं नवीन क्षतें मांडीवर उठूं लागलीं. याप्रमाणें रोग वर चढत चढत आपलें मूळ उत्पत्तिस्थान जें पोट त्याकडे चालला होता. वास्तविकपणें पाहतां हें फार चांगलें लक्षण होतें, परंतु जेव्हां प्रथम गुडघ्याचे वरचे बाजूस—ह्मणजे जेथें पूर्वीं क्षत मुळींच झालें नव्हतें अशा ठिकाणीं—नवीन क्षत उत्पन्न झालें, तेव्हां त्या रोग्यास वाटलें कीं, ज्या अर्थीं डा० कुन्हे यांच्या उपायांनीं पायाखालच्या भागावरचीं क्षतें उलट वर जवळ जवळ येऊं लागलीं आहेत, त्या अर्थीं या उपायांनीं हा रोग वाढत आहे व ह्मणून हे उपायही निरुपयोगी आहेत. शरीरांत पसरलेलें दोषिक द्रव्य पायांतून परत आपलें उद्गमस्थान जें पोट त्याकडे जात आहे व त्यामुळें क्षतें गुडघ्याखालच्या भागांतून नाहींशीं होऊन गुडघ्याचे वरच्या भागांत होत आहेत; व असें होणें हें फायद्याचें आहे, अशी त्या रोग्याची जेव्हां डा० कुन्हे यांनीं समजूत घातली, तेव्हां त्याची खातरी होऊन त्यानें ते उपाय फिरून नियमानें सुरू ठेविले. त्या गृहस्थाचें फुफ्फुस व पचन-शक्ति चांगली सुधारण्यास पुरीं ३ वर्षें लागलीं, व तेवढ्या कालांत पायावरील क्षतेंही पूर्णपणें बरीं झालीं, व लागलींच त्याचें शरीराची कांतीही पूर्वींप्रमाणें झाली.

याप्रमाणें मोठमोठ्या डाक्टरांनीं असाध्य मानलेला व क्षयाची भावना झालेला व जवळ जवळ व्रणासारख्या भयंकर व्याधीनें पीडलेला, असा एक

रोगी डा० कुन्हे यांनीं बरा केला. या रोग्याचा हा विकार इतका पूर्णपणें बरा झाला कीं, त्यास हा रोग फिरून कधींही उद्भवला नाहीं.

**विषारी जंतूंचे दंश, सर्पदंश, पिसाळलेल्या कुत्र्याचें डसणें, व कोणत्याही प्रकारानें रक्तांत विष जाणें**—आपल्या रक्तामध्यें जे सूक्ष्म तांबडे परमाणु आहेत, त्यांवर कोणत्याहि क्रियेचा अथवा द्रव्याचा परिणाम फार त्वरित होतो. यामुळें विषारी प्राण्यांच्या दंशामुळें अथवा अन्य कारणानें, जेव्हां शरीरांतील रक्तामध्यें विजातीय द्रव्य जातें, तेव्हां त्यामध्येंही, शरीरांतील विजातीय द्रव्य नासलें असतां शरीरांत ज्या प्रकारची क्रिया होते, त्याच प्रकारची क्रिया होते. शरीरांतील विजातीय द्रव्य नासल्यानें उष्णता उत्पन्न होऊन, जीं ज्वराचीं लक्षणें होतात, त्यांशीं बहुतेक अंशीं जुळणारीं लक्षणें अगदीं खरोखरीं निरोगी मनुष्यासहि विषारी प्राण्यांचा दंश झाला असतां होतात.

शरीरांत दोषिक द्रव्याचा संचय फार असेल तर शरीरावर विषाचा परिणाम जास्त होतो. असें होण्याचें कारण अगदीं उघड आहे. विष जर रक्तांत शिरलें तर शरीरांत नासण्याची क्रिया उत्पन्न होण्याचें मूळकारण जें दोषिक द्रव्य, त्यामध्यें त्या विषानें भर पडते.—मग तें विष एखाद्या सापाचें, किड्याचें, पिसाळलेल्या कुत्र्याचें वगैरे कोणत्याही प्राण्याचें असो.

ह्याप्रमाणें शरीरांतील दोषिक द्रव्याचा संचय वाढतो व त्यामध्यें नासण्याची क्रिया सुरू होते, व त्यायोगानें जिवास अपाय होण्याचा प्रसंग येतो. विजातीय द्रव्य पर्वीं जितकें अधिक सांचलें असेल, तितकी शरीरांत विष गेल्यानें नासण्याची क्रिया जास्त जोरानें होते. ह्मणूनच कांहीं मनुष्यांस मधमाशी चावली, तर त्या दंशाच्या जागीं बरीच सूज येते, व कांहींना त्यामुळें चिलीट किंवा डांस चावल्यानें जितकी इजा होते, तितकीच इजा दंशाच्या ठिकाणीं होते. त्याचप्रमाणें पिसाळलेला कुत्रा चावला असतां एका मनुष्यास तें विष बाधून तो मरणोन्मुख होतो, व तोच कुत्रा दुसऱ्या मनुष्यास चावला असतां त्याच्या शरीरावर त्या विषाचा ह्मणण्यासारखा

परिणाम होत नाहीं, असें आपल्या अनुभवास येतें. तसेंच सर्पदंशा- एका मनुष्याचा प्राणांत होतो, व दुसऱ्यास फक्त तापच येतो. याप्रमाणें विषारी प्राण्यांच्या दंशापासून कमी किंवा जास्त अपाय होणें, हें केवळ त्या दंशावरच नेहमीं अवलंबून असतें असें नाहीं; तर तें दंश झालेल्या मनुष्या-च्या प्रकृतीवरही पुष्कळ अवलंबून असतें. शरीरावर शस्त्रक्रिया केल्यावर कापलेल्या ठिकाणीं जीं विषारी औषधें लावतात, त्यामुळें रक्तावर जो परि-णाम होतो, त्यासंबंधानेंही अशीच स्थिति आहे.

शरीरांतील विजातीय द्रव्यामधील नासण्याच्या क्रियेसंबंधानें ज्या गोष्टी सांगितल्या आहेत, त्या पिसाळलेलें कुत्रें चावलें असतां शरीरावर जो वि-शेष परिणाम घडतो, त्यासही लागू आहेत. पिसाळलेलें कुत्रें चावलें असतां त्याचें विष शरीरांत प्रथम गुप्त रूपानें कांहीं वेळ राहतें, व नंतर जलसंत्रास या रोगाच्या रूपानें त्या विषाचे परिणाम दिसूं लागतात. या विषाचा परि-णाम प्रथम पोटाच्या भागांतील ज्ञानतंतु व इंद्रियांवर होतो व नंतर कांहीं आ-ठवड्यांनीं मेंदूवर होतो. अशा वेळीं जलसंत्रास या रोगाचीं सर्व लक्षणें हो-ऊं लागतात व रोगी कुत्र्याप्रमाणें भोंकणें, दुसऱ्यास चावण्यास धांवणें वगैरे क्रिया करूं लागतो. त्याचप्रमाणें पिसाळलेल्या कुत्र्याची भूक व पचनशक्ति नेहमींप्रमाणें नसते, ही गोष्टही लक्षांत ठेवण्यासारखी आहे.

सर्पदंशावर डा० कुन्हे यांच्या उपायांचा काय परिणाम होतो, हें खा-लीं दिलेल्या हकीकतीवरून समजून येईल.

एक मुलगा रानांत फिरत असतांना एका विषारी सापानें त्या-च्या डोक्यास दंश केला. त्याचा परिणाम असा घडला कीं, त्या मुलाचे पोटांत वेट उठूं लागले, व त्या योगानें त्या मुलाची लघवी १९ तास बंद झाली. तो मुलगा मरेल किंवा काय अशी भीति वाटत होती. या मुलाच्या सर्वांगास **बाष्पस्नान** दिल्यावर व दंश झालेल्या ठिकाणीं अनेक वेळां वा-फारा दिल्यावर त्यास सडकून घाम आला. त्यानंतर **शीतस्नान** व अनुत्ते-जक आहार याची योजना केल्यावर थोडक्याच वेळांत ह्या मुलाला सडकून

लघवी झाली व भीतीचें सर्व कारण नाहींसें झालें. आतां कोणत्याही प्रकारचें विष रक्तांत गेलें असतां त्याचे परिणाम काय घडतात, हें आपण नीट रीतीनें पाहिलें असतां आपणांस असें कळून येईल कीं, दंशाच्या किंवा जखमेच्या झालेल्या ठिकाणीं थोडीशी सूज येते, व त्या ठिकाणीं बरीच आग व दाह होतो

हा दाह अथवा ज्वर कित्येक वेळां पुढें पसरतो. अशा वेळीं हा ज्वर शांत करणें, हें आपलें पहिलें कर्तव्य आहे व हें कार्य करण्याकरितां दंश झालेला भाग थंड राहील अशी व्यवस्था करणें आवश्यक असतें. विष फार जालीम असेल, तर ती जखम लागलींच थंड करणें फार जरूरीचें असतें, ह्मणून तो जखम झालेला भाग ठेवतां येईल तर थंड पाण्यांत बुडवून ठेवावा. किंवा शक्य असेल तर तो वहात्या पाण्यांत धरावा. तो भाग थंड पाण्यांत धरणें शक्य नसेल, तर थंड पाण्यानें भिजलेल्या तागाचे कापडाची पट्टी वारंवार त्या ठिकाणीं बांधावी. त्याच वेळीं **कुक्षिस्नान** व **मार्जनविधि** आळीपाळीनें करावे.

**मधमाशा, गांधीलमाशा** वगैरे क्षुद्र प्राण्यांच्या दंशानें थोडीशी सूज येते, परंतु ती फार थोडा वेळ टिकते, व त्यापासून पुढें कांहीं एक परिणाम होत नाहीं. येथें हेंही सांगितलें पाहिजे कीं, शरीराच्या ज्या भागामध्यें विजातीय द्रव्याचा संचय विशेष झालेला असतो, त्या भागास सामान्यतः विषारी जंतु दंश करितात. अशा प्रकारच्या दंशास थंड पाण्याच्या पट्ट्या लावल्या असतां उत्तम गुण येतो. कारण रक्तांतील विष बाहेर घालवून देण्याचा प्रकृतीकडून जो प्रयत्न होत असतो, त्यास या थंड पाण्याच्या पट्ट्यापासून चांगली मदत होते. अथवा या पट्ट्यांच्या योगानें रक्तांतील विषाच्या भोंवतीं सूक्ष्म त्वचेचें आवरण पडतें, व त्यामुळें तें विष कांहीं वेळपर्यंत शरीरांत राहिलें, तरी त्यापासून शरीरास अपाय होत नाहीं.

जेव्हां सूज चोहोंकडे पसरूं लागते, तेव्हां विशेष भीतीचें कारण आहे असें समजून क्षणाचा विलंब न करितां ताबडतोब उपाय करण्यास आरंभ

करावा. ज्या भागास दंश झाला असेल तो भाग लागलींच थंड पाण्यामध्यें बुचकळून तसाच ठेवावा. तसें करणें शक्य नसेल तर त्या भागासभोंवतीं थंड पाण्याची पट्टी गुंडाळावी. अशा वेळीं **बाष्पस्नान** व त्यानंतर **शीतस्नान** हें रोग्याकडून करविणें शक्य असेल तर तसें अवश्य करावें. कारण त्या योगानें विषाचा जोर लागलींच कमी पडतो. दोनपासून तीन तासांच्या अंतरानें नुसत्या **शीतस्नाना**चाही स्वतंत्र रीतीनें उपाय केला असतां त्यांपासून फायदा होतो. दंशापासून उत्पन्न होणाऱ्या ज्वराची उष्णता या उपायांनीं शांत केली, ह्मणजे विष उतरण्याचें काम बरेंच हलकें होतें. शरीरांत विष गेलें असतां लंघन करणें फार चांगलें, परंतु तें न होईल तर अल्प आहार करावा. बिन चाळलेल्या पिठाची भाकरी व फळें हीं आहारास उत्तम होत. **शीतस्नान** केल्यानंतर अंगांत फिरून ऊब येण्याकरितां, उन्हांत बसणें किंवा शक्ति असेल तर मोकळ्या हवेंत थोडासा व्यायाम करणें. फार चांगलें. दंश झालेल्या भागास दडसपणा किंवा टणकपणा येईल तर त्यास वाफारा द्यावा. या वाफाऱ्यानंतर **शीतस्नान** करावें लागतें, ही गोष्ट कधींही विसरूं नये. अंगास वाफारा दिल्यानें अंगांतून घाम निघून त्याबरोबर शरीरांतील बरेंच अपायकारक द्रव्य निघून जातें.

दंशामुळें किंवा अन्य कारणानें रक्तांत विष गेलें असतां, ज्वराचीं लक्षणें होतात, हें वरील सर्व हकीकतीवरून वाचकांस कळून आलेंच असेल. या कारणास्तव रक्तांत विष गेलें असतां त्यापासून जो ज्वर उत्पन्न होतो, तो शांत करण्याचे उपाय आपण केले असतां विषाचा जोर कमी पडेल, असें जाणून आपण प्रथम त्या प्रयत्नास लागावें.

एक वीस वर्षांचा तरणा बांड मनुष्य शेतांत फिरत असतां त्याच्या डाव्या हातास एक विषारी किडा चावला. त्या किड्याच्या दंशानें फारशा वेदना झाल्या नाहींत व ज्या ठिकाणीं दंश झाला होता तो भागही विशेष सुजला नाहीं, म्हणून त्याकडे त्या मनुष्यानें विशेष लक्षही दिलें नाहीं. परंतु कांहीं तासांनीं अंगांत कांपरें भरूं लागलें. सर्व डाव्या हातास सूज चढूं ला-

गली. थोडक्याच वेळानें सर्व डावा हात खूप सुजून गेला. यानंतर बोलावणें पाठवून तेथें डाक्टरांना आणलें. डाक्टरांनीं त्या रोग्याचा हात पाहून ठरविलें कीं या रोग्याच्या सर्व हातामध्यें विष भिनलें आहे, यास्तव त्याचा सर्व डावा हात कापून काढल्यावांचून गत्यंतर नाहीं. परंतु तेथें जमलेल्या मंडळीमध्यें एक डा० कुन्हे यांचा अनुयायी होता, त्यानें डा० कुन्हे यांचा उपाय करावा असें सुचविलें. ज्या अर्थीं हात कापून काढणें कोणासही बरें वाटण्यासारखें नव्हतें, त्या अर्थीं डा० कुन्हे यांच्या उपायाची सूचना लागलींच अमलांत आली. त्याप्रमाणें त्या रोग्याच्या हातास वाफारा दिला व त्यानंतर त्यास **शीतस्नान** घातलें. याप्रमाणें बऱ्याच वेळा केलें. या उपायांनीं सूज वाढण्याची बंद झाली. **बाष्पस्नान** व **शीतस्नान** या दोन स्नानांच्या मध्यंतरीं हातास थंड पाण्याच्या पट्ट्या लावीत असत. अंगांतून घाम काढण्याकरितां त्या रोग्यास मोकळ्या हवेंत व उन्हांत बरेंच फिरावयास लाविलें. या उपायांनीं त्या मनुष्याच्या हाताची सूज लवकरच उतरली व दंशाचे सर्व परिणाम निघून गेले.

# भाग २ रा.

## स्त्रियांचे रोग.

स्त्रियांच्या शरीरांची रचना फार बिकट व भानगडीची असल्यामुळें जननेंद्रियासंबंधीं अनेक प्रकारचे रोग त्यांना होण्याचा फार संभव असतो. या रोगांपासून पुष्कळ यातना सोसाव्या लागतात.

### विटाळशीपण, गर्भारपण.

**बाळंतपण** वगैरे संबंधाचे विकार सोडून दिले, तरी याशिवाय पुष्कळ अन्य विकार स्त्रियांना होतात. हे सर्व विकार मुख्यतः लोकांचा इष्कबाजीपणा, त्यांची व्यसनाधीनता इत्यादिकांचे परिणाम आहेत. ह्याच गोष्टी स्त्रियांच्या प्रकृतीमध्यें पुष्कळ भयंकर व जीर्ण रोगांचा पाया घालण्यास का-

रणीभूत होतात. शिवाय स्त्रियांनीं खाण्यापिण्यासंबंधानें योग्य नियम न पाळणें, स्वतःच्या आरोग्याबद्दल काळजी न घेणें, मोकळ्या हवेंत नियमानें व्यायाम न घेणें, मलमूत्राचा अवरोध करणें, विषयासक्त राहणें व अशाच प्रकारें एकंदरींत सृष्टीनें घालून दिलेल्या नियमांस सोडून वागणें, या गोष्टी स्त्रियांस होणाऱ्या विकारांचीं अन्य कारणें आहेत.

या सर्व कारणांचा स्त्रियांच्या नाजूक प्रकृतीवर लवकर परिणाम होतो, व त्यांच्या प्रकृतीमधील रोगांचा प्रतिकार करण्याचें सामर्थ्य तेव्हांच नाहींसें होऊन त्यांचें शरीर अनेक रोगांचें स्थान बनतें.

वर सांगितलेल्या कारणांचा ज्या स्त्रियांना फारसा स्पर्श होत नाहीं, त्यांची प्रकृति किती निरोगी व धडधाकट असते, हें पाहण्यास खेडेगांवामध्यें शेतांत खपणाऱ्या शेतकऱ्यांच्या बायका व वैदू, कैकाडी, वडार वगैरे लोकांच्या बायका यांच्या प्रकृतीची [illegible]ति पहावी म्हणजे झालें. या बायका व शहरांतील लोकांच्या बायका यांच्या शरीरप्रकृतीमध्यें किती अंतर असतें बरें ? शहरांत डाक्टरांची व वैद्यांची गर्दी असूनही तेथील बायका फिकट व अशक्त दिसतात व त्यांपैकीं पुष्कळांना धुपणी वगैरे विकार झालेले असतात. परंतु खेडेगांवांतील बायका ज्यांना विशेष काबाडकष्ट करावे लागतात, व ज्या आजारी पडल्या तर ज्यांना औषध मिळण्याची देखील मारामार असते, त्यांची प्रकृति शहरांतील बायकांच्या प्रकृतीपेक्षां किती तरी निरोगी व धडधाकट असते.

डा० कुन्हे यांच्या उपायांपासून स्त्रियांच्या रोगांवर उत्तम गुण येत असल्यामुळें, त्यांवर त्यांची फार श्रद्धा बसली आहे. व अन्य देशांत त्यांच्या उपायांवर त्याचप्रमाणें मुखपरीक्षेवरही पुष्कळांची श्रद्धा बसली आहे. हें शास्त्र स्त्रियांना विशेष प्रिय व ग्राह्य वाटण्याचें कारण हें आहे कीं, या शास्त्राच्या योगानें रोगाची परीक्षा तावडतोब व अचूक करितां येत असल्यामुळें रोगाची परीक्षा करविण्याकरितां सर्व लज्जा सोडून शरीराचा लज्जेचा गुह्य भाग डॉक्टरास दाखविण्याचा दुःखकारक प्रसंग त्यांना टाळतां येतो.

रोग कोणता झाला आहे व त्याचें कारण काय आहे, याचा निर्णय करणें ही गोष्ट विशेषतः स्त्रियांच्या प्रकृतीसंबंधानें फार महत्त्वाची आहे. स्त्रियांना आपलें शरीर डाक्टरास दाखविण्याची लाज वाटत असल्यामुळें पुष्कळ स्त्रियांच्या रोगास योग्य उपचार होत नाहीं, व त्यामुळें अनर्थकारक परिणाम घडून येतात.

डा० कुन्हे यांच्या पद्धतीमध्यें गुह्येंद्रियांस यंत्रें किंवा शस्त्रें लावण्याचा प्रसंग कधींही येत नाहीं, यास्तव ही पद्धत स्त्रियांना किती सोईची व सुखावह असली पाहिजे, याचा सुज्ञ मनुष्यांनीं विचार करावा.

जर्मनी व अन्य देशांमध्यें डा० कुन्हे यांच्या उपायांचा स्त्रियांमध्यें विशेष प्रसार झाला आहे, हें या उपायांच्या उपयुक्ततेचें ढळढळीत प्रमाण आहे. स्त्रियांना कोणताही रोग झालेला असो, त्यास या उपायांनीं गुण येतोच.

**विटाळ वेळेवर न होणें वगैरे स्त्रियांच्या विटाळासंबंधानें विकार.** ऋतुकालीं रजःस्राव ( विटाळ ) होणें हें शरीर गर्भधारणास योग्य आहे या गोष्टीचें द्योतक आहे. प्रतिमासीं **रजोदर्शनकालीं** स्त्रियांना जो रक्तस्राव होतो, त्याची योजना मुख्यतः स्त्रियांच्या शरीरांतील गर्भाचें पोषण व्हावें याकरितां आहे. जेव्हां पोटांत गर्भ नसतो, तेव्हां या रक्ताचा उपयोग न झाल्यामुळें त्याचा सामान्यतः महिन्यानें स्राव होतो. ज्यांची प्रकृति निरोगी आहे, अशा स्त्रियांना विटाळशीपणीं हा स्राव होतांना कसल्याही वेदना किंवा त्रास होत नाहीं. यास्तव अशा वेळीं जेव्हां वेदना किंवा त्रास होतो, तेव्हां शरीरांत दोषिक द्रव्याचा संचय झाला आहे, असें समजावें.

पुष्कळ दिवसांच्या अनुभवावरून असें सिद्ध झालें आहे कीं, स्त्रियांच्या रजोदर्शनाचा चंद्राच्या कलांशीं संबंध आहे. ज्या स्त्रीची प्रकृति पूर्ण निरोगी आहे, अशा स्त्रीस रजोदर्शन पौर्णिमेच्या आधींच्या तीन चार दिवसांत झालें पाहिजे व विटाळशीपणाची पाळी फिरून बरोबर २९ दिवसांनीं आलीच पाहिजे, वर दिलेल्या कालाच्या सुमारास ज्या स्त्रिया रजस्वला होत नसतील, त्यांच्या पोटामध्यें दोषिक द्रव्याचा संचय झाला आहे असें सम-

जावें, व रजोदर्शनाचा काल पौर्णिमेपासून जितका जास्त दूर असेल तितका शरीरामध्यें विजातीय द्रव्याचा संचय जास्त झाला आहे असें जाणावें. रजोदर्शन तीन वारांनीं किंवा १५ दिवसांनीं होणें, किंवा रजोदर्शन जाहल्यापासून जास्त दिवस स्राव होत राहणें, हें देखील शरीरांत विजातीय द्रव्य जास्त असल्याचें लक्षण आहे.

सृष्टीमधील प्रत्येक वस्तूमध्यें कांहीं तरी फेरफार सतत होत असतो; व अशा प्रकारची गोष्ट स्त्रियांच्या विटाळासंबंधानेंही आहे. स्त्रियांना विटाळ केव्हां व किती अवधीनें होतो, ही गोष्ट लोकांस वाटते त्यापेक्षां जास्त महत्त्वाची आहे. त्याचप्रमाणें विटाळशीपणामध्यें शारीरिक व मानसिक स्वास्थ्य राखणें व ज्यांच्या योगानें मन क्षुभित किंवा उद्दीपित होईल, अशा गोष्टी वर्ज करणें, या गोष्टी अत्यावशक आहेत. असें न केल्यास स्त्रियांच्या प्रकृतीस अनेक प्रकारें अपाय होण्याचा संभव असतो. गर्भार स्त्रियांना तर ही गोष्ट विशेष लागू आहे, गर्भार स्त्रियांच्या सर्व कृत्यांचा व त्यांच्या मनांतील सर्व विचारांचा गर्भावर परिणाम होतो. स्त्री गर्भार असतांना तिच्या मनांत ज्या वृत्ती उत्पन्न होतील, किंवा जे विचार येतील, त्या सर्वांचा संस्कार गर्भांतील प्राण्यांवर होतो. यास्तव गर्भवती स्त्रीच्या मनाची वृत्ति चांगली ठेवण्याविषयीं फार जपलें पाहिजे. त्याचप्रमाणें गर्भारपणामध्यें जे विकार होतात, त्यांनाही योग्य उपचार वेळेवर केले पाहिजेत. कारण त्यांची हयगय केल्यानें पुढें फार भयंकर परिणाम होतात.

स्त्रियांच्या शरीरांत ज्या क्रिया चालतात, त्यांच्यापासून सूक्ष्म रीतीनें निरीक्षण करणाऱ्यास पुष्कळ महत्त्वाच्या गोष्टी कळून येतात. सृष्टीचें सर्व मुख्य नियम एका विशिष्ट तत्त्वास धरून आहेत, या गोष्टीचें प्रत्यक्ष प्रमाण या क्रियांच्या अवलोकनापासून आपणांस प्राप्त होतें. या विषयासंबंधानें ज्यांना सविस्तर माहिती पाहिजे असेल, त्यांनीं डा० कुन्हे यांचें **मुखपरीक्षाशास्त्र** हें पुस्तक वाचावें.

पूर्वीं सांगण्यांत आलेंच आहे कीं, विटाळवाजवीपेक्षां जास्त किंवा कमी

अवधीनें अथवा अनियमितपणानें होणें, हें शरीर रोगी असल्याचें लक्षण आहे. आतां हा शरीरांतील दोष कसा काढावा, हा प्रश्न उत्पन्न होतो. प्रथमतः हा विकार कसा उत्पन्न होतो तें पाहूं. शरीरांत दोषिक द्रव्याचा संचय झाल्यानें अन्नपचन बिघडतें व त्यामुळें हा विकार उद्भवतो. त्याचप्रमाणें मलशुद्धि साफ होऊन अन्नपचन सुधारेल व पोटांतील उष्णता किंवा कडकी कमी होईल, असे उपाय आपण केले म्हणजे हा विकार आपोआप नाहींसा होतो.

रोग्याच्या प्रकृतीप्रमाणें व शरीरांतील दोषिक द्रव्याच्या संचयाच्या मानानें फेरफार करून ठरविलेलीं शीतस्नानें, पथ्य आहार व डा० कुन्हे यांचे अन्य उपाय यांनीं स्त्रियांच्या विटाळासंबंधीं सर्व प्रकारचे रोग बरे होतात, असें पुष्कळ रोग्यांविषयींच्या प्रत्यक्ष अनुभवावरून सिद्ध झालें आहे.

स्त्रियांचें रज ( विटाळ ) हें त्यांच्या शरीरांतील फाजील रक्त आहे. या रक्ताचा स्त्रियांच्या खुद्द शरीरास कांहीं उपयोग नाहीं. त्याचा उपयोग फक्त गर्भाचें पोषण करण्याचे कामीं होतो. या गर्भाची विशेष वाढ पौर्णिमेच्या सुमारास होते, व याच वेळीं सर्व निरोगी, परंतु गरोदर नाहींत, अशा स्त्रियांना रजोदर्शन होतें हें पूर्वींच सांगितलें आहे.

त्याचप्रमाणें अशीहि गोष्ट आहे कीं, ज्या रोगांचा गर्भाशयाशीं संबंध आहे, त्या रोगांचा जोर शुक्ल पक्षामध्यें जास्त होत जातो, व कृष्णपक्षामध्यें कमी होत जातो. यावरून मनुष्याच्या प्रकृतीचा व बाह्यसृष्टींतील गोष्टींचा किती निकट संबंध आहे, हें लक्षांत येईल.

स्त्रिया गर्भवती असतांना ज्या गोष्टी घडतात, त्यांचा गर्भावर कसा परिणाम होतो, याविषयींचीं ३१४ मनोरंजक उदाहरणें डा. कुन्हे यांनीं आपल्या ग्रंथांत दिलीं आहेत. तीं येणेंप्रमाणें आहेत.

एका स्त्रीस उंदराची अतिशय भीति वाटत असे. ही स्त्री गर्भार असतांना तिच्या उघड्या हातावरून एक उंदीर पळत गेला. गर्भार होण्याच्या ज्या वेळेच्या सुमारास ती विटाळशी होत असे, त्या सुमारास एके वेळीं एक

उंदीर तिच्या डाव्या हातावरून पळत गेला या गोष्टीपासून त्या स्त्रीच्या मनास एवढा धक्का बसला कीं, त्या प्रसंगाचा तिला विसर पडेना. ती गोष्ट तिच्या स्वप्नांत देखील येई. परमाश्चर्याची गोष्ट ही कीं, पुढें सहा महिन्यांनीं जेव्हां त्या स्त्रीस मूल झालें, तेव्हां त्या मुलाच्या हातावर एक हुबेहुब उंदराच्या आकाराचा चट्टा होता. त्या आकृतीस उंदरासारखें शेपूट होतें. इतकेंच नव्हे, तर त्या सर्व आकृतीवर उंदराच्या केंसांसारखे केंसही होते.

**दुसरें उदाहरण**—एक बाई सहाव्यांदां गर्भार होती. तिला पूर्वीं जीं पांच मुलें झालीं होतीं, त्या सर्वांचे केस काळे होते. सहाव्या गर्भारपणामध्यें या बाईच्याबरोबर, जीवर त्या स्त्रीचें फार प्रेम होतें अशी एक मुलगी, त्या बाईच्या सहाव्या गर्भारपणामध्यें तिजबरोबर नित्य असे. या मुलीचे केंस लांबसडक, कुरळे, तुकतुकीत व तांबूस रंगाचे होते. अशा प्रकारचे केंस क्वचितच दृष्टीस पडतात, व ही मुलगी त्या स्त्रीस फार आवडत असल्यामुळें, आपणास तिच्यासारख्या केंसांची मुलगी व्हावी, अशी तिच्या मनांत फार उत्कट इच्छा होती. ही इच्छा ती स्त्री ज्या वेळच्या सुमारास विटाळशी होत असे त्यावेळीं इतकी प्रबल होई कीं; तिला त्या गोष्टीचें स्वप्न पडे. पुढें पांच महिन्यांनीं ती स्त्री प्रसूत होऊन तीस मुलगी झाली. या मुलीचें नाक, डोळे तिच्या आईबापांसारखे होते. परंतु तिचे केंस मात्र हुबेहूब त्या मुलीसारखे होते.

**तिसऱ्या एका** स्त्रीची हकीकत अशीच चमत्कारिक आहे. एक स्त्री जवळ कुत्रें घेऊन गाडींत बसून चालली होती. गाडी चालली असतांना कांहीं गोष्ट त्या कुत्र्याच्या नजरेस पडून, त्या कुत्र्यानें एकदम गाडीखालीं उडी टाकली; परंतु कांहीं कारणानें तें कुत्रें अशा भलत्या ठिकाणीं पडलें कीं, त्याच्या अंगावरून गाडीचें चाक गेलें व त्याखालीं त्या कुत्र्याचें डोकें चिरडून गेलें. तें पाहून ती स्त्री फार घाबरून गेली. यावेळीं ती स्त्री गर्भार होती. परंतु या वरील अपघाताचा त्या स्त्रीच्या मनावर इतका परिणाम झाला कीं, पुढें तिला सहा महिन्यांनीं जें मूल झालें, तें उपजतांच मेलेलें निघालें व

त्याचें डोक ( त्या कुत्र्याच्या डोक्याप्रमाणें ) चेपटलेलें-चेंगरलेलें होतें.

आणखी एक चवथें उदाहरण सांगतों. एका बाईस एक मूल झालें, त्याच्या तोंडाची जिवणी एका कानापासून दुसऱ्या कानापर्यंत लांब होती. हें मूल जन्मल्यावर थोड्याच वेळानें मेलें. या मुलाचें तोंड असें विद्रूप होण्याचें कारण हें होतें कीं, त्या मुलाची आई गर्भार असतांना एका बहुरूप्याची लांबच्या लांब तोंडाची जिवणी पाहून तिला फार भीति वाटली होती. या भीतीचा त्या स्त्रिच्या मनावर इतका परिणाम झाला होता कीं, तिजमुळें त्या स्त्रीस कित्येक दिवस स्वस्थपणानें झोंप आली नाहीं. ही गोष्ट निःसंशयपणें त्या स्त्रीच्या विटाळशीपणाच्या वेळेच्या सुमारास घडून आली असावी. एरव्हीं त्या गोष्टीचा गर्भावर इतका परिणाम झाला नसता.

स्त्रिया गर्भार असतांना ज्या वेळेच्या सुमारास स्त्रियांची विटाळशीपणाची पाळी असते, त्या वेळेस त्यांची जी शारीरिक व मानसिक स्थिति असते, तिचा परिणाम मुलावर कसा होतो, हें वरील उदाहरणांवरून चांगलें लक्षांत येईल. यावेळीं त्यांचे मन उदासीन व विरक्त असेल तर गर्भांत असलेल्या मुलाचीही वृत्ति पुढें केव्हां तरी त्याच धोरणावर जाते. मुलाचे अंगांतील रागीटपणा, भित्रेपणा, धैर्य, चोरी करण्याचें वेड, लबाडीपणा, लोभ इत्यादि सर्व प्रकारचे चांगले व वाईट गुण अशाच कारणांनीं उत्पन्न होतात.

यावरून असें अनुमान निघतें कीं, ज्या गोष्टींचा आपल्या मनावर अथवा ज्ञानेंद्रियांवर परिणाम होतो, त्यांचा परिणाम तेथेंच संपत नाहीं, तर ज्ञानतंतूंच्या योगानें त्याचा प्रसार पोटापर्यंत ह्मणजे पोटांतील सर्व इंद्रियांवर होतो. ह्या वेळपर्यंत रोगांच्या मूळकारणाच्या उत्पत्तीविषयीं जें सांगितलें आहे, तें ज्यांच्या ध्यानांत पूर्णपणें उतरलें असेल, त्यांना हें खरें वाटेल कीं, सर्व रोगांची मूळ उत्पत्ति पोटांत होते, व तेथून त्यांचा पुढें प्रसार होतो. डा० कुन्हे यांचे उपाय मुख्यतः शरीराच्या ज्या भागास करावे लागतात, व त्यापासून जो गुण येतो, या गोष्टी वर सांगितलेल्या गोष्टींचें प्रत्यक्ष प्रमाण होत.

## गर्भाशयभ्रंश.

गर्भाशयामध्यें विजातीय द्रव्याचा संचय झाल्यानें हा विकार होतो. गर्भाशयामध्यें प्रतिकार करण्याचें सामर्थ्य फार थोडें असल्यामुळें त्यामध्यें सांचलेल्या दोषिक द्रव्यापासून जी उष्णता व जो दाब उत्पन्न होतो, तो गर्भाशयास सहन न होऊन तो पुढें ढकलला जातो, ही गोष्ट पूर्वी तिसऱ्या प्रकरणाच्या १६ व्या भागामध्यें सांगितलेल्या अंतर्गळ या रोगासारखीच आहे.

गर्भाशयाचा स्थानापासून भ्रंश होण्याचें कारण जें वर दिलें आहे, तें डॉक्टरांस माहीत नाहीं. त्यांचे उपाय या विकाराच्या मूळापर्यंत जात नाहींत. अशावेळीं डॉक्टर लोक गर्भ मागें हटवून धरण्याकरितां उपस्थामध्यें रबराची कडी किंवा चाती अथवा पेसरी ( सोंगटी ) बसवितात. अशा प्रकारच्या उपायानें तेवढ्या वेळेपुरता गुण वाटतो, परंतु विकाराचें मूळकारण नाहींसें होत नाहीं.

या विकारावर डा. कुन्हे यांचे उपाय केल्यानें ज्या दोषिक द्रव्यामुळें गर्भाशय आपल्या स्थानापासून भ्रष्ट होतो, तें कारण नाहींसें होतें, व पेसरी ( औषधी सोंगट्या ) उपयोग करण्याचें प्रयोजन न राहून, हा विकार पूर्णपणें बरा होतो, व तो फिरून होण्याचा संभवही राहत नाहीं. हीच गोष्ट **गर्भाशय वक्र होणें** या विकारास लागू आहे. दोषिक द्रव्यामुळें पोटांत अतिशय दाब उत्पन्न झाल्यामुळें हा विकार होतो. पोटांत आरोग्यास घातुक असे पदार्थ इतके सांचतात कीं, त्या योगें स्त्रियांचा गर्भाशय नेहमींच्या जागेपासून परावृत्त होऊन वांकतो. याही रोगांस पूर्वी सांगितलेलें औषध द्यावें. उपचार योग्य आहे हें डा० कुन्हे यांच्या औषध देण्याच्या रीतीनें बरे झालेल्या रोग्याच्या हकीकतीवरून सिद्ध होतें. इंद्रियावर शस्त्रक्रिया व हस्तक्रिया यांच्या योगानें केवळ इंद्रियास नेहमींची दुखापत होते, असें अनुभवानें ठरलें आहे.

**वांझपण**–मुलें न झाल्यामुळें आपलें लग्न निष्फळ झालें असें समजून,

माझ्याकडे पुष्कळ स्त्रिया येतात, व दुःख प्रदर्शित करितात, तरी त्यांना वाटतें आपण निरोगी आहों; ही मोठी चूक आहे. वांझपणा शरीरांत विशेषेंकरून जननेंद्रियाचे भागांत दोषिक द्रव्य सांचल्यानें येतो. कांहीं स्त्रियांच्या शरीरामध्यें दोषिक द्रव्याचा संचय असूनही गर्भधारणा होते. परंतु अशावेळीं दोषिक द्रव्यामुळें पोटांत जी उष्णता व दाह उत्पन्न होतो, त्यामुळें स्त्रिया योग्य वेळेच्या अगोदर प्रसूत होतात. वाखे बहुतेक गर्भधारणेनंतर चार महिन्यांचे आंत होतात. मनास धक्का बसणें किंवा एकदम भीति वाटणें, वगैरे आकस्मिक कारणांनीं शरीरांतील विजातीय द्रव्य नासूं लागतें व त्यामुळें वाखा होण्यास मदत होते कमर घट्ट आंवळण्यापासूनही वाखा होण्याचा संभव असतो. ..

युरोपांत खेडेगांवांतील बायका शहरांतील बायकांपेक्षां आरोग्यशास्त्रास जास्त अनुसरून राहतात, ह्मणून तेथें वाखे होत नाहींत. येथें कांहीं कांहीं बायका तर ७ व्या महिन्यापर्यंत नाचांत नाचतात, व पुढें त्यांना कांहीं त्रास होत नाहीं, हें मीं प्रत्यक्ष पाहिलें आहे.

विजातीय द्रव्य गर्भाशयांत सांचलें ह्मणजे वाखे होतात, असें सांगितलेंच आहे. हे सांचलेले पदार्थ काढल्यानेंच वाखे बंद होतील.

शस्त्रक्रियेनें व पिचकारीनें औषध घालणें वगैरे उपाय यांच्या योजनेनें कधींही गुण पडत नाहीं व शिवाय ह्या स्त्रियांचे मर्यादेस विघातक होतात. त्यांच्या योगानें शरीरांतील रोग आपोआप बरे करण्याचा प्रकृतिसिद्ध धर्म नाहींसा होतो, व मग माझें औषधही लटपटतें.

येथें मी आणखी एक महत्त्वाची गोष्ट नमूद करितों. अनुभवाअंतीं सिद्ध झालें आहे कीं, पुरुषांनीं वाटेल त्या वेळीं संबंध करूं नये. सृष्टींतील इतर गोष्टीप्रमाणें मनुष्यासही सकाळीं इतर कोणत्याही वेळेपेक्षां ताकद अधिक असते. ह्मणून गर्भधारणेस सकाळ फार चांगली. रात्रीच्या पूर्वभागामध्यें संभोग केल्यानें स्त्रीपुरुषांचे ज्ञानतंतु पहिल्यानें उद्दीपित होतात, नंतर अशक्त हो-

तात. इतकेंच नाहीं, तर गर्भ राहिलाच तर तो सकाळीं संभोग केला असतां जितका जोमदार होतो तितका होत नाहीं.

शरीरांत सांचलेले पदार्थ थोडे असतील व शरीरांत जर जीवनशक्ति थोडी तरी कायम असेल, तर वांझपणा काढतां येईल. माझ्या औषधानें पुष्कळ बायकांचा वांझपणा गेला आहे.

एका स्त्रीस वयांत येऊन ८ वर्षें झालीं, तरी मूल होईना. तिला तर मुलाचा ध्यास लागला होता. मोठमोठे वैद्योपाय केले, पण गुण येईना. शेवटीं ती माझ्याकडे आली. मीं तिला समजावून सांगितलें कीं तुमचा वांझपणा पोटांत विजातीय द्रव्य सांचल्यामुळें आला आहे, व तो अगोदर काढला पाहिजे. तुह्माला बरें करण्याचा हाच एक मार्ग आहे.

मीं तिला रोज दोन तिनदां शीतस्नानें करण्यास, व अनुत्तेजक अन्न खाण्यास व सृष्टिनियमाप्रमाणें एकंदर व्यवस्था ठेवण्यास सांगितलें. याप्रमाणें शरीरांतील दोषिक द्रव्य हळू हळू निघून गेल्यावर कांहीं महिन्यांनीं तिला गर्भधारणा झाली. पुढें कांहीं महिन्यांनीं ती बाई सुखानें बाळंत झाली, व मूल निरोगी निपजलें. या योगानें माझी औषध देण्याची पद्धति गुणावह ठरली.

**स्तनांस व्याधि होऊन स्तन दुखणें व त्यामध्यें दूध नसणें**— मुलांना अत्यंत उत्तम अन्न ह्मणजे आईच्या स्तनांतील दूध होय. कारण तें देवानें त्यांच्याचकरितां केलेलें असतें. दुधाच्या उत्पत्तिस्थानाचें इंद्रिय (स्तन) हें फार महत्त्वाचें आहे. पण त्याच्या क्रियेसंबंधानें आजकाल लोकांमध्यें अज्ञानानें दुर्लक्ष आहे. यामुळें चांगली प्रजा उत्पन्न होण्याच्या एका साधनाची हेळसांड होत आहे. ज्यांना आपलीं मुलें पाजण्याचें सामर्थ्य मुळींच नाहीं, अशा किती तरी बायका आहेत. या गोष्टीचा नीट विचार केला तर, इतक्या बायका प्रजोत्पत्तीस नालायक आहेत, असें ह्मणतां येईल. असें कधीं तरी जनावरांत दृष्टीस पडतें काय? मादीला पोरें पाजतां येत नाहीं किंवा तिनें पाजलीं तर स्तन दुखूं लागतात, असें आपणांस कधीं

दिसून येतें काय? मुळींच नाहीं. ज्या अर्थी मनुष्यांतच अशी स्थिति आपण पाहतों, त्याअर्थी या गोष्टीस कांहीं विशेष कारणें असलीं पाहिजेत हें उघड होतें.

गर्भधारणेच्या अथवा मुलें पाजण्याच्या पूर्वी स्तन विशेष मोठे होणें, हें त्यांतील एक कारण आहे. ज्यांचे स्तन या रीतीनें मोठे होतात अशा बायकांपैकीं बऱ्याच बायका मुलें पाजण्यास अगदीं असमर्थ व कांहीं बायकांच्या स्तनांचीं बोंडें, मुलें पाजलीं असतां दुखूं लागतात; असें प्रचितीस येतें. गर्भारपणाच्या अगोदर स्तन मोठे असणें हें निरोगीपणाचें लक्षण नव्हें; उलटपक्षीं आंगांत दोषिक द्रव्य सांचल्याचें हें द्योतक आहे.

विशेषेंकरून खेडेगांवांत आपणांस बायका वेदना किंवा त्रास झाल्याशिवाय बाळंत होतांना व तसेंच त्रास झाल्यावांचून मुलें पाजतांना पहाण्यास मिळतें. आणि या बायकांना गर्भधारणेच्या पूर्वी व मुलें पाजतांना अशा दोन्ही वेळां मोठे व पुष्ट स्तन नसतात. स्त्री जर अति कृश असेल तरीही तिला दूध कमीच असलें पाहिजे. अशा प्रकारच्या स्त्रियांच्या अंगांत दोषिक द्रव्य फार दिवस सांचलेलें असतें. अशा स्त्रीस जर आजकाल ज्यास लोक पौष्टिक अन्न असें ह्मणतात, असें मांस, दारू, अंडीं, दूध वगैरे पदार्थ खाण्यास दिले तर मूल पाजण्यास त्या स्त्रीस थोडें देखील दूध नसतें असें मीं स्वतः पाहिलें आहे.

उलटपक्षीं मीं पुष्कळ वेळां असा अनुभव घेतला आहे कीं, योग्य व अनुत्तेजक असें अन्न दिलें असतां व अशीं **शीतस्नानें** व **बाष्पस्नानें** केलीं असतां, मुलें पाजण्याचें सामर्थ्य स्त्रियांना येतें व रोगयुक्त स्तन बरे होतात.

एक बाई तिसऱ्यानदां बाळंत झाली, व आपलें मूल आपण स्वतःच दुधावर पाजावें अशी जरी तिची इच्छा होती, तरी ती पहिल्या दोन्ही मुलांच्या वेळेस तृप्त झाली नाहीं. बाळंत होण्याचे पूर्वी कांहीं दिवस तिनें आपल्या प्रकृतीस माझे उपाय केले व तिसऱ्या बाळंतपणांत तिला पुष्कळ दूध येऊन मूल स्वतः पाजण्याची तिची इच्छा तृप्त झाली.

माझ्या धंद्यांत मला असले पुष्कळ रोगी आढळले. रोगयुक्त स्तन असलेल्या पुष्कळ बायका या उपायांनीं बऱ्या झाल्या आहेत, त्यांपैकीं एका बाईची हकीकत खालीं दिली आहे. बाळंत झाल्यावर कांहीं दिवसांनीं एका तरुण स्त्रीचे स्तन सुजून तिला वेदना होऊं लागल्या. गृहवैद्यानें शेवटचा उपाय म्हणून दुसरे दिवशीं ते कापावयाचे म्हणून ठरविलें. ते कापून द्यावयाला त्या बाईचा धीर होईना, म्हणून त्याच दिवशीं संध्याकाळीं बराच उशीर झाल्यावर तिनें मला बोलावण पाठविलें. मीं तिला सांगितलें कीं, माझ्यामतें शस्त्रक्रिया केवळ निष्फळ होईल इतकेंच नव्हे, तर ती करणें धोक्याचें आहे; व मला वाटतें मी निराळ्या उपायानें थोडक्या काळांत तुम्हांस बऱ्या करीन. तिनें मोठ्या आनंदानें मीं सांगितल्याप्रमाणें उपाय केले. ९५ डिग्री फॅरन्‌हाईट उष्णतेचें पाणी घेऊन प्रत्येक वेळीं अर्धा तास तिनें दिवसांतून चार वेळां **मार्जनविधि** केला. दुसऱ्या दिवशीं तिची प्रकृति पुष्कळच सुधारली. आणखी थोड्या दिवसांनीं स्तनांतील सर्व ठणकणें गेलें. व आणखी कांहीं दिवसांनीं तिच्या दुखण्याचें कारण जें पोटांत सांठलेलें विजातीय द्रव्य तें नाहींसें झालें आणि तिची प्रकृति ताळ्यावर आली.

डॉक्टरांच्या सर्व शास्त्रीय वादविवादापेक्षां वरील रोगी बरे झाल्यामुळें होणारी शिफारस महत्त्वाची आहे. आणि असल्या आजारांतही माझें औषध लागूं पडतें, त्याचेंही वरील उदाहरण एक प्रत्यक्ष प्रमाण आहे.

**बाळंतपणांत येणारा ताप**—या भयंकर निर्घृण व सर्वांची आहुति घेणाऱ्या आजारापायीं हजारों सुखी बायका मरतात. आजपर्यंत मनुष्यप्राण्याचे सर्व यत्न निष्फळ झाल्यामुळें तर हा आजार फारच भीतिदायक वाटतो.

या विकाराचा उद्भव, हें शरीरांत विजातीय द्रव्य सांचल्याचें एक खातरीचें चिन्ह आहे. हें घातुक द्रव्य शरीरांत असल्याशिवाय व तें नासल्याशिवाय हा भयंकर ताप येत नाहीं. बाळंत असतांना ज्या स्त्रीच्या शरीरांत विजातीय द्रव्य बऱ्याच प्रमाणानें सांचलें आहे, त्याच स्त्रीला हा विकार होतो. गर्भाशयांत किंवा कातड्याचे थरांत असलेलें रक्त नासून, नंतर त्याचे

योगानें आसपासच्या भागांत असलेलें विजातीय द्रव्य नासल्यामुळेंच हा रोग होतो असें नाहीं. हा रोग बरा करावयाचा असेल तर त्यास कारणीभूत जें शरीरांत सांचलेलें विजातीय द्रव्य तें काढून टाकिलें पाहिजे. हें कार्य **उपस्थस्नानानें** त्वरित घडतें.

सुखानें बाळंत झाल्याच्या दुसऱ्या दिवशीं एका स्त्रीस बाळंतपणांत येणाऱ्या तापानें पछाडलें. सुइणीनें पुष्कळ ज्वर उत्पन्न करणारे उपचार केले, परंतु त्यांचा उपयोग झाला नाहीं. शरीरांतील विजातीय द्रव्य नासल्यामुळें शरीरांत उत्पन्न झालेली उष्णता तर थंड उपचार केल्याशिवाय जावयाची नाहीं. "तुह्मी जर मीं सांगितल्याप्रमाणें कराल तर मी तुम्हास खास बऱ्या करीन" असें कुन्हे यांनीं त्या बाईस सांगितलें. त्यावर ती ह्मणाली "तुह्मी वाटेल तें सांगा, मी करण्यास तयार आहें" त्यावर तिला प्रत्येक वेळीं १० पासून १५ मिनिटांपर्यंत अशा प्रकारें दिवसांतून तीन किंवा चार वेळां **मार्जनविधि** करण्यास सांगितलें. हा उपाय रोज करावयाचा होता, व त्याचें पाणी ६४ डिग्री **फॅरन हाईट**चें घ्यावयाचें होतें. वर सांगितलेल्या उष्णतेचें पाणी तयार करणें त्रासदायक असल्यामुळें तिनें तोटींतून आलेलें ५० डिग्रीचेंच पाणी घेतलें. बाकी सर्व उपचार तिनें मीं सांगितल्याप्रमाणें बिनचूक केले. या जास्त थंड पाण्यानें कांहीं नुकसान झालें नाहीं. उलट त्यानें गुण लवकर आला. आतां येवढें खरें आहे कीं, सांगितल्याप्रमाणें पाणी घेतलें असतें तर सुखदायक झालें असतें. ज्यांच्या शरीरांतील रोग आपोआप बरा करण्याची शक्ति विशेष कमी नसते, त्यांना थंड पाण्यानें लवकर गुण येतो. १८ तासांत या स्त्रीचा ताप कमी झाला व त्या बाईच्या दुखण्याची सर्व भीति निघून गेली. एका आठवड्यांत त्या बाईस रोजचें काम करितां येऊं लागलें. हेंही **मार्जनविधी**पासून गुण कसा विलक्षण लवकर येतो, याचें एक ढळढळीत उदाहरण आहे. या विधीनें शरीरांतील दोषिक द्रव्य मलद्वाराकडे ओढलें जातें व त्या योगानें तें नासण्याची क्रिया बंद पडल्यामुळें ज्वर बंद होतो.

हे उपाय आणखी कांहीं दिवस केल्यावर ती बाई पूर्वी जन्मांत कधीं नव्हती इतकी निरोगी झाली. जुन्या डॉक्टरांनीं जे उपचार केले असते, त्यांच्या अगदीं विरुद्ध उपचार मीं केले, हें दिसून येईल. डॉक्टर लोक बहुधा डोक्यावर बर्फाच्या पिशव्या ठेवून तें थंड ठेवतात, आणखी पोट तर ऊन ठेवतात. व या योगानें जो पदार्थ खरोखर नाहींसा केला पाहिजे तो वाढवितात. बर्फाच्या पिशव्या नेहमीं डोक्यावर कां ठेवाव्या हें मला मोठें गूढ आहे. कारण या योगानें तेथें रक्त येऊं लागतें. सर्वांस हें माहीत आहे कीं, शरीरांतील दोषिक द्रव्य काढून टाकण्याचें काम डोक्याचें नाहीं. तें काम मलद्वारांचें आहे. बर्फानें मस्तक थंड होतें इतकेंच नव्हें, तर त्यानें मेंदूमध्यें बधीरपणा येतो. अशा प्रकारें जो थंडावा येतो, तो मोडून टाकण्याकरितां रक्ताचा पुरवठा जास्त करून शरीरांत नेहमींप्रमाणें उष्णता उत्पन्न करण्याचा प्रकृति प्रयत्न करिते. याप्रमाणें डोक्याकडे रक्त येऊं लागलें ह्मणजे साहजिकपणें उष्णता वाढते. मग बाहेर दिसावयाला डोक्यांत थंडपणा व सुस्ती दिसते, परंतु आंत खरोखर भयंकर उष्णता उत्पन्न झालेली असते. या परस्परविरुद्ध अवस्थांचें एकीकरण लवकर झालें नाहीं, तर लवकर मृत्यु येईल.

आणखी एका आजाऱ्याची गोष्ट सांगतों. एक बाई बाळंत झाल्याच्या दुसऱ्या दिवशीं या तापानें आजारी पडली, मला बोलावणें आलें. मोठमोठ्या डॉक्टर महाडाक्टरांनीं उपाय केले होते, परंतु गुण नव्हता. दुखणें तर आतां कठिण झालें होतें; इतकेंच नव्हे, तर जीर्ण व कष्टसाध्यही झालें होतें. शेवटीं एका आठवड्यानें मेंदु बिघडून त्या बाईस वायु झाला. व डाक्टरांच्या तोंडचें पाणी पळालें. यावेळीं त्यांनीं मला तार केली, व मी येऊन पाहतों तों बाई या स्थितींत होती. अर्थात् पहिलें काम मुरलेला जीर्णताप बरा करण्याचें होतें व तें मीं केलेंही. प्रत्येक वेळीं एक एक तासपर्यंत, अशा प्रकारें दिवसांतून कित्येक वेळां मार्जनविधि केल्यानंतर पोटांतील उष्णता कमी झाली व मेंदुही ताळ्यावर आला.

एवढ्या थोड्या अवकाशांत ताप आणणारें शरीरांतील घातुक दोषिक द्रव्य

पूर्णपणें नाहींसें झालें नाहीं. पण त्या बाईच्या प्रकृतीसंबंधानें भीतीचें कारण उरलें नाहीं.

तिनें कांहीं दिवस मार्जनविधि व पथ्य आहार चालू ठेवल्यावर तिची प्रकृति पूर्णपणें निरोगी झाली. तेव्हांपासून या वेळपर्यंत या स्त्रीची प्रकृति अगदीं निरोगी राहिली आहे, असें तिचे ' लीप्सिस ' येथें राहणारे नातेवाईक सांगतात.

# भाग ३ रा.

## स्त्रिया कोणत्या उपायांनीं सुखप्रसूत होतील ?

या सृष्टीच्या राज्यांत, यासारखी घडामोड चालणाऱ्या जगांत, प्रत्येक प्राणिमात्र कधींही न बदलणाऱ्या कायद्यांनीं बांधलेला आहे, हें स्पष्टपणें समजून येण्यासारखें आहे.

जीं जनावरें मनुष्याच्या संपर्कापासून अलिप्त असल्याकारणानें हीनदशेस पोहोंचलीं नाहींत, त्यांच्यामध्यें प्रसूति कशी होते, हें आपण पाहूं.

रानामध्यें स्वतंत्रपणानें हिंडणारें असें एखादें हरीण, मांजर, किंवा ससा, वगैरे कोणत्याही जनावरांची मादी पाहिली, तर आपणांस असें आढळून येईल कीं, प्रसूतीसाठीं तिला दुसऱ्या कोणाचीही मदत लागत नाहीं, व तिला बिलकूल क्लेश होत नाहींत, व पुष्कळ वेळही लागत नाहीं. विण्याचे अगोदर तिला कोणतीही भीति अगर अस्वस्थता झालेली कधींही दिसून येत नाहीं. ज्या प्रसूतीच्या यातना मनुष्यजातींतील स्त्रियांना इतक्या भयंकर वाटतात, त्या प्रसूतीच्या क्रियेपासून जनावरांना विशेष त्रास होऊं नये व त्यांच्या प्रकृतीमध्यें कांहीं बिघाड होऊं नये, ही गोष्ट आश्चर्यकारक नाहीं काय ?

मीं असलीं जनावरें पुष्कळ पाहिलीं आहेत, व मला नेहमीं असें आढ-

कून आलें आहे कीं, त्याल्याबरोबर तीं आपल्या नेहमींच्या उद्योगास लागतात. जणूं काय कांहीं विशेष गोष्ट घडूनच आली नाहीं. तीं आपल्या पोरांबद्दल मात्र फार काळजी घेतात. सर्व निरोगी जनावरांत अशाच प्रकारची स्थिति आढळून येते. मला एक ससाची मादी पाहिलेली आठवतें. ती प्रसूत होत होती व तिचीं दोन पोरें बाहेर आलीं होतीं. इतक्यांत पारध्याची चाहूल ऐकूं आली. त्याबरोबर ती अगदीं नेहमींच्याप्रमाणें पळत सुटली, परंतु मध्यंतरीं गोळी लागून ती मादी मेली. त्यावेळीं तिचें पोट तपासलें, तेव्हां त्यांत पोर आहे, असें आढळून आलें. पोट फाडल्यावर तें पोर बाहेर जिवंत निघालें. पुढें थोडासा शोध केल्यावर लगेच पूर्वीं झालेलीं दोन्ही पोरें सांपडलीं.

इतकी सुलभ प्रसूति बायकांमध्यें क्वचितच घडून येते. कष्टानें बाळंत होणें, वाखे होणें, आणि गरोदरदशेंत होणारे विकार, या सर्व गोष्टी पाहिल्या ह्मणजे या गोष्टींचा लक्ष देऊन विचार करावा लागतो. या काळांत सुइणीशिवाय बाळंत होणें ही गोष्ट जवळ जवळ अशक्य झाली आहे.

अलीकडे प्रसूतीच्या क्रियेमध्यें पुष्कळ कृत्रिमपणा आला आहे. शिवाय वाईट परिणाम टाळण्याकरितां बाळंत झाल्यावर त्या बाईस थोडेबहुत दिवस बिछान्याला धरून रहावें लागतें, तें निराळेंच.

कधीं न बदलणाऱ्या अशा या सृष्टीच्या क्रमांत असे फरक होण्याला कांहींतरी खोल कारण असलें पाहिजे. सृष्टीच्या नियमाच्या अगदीं विरुद्ध वागल्यामुळें हे फरक झाले असले पाहिजेत. सृष्टि स्वतः कधींही असले घोंटाळे उत्पन्न करणार नाहीं; तिच्या कार्यक्रमांत कधींही फरक होत नाहीं. आपण ( सुधारलेले लोक ) विजातीय धर्मानें बद्ध असलेल्या प्रकृतीच्या स्वाभाविक वृत्तीस व्यत्यय आणतों व त्यामुळें तिला अपाय करतों. म्हणून मनुष्याचें पूर्ण कल्याण न होण्यास सृष्टि व तिचे नियम कारण नव्हत; मनुष्येंच सृष्टीचे नियम सोडून वागत असल्यामुळें त्यांच्या आरोग्याचा ऱ्हास होत आहे. म्हणून याप्रमाणें तिच्या नियमांचें उल्लंघन केल्याबद्दल सृष्टिदेवता

मनुष्यजातीस दिवसेंदिवस निकृष्ट अवस्थेप्रत नेऊन सूड उगवीत आहे, यांत आश्चर्य नाहीं. सृष्टीच्या नियमांचें उल्लंघन करूं लागल्यानंतरच हळू हळू मनुष्याच्या शरीरांत दोषिक द्रव्य सांचूं लागलें व त्यांना अनेक व्याधींनीं घेरलें. सृष्टिदेवतेच्या नियमांचें उल्लंघन केल्याबद्दल तिनें बाळंतपणांत त्रास देऊन कसा वचपा काढिला आहे, हें त्यांना लवकरच कळलें आहे. सृष्टीप्रमाणें चालून तिच्या नियमांचें उल्लंघन केलें नसतां आपल्या आरोग्याबद्दल दृढ कल्पना असतांना होणारें स्वर्गसुख नाहींसें झालें आहे.

वर जें सांगितलें आहे त्याचा अर्थ इतकाच कीं, ज्या स्त्रिया खरोखर निरोगी आहेत, त्यांना गरोदरस्थितींत त्रास होणार नाहीं; त्या सुखानें प्रसूत होतील, व त्यांचीं मुलेंही निरोगी निपजतील. येथें निरोगी या शब्दाचा अर्थ या पुस्तकांत पूर्वीं सांगितल्याप्रमाणें ज्याचें शरीर दोषिक द्रव्यापासून मुक्त आहे तो, असा घ्यावयाचा.

जेव्हां बापाचें शरीर दोषिक द्रव्यापासून मुक्त असेल, तेव्हांच मुलें खरोखरीं निरोगी निजपतील. गर्भाशयांतील वाढणारा गर्भ आईबापांच्या अंगांतील उत्कृष्ट द्रव्यापासून तयार करण्याचा सृष्टीचा प्रयत्न असतो.

मुलांच्या उत्पत्तीच्या वेळीं आईबापांच्या शरीरांचे जे भाग रोगग्रस्त झाले असतील, किंवा त्यांत दोषिक द्रव्य असेल, ते भाग त्या मुलांच्या शरीरांत व्यंग राहतात. आईबापांपासून रोगाचें बीज प्राप्त होतें तेंही अशा प्रकारानें होतें. शरीर लहानपणींच दोषिक द्रव्यानें व्याप्त असेल ( आणि देवी काढल्यानें व अस्वाभाविक अन्न दिल्यानें हें कधींच चुकत नाहीं ) तर तें द्रव्य, त्यास ज्या ज्या भागांत अटकाव होणार नाहीं, त्या त्या भागांत पसरेल. या कारणास्तव जे जे अवयव अशक्त किंवा व्यंग राहिले असतील, त्यांमध्येंच दोषिक द्रव्य जाऊन सांचतें, व म्हणून आईबापांचे जे अवयव रोगग्रस्त असतात, तेच अवयव मुलांमध्येंही रोगग्रस्त राहतात. आईबापांस जे रोग असतात, तेच मुलांस होतात, याचें कारण हेंच आहे. स्वाभाविक उपचार व सृष्टिनियमाप्रमाणें वागणें, या उपायांनीं आपल्याला शरीरांतील

सर्व दोषिक द्रव्य काढून टाकतां येईल. आणि याप्रमाणें जे भाग अशक्त असतील, किंवा ज्यांमध्यें विजातीय द्रव्य सांचण्याचा विशेष संभव असेल, ते हळू हळू सुदृढ व निरोगी करितां येतील, त्याप्रमाणें जास्त निरोगी व कंटक लोकांची पिढी आपणांस तयार करितां येणें शक्य आहे. आईबापांचें शरीर विजातीय द्रव्यानें व्याप्त असेल, तर मुलांचेंही शरीर जन्मतः तशाच स्थितींत असतें, असें वारंवार दृष्टीस पडतें "फळावरून झाडाची परीक्षा होते" अशी जी म्हण आहे, ती येथें पूर्णपणें लागू पडते. प्रत्येक पिढीस मनुष्यजातीचें आरोग्य जास्त जास्त हीन दशेप्रत जात आहे, याचें कारण लहानपणीं अस्वाभाविक (सृष्टीच्या नियमास विरुद्ध अशा) रीतीनें जोपासना करणें हें होय. पण आरोग्य बिघडण्यास कारणीभूत दुसऱ्याही कांहीं गोष्टी आहेत. या सृष्टीमध्यें संतति झाल्यानें कोणत्याही प्राण्याची मादी अशक्त किंवा कुरूप होत नाहीं. परंतु मनुष्यजातींत या गोष्टीसंबंधानें कितीतरी फरक आहे. पुष्कळ स्त्रिया पहिलेंच बाळंतपण झाल्याबरोबर फिकट व वयातीत दिसूं लागतात; किंवा मोठें पोट होणें वगैरे फरक त्यांच्या शरीरांत दिसतो, असें आपणांस आढळून येतें. गर्भारपण, बाळंतपण, व मुलें पाजणें या सर्व गोष्टींच्या माथीं हा दोष लोक बसवितात. बायकांचा कामधंदा व खाणें पिणें हें त्यांच्या प्रकृतीस योग्य व अनुकूल असें असलें, तरी त्यांपैकीं बहुतेकांची सतेजता व सौंदर्य दर बाळंतपणास कमी होत जातें, असा आपला अनुभव आहे. असें होण्याचें कारण पुढें सांगितल्याप्रमाणें आहे. जगांत अन्य कोणत्याही प्राण्याच्या मादीस, गर्भ राहिल्यानंतर नरांशीं संबंध असावासा वाटत नाहीं, इतकेंच नव्हे, तर त्यांना त्यांचा तिटकारा येतो, व नर तसें करूं लागल्यास त्यास प्रतिबंध करितात. ही प्रवृत्ति सृष्टीच्या नियमास अगदीं अनुसरून आहे. संभोग हा मुख्यतः गर्भोत्पत्तीकरितां आहे, केवळ सौख्याकरितां नाहीं; संबंध होत असतां जननेंद्रियाकडे रक्त जास्त येतें, त्यामुळें गर्भाकडे त्याचा प्रवाह कमी पडतो, व त्या कारणानें गर्भाचें पोषण बरोबर होत नाहीं, असें करण्यापासून स्त्रियांच्या प्रकृतीसही अपाय होतो.

या अशा प्रकारें सृष्टीच्या नियमाचें उल्लंघन केल्यानें स्त्रियांच्या शरीरांतील सत्व कमी होतें, व त्यांना हजारों रोग उत्पन्न होतात. गरोदर असतांना स्त्रियांना जे अनेक विकार होतात, ते पुष्कळ वेळां या सृष्टीच्या नियमाचें उल्लंघन केल्याचें फळ असतें. मळमळ, अन्नद्वेष, ओकारी, दांत दुखणें, वर्ण पालटणें; कधीं थंडी वाजणें, व कधीं ताप येणें, उदास वाटणें, रडूं येणें, नेहमींच्या अन्नाचा वीट येणें, पुष्कळ भूक लागणें वगैरे विकार याच कारणानें होतात. हे विकार कांहीं स्त्रियांना त्यांच्या शरीरांत जन्मतः आईबापांपासून प्राप्त झालेल्या दोषिक द्रव्यामुळें होतात. आपला अनुभव असा आहे कीं, प्रत्येक निरोगी स्त्री गर्भधारणेनंतर संबंध करण्यास नाखुष असते. पुरुषांचें शरीर रोगबीजक द्रव्यानें व्याप्त असल्यामुळें त्यांची कामेच्छा त्यांच्या आधीन राहत नाहीं, या कारणानें व कांहीं अंशीं आपल्या चाली रीतींनीं या गोष्टीस प्रतिबंध न केल्यामुळें पुरुषांकडून अशा प्रकारचा सृष्टीच्या नियमास विरुद्ध असा आचार घडतो. कित्येक शेतकऱ्यांस हें माहीत आहे कीं, जनावरांत विशेष कामविकार उत्पन्न झाला व तीं माज करूं लागलीं कीं, कांहीं तरी रोग उत्पन्न झालेला आहे असें समजावें. आणि सूक्ष्म रीतीनें अवलोकन केल्यास मनुष्यांसंबंधानें तेंच ह्मणतां येईल. उदाहरणार्थ, जे लोक क्षयी असतात, त्यांची कामवासना लवकर जागृत होते व ती त्यांना लवकर आवरतांही येत नाहीं, असा आपला अनुभव आहे. आज काल दृष्टीस पडणाऱ्या लोकांच्या उच्छृंखल कामविकाराहून निरोगी मनुष्याचा कामविकार फार निराळ्या प्रकारचा असतो. त्यांच्या कामेच्छेंत अस्वाभाविक इच्छेचा किंवा विषयासक्तेचा कांहीं भाग नसतो, व ती केवळ प्रजोत्पत्तीकरितांच असते. कामेच्छा तृप्त करणें ही कधींही एक अपरिहार्य गोष्ट होऊन बसूं नये, व ती तृप्त झाली नसतां कधींही असमाधान उत्पन्न होऊं नये. जो कोणी निरोगी असेल, व जो अनुत्तेजक व स्वाभाविक अन्नाचा आहार करीत असेल, त्यालाच या स्थितीविषयीं योग्य कल्पना करितां येईल. आपली इच्छा सृष्टीच्या नियमाच्या विरुद्ध कधींही नसावी व आपलें शरीर आ-

पणास इतकें ताब्यांत ठेवितां यावें कीं, आपल्या कामविकारास कधींही मर्यादेबाहेर जातां येऊं नये, व जी गोष्ट लोकांस अतिशय त्रासदायक वाटेल, ती आपणास सुखावह वाटावी, अशा प्रकारची ज्यांची इच्छा असेल, त्यांनीं सृष्टीच्या नियमाप्रमाणें चाललें पाहिजे. या पुस्तकांत सांगितलेल्या आरोग्यरक्षणाच्या नियमाप्रमाणें जो चालेल, व जो डा० कुन्हे यांच्या उपायांनीं आपल्या शरीरांतून दोषिक द्रव्याचा निकाल करील, तो मनुष्य अत्यंत सुखी व समाधानी होईल.

स्त्रियांच्या आरोग्याचा ऱ्हास झाल्याचीं चिन्हें चोहोंकडे आपल्या दृष्टीस पडत आहेत. कित्येक स्त्रियांना वाखे होतात. कित्येकांचीं मुलें (गर्भास) पूर्ण काल होण्याच्या पूर्वींच जन्मास येतात. कित्येक मुलें गर्भांतून पायांकडून निघतात ( पायाळू असतात ), व कित्येक मुलें आडवीं येतात. कित्येक मुलांचीं डोकीं फार मोठीं असतात, त्यामुळें प्रसूतकाळीं कृत्रिम उपाय केल्यावांचून मुलांची उत्पत्तिद्वारांतून सुटका होत नाहीं. कित्येक स्त्रियांना प्रसूतिकाळीं येणारे वेग जोराचे नसल्यामुळें त्यांची लवकर सुटका होत नाहीं. हे व अशाच प्रकारचे सर्व अन्य विकार प्रसूत होणाऱ्या स्त्रीचें किंवा बालकाचें शरीर दोषिक द्रव्यानें व्याप्त असल्यामुळें होतात.

स्त्रीनें पहिल्या चार पांच महिन्यांत गरोदर स्त्रीस अयोग्य असें काम किंवा श्रम केलें, किंवा तिच्या अंगांत दोषिक द्रव्याचा संचय झाला असला ह्मणजे मूल गर्भाशयामध्यें वेडेंवाकडें होतें. शरीरांत दोषिक द्रव्य सांचल्यानें किंवा अयोग्य श्रम केल्यामुळें पोटावर दाब पडून किंवा पोटास ताण बसून गर्भ नेहमींच्या जागेपासून ढळतो. विजातीय द्रव्य सांचल्यानें जेव्हां जननद्वार आकुंचित होतें, तेव्हां प्रसूतिकाळीं फार त्रास होतो. आईबापांचे शरीरांत विजातीय द्रव्य सांचल्यामुळें मूलही त्याच प्रकारचें निपजतें. व विशेषेंकरून त्याचें डोकें मोठें असतें. या कारणानेंही बाळंतिणीस त्रास होतो. जननमार्गांत विजातीय द्रव्य सांचलें ह्मणजे तें सर्व आसपासच्या शिरा व स्नायु यांमध्येंही सांचतें. ते फुगलेले दिसतात व त्यांच्यांतील स्थितिस्थापक धर्म पु-

फ्कळसा कमी होतो. सुखानें प्रसूत होण्यास सर्व शरीर खरोखरी निरोगी स्थितींत असलें पाहिजे.

ज्या ज्या स्नायूंमध्यें दोषिक द्रव्य सांचलेलें असतें, त्या त्या स्नायूंकडून त्याची क्रिया योग्य रीतीनें होत नाहीं. आणि अशा स्नायूंचें प्रसूतिकाळीं फार जोरानें किंवा झटक्यानें आकुंचन झालें किंवा तो फार ताणला गेला तर त्यापासून शरीरास फार वेदना होतात. ह्मणूनच ज्यांचें शरीर दोषिक द्रव्यानें व्याप्त आहे, अशा स्त्रियांनाच प्रसूतिकाळीं भयंकर वेदना होतात.

अशी स्थिति जर आहे तर ज्या बायकांच्या शरीरांत विजातीय द्रव्य सांचलें आहे, त्यांना प्रसूतीची विशेष भीति वाटल्यास नवल तें काय? ही भीति स्वाभाविक नाहीं, तर शरीर दोषिक द्रव्यानें व्याप्त असल्या कारणानें उत्पन्न झालेली असते. जी स्त्री खरोखर निरोगी आहे, तिलाही त्रासदायक व्यथा मुळींच माहीत नसते. प्रसूतीसंबंधानें अथवा दुसऱ्या कोणत्याही रोगासंबंधानें भीति वाटणें, हें आपण आपल्या शरीराचा दुरुपयोग केला आहे व त्यामुळें शरीरांत दोषिक द्रव्याचा संचय होऊन शरीर रोगास पात्र झालें आहे, या गोष्टीचा आपल्या प्रकृतीकडून आपणांस इषारा आहे ही प्रकृतीची सूचना आपण मानिली नाहीं तरी ती प्रसूति वगैरे प्रसंगाचे वेळीं आपले अपराध आपल्या दृष्टीसमोर स्पष्ट आणिते. परंतु या सूचनेचा अर्थ कोणास समजतो? ह्या वेळपर्यंत केलेलें विवेचन वाचूनही ज्या कोणास अजून असें वाटत असेल कीं वरील ह्मणणें खरें असलें तरी कित्येक प्रसंगीं प्रसवकाळीं शस्त्रक्रियेची व हस्तक्रियेची जरूरी असतेच, त्यांनीं खालील मजकूर वाचावा.

एका ३६ वर्षांच्या स्त्रीस दुसऱ्या मुलाचे वेळीं पोट दुखावयास लागून दोन दिवस व दोन रात्री झाल्या, तरी तिच्या गर्भाशयांतील मूल मुळींच हालचाल करीना. सुइणीस वाटलें कीं डाक्टराला बोलाविल्याशिवाय त्या बाईची सुटका व्हावयाची नाहीं. ह्मणून अडलेली बाळंतिण सोडविण्यांत कुशल अशा एका नामांकित डॉक्टरास बोलाविलें. सर्व तऱ्हेचीं हत्यारें चा-

लवून त्यानें चार तास खटपट केली, आणि शेवटीं असें ठरविलें कीं, मूल गर्भाशयांत भलत्याच बाजूला असल्या कारणानें त्या स्त्रीच्या शरीरास अपाय झाल्यावांचून तें बाहेर यावयाचें नाहीं. त्या बाईला वाटलें कीं, या बाळंतपणाच्या वेदना सोसण्यापेक्षां जीव गेलेला पुरवला. याप्रमाणें डॉक्टराचा कांहीं उपयोग झाला नाहीं. शेवटीं हें मूल बाहेर यावयाचें नाहीं ह्मणून ही बाई मरणार असें सांगून डॉक्टाराची स्वारी चालती झाली. पण या बाईच्या प्रकृतीनें कांहीं निराळीच तजवीज केली होती.

पुढें आणखी २४ तास वेदना सोसल्यावर डॉक्टराच्या साहाय्यावांचून केवळ सुईणीच्या सहाय्यानें ती बाई बाळंत झाली. येथें कोणाचा जास्त उपयोग झाला बरें ? निसर्गाचा कीं डॉक्टराचा ! परंतु सृष्टीच्या विरुद्ध केलेल्या त्या डॉक्टराच्या शस्त्रक्रियेचा शेवटीं वाईट परिणाम झालाच. बाळंत झाल्यावर सव्वा दोन महिने ती बाई आजारी होती आणि ती जगण्याची आशाही राहिली नव्हती. शस्त्रानें केलेल्या प्रयोगानें ती बाई जवळ जवळ लंगडी झाली. आणि तिची प्रकृति मूळची चांगली धडधाकट होती, म्हणूनच त्या दुखण्यांतून ती उठली. मनुष्यप्राण्याचें आरोग्य एकंदरींत हीन दशेला येऊन बरेच दिवस झाल्यामुळे ज्यावर वैद्यांचा किंवा डॉक्टरांचा कांहीं इलाज चालत नाहीं, अशा पुष्कळ भानगडी बाळंतपणीं उत्पन्न होतात. प्रत्यक्ष अनुभवावरून असें ह्मणतां येईल कीं, असल्यावेळीं जें होईल तें होऊं द्यावें.

सृष्टि निसर्ग किंवा प्रकृति यांपेक्षां जास्त मदत करणारे कोणीं नाहीं. बाळंत होतांना होणाऱ्या त्रासांतून सुटका होण्यास मार्जनविधीइतका दुसरा कोणताही चांगला उपाय नाहीं. पोटाभोंवतीं मातीच्या पट्ट्या बांधल्यानें पुष्कळ फायदा होतो, व त्रासही बराच कमी होतो. (पान ११० पहा) ओल्या चिखलाचा मध्यम जाडीचा थर तागाचे कापडावर द्यावा व चिखलाचें आंग पोटाच्या बाजूस करून ती पट्टी बांधावी. व त्या पट्टीच्या वरच्या भागावर लोंकरीच्या फडक्याचा पट्टा गुंडाळावा. दर तासा दोन तासांनीं पट्टी सोडून चिखलाचा नवीन थर द्यावा.

प्रसवकालीं फार लवकर शस्त्रक्रिया केल्यानें हजारों स्त्रिया मृत्युमुखीं पडल्या आहेत. व शस्त्रक्रिया करण्याचें वेड लागलेल्या डाक्टरांना न बोलावतां केवळ सर्वांची काळजी वाहणाऱ्या सृष्टि-मातेवर भिस्त ठेविली, तर कितीतरी स्त्रियांच्या निरर्थक यातना व त्रास वांचेल, व किती तरी कुटुंबांवरचें अरिष्ट टळेल.

शस्त्राच्या साहाय्यावांचून बाळंतपण अशक्य होण्याइतक्या स्थितीला जेव्हां जेव्हां स्त्रिया येऊन पोहोंचतात, तेव्हां तेव्हां तो अपराध त्यांचाच असतो. गरोदर झाल्याबरोबर आपण सुखप्रसूत होण्यास कोणत्या साधनांचा उपयोग केला पाहिजे, याचें ज्ञान स्त्रियांना प्राप्त होणें शक्य असतें. या साधनांचा उपयोग कसा करून घ्यावा, हें व त्यांचा केव्हां उपयोग केला असतां अतिशय फायदा होईल, त्याचीही माहिती स्त्रियांनीं करून घेतली पाहिजे. ज्यांना डा० कुन्हे यांचे उपचार माहीत आहेत, त्यांना प्रसूति सुखानें होण्यास काय केलें पाहिजे, हें समजून येईलच. गेल्या कांहीं वर्षांत पुष्कळ ठिकाणीं या उपचारांचा अनुभव घेतल्यावरून ते फार उपयोगी ठरले आहेत. या उपायांचा गुण आला नाहीं असें कोठेंही घडून आलें नाहीं. ज्या ज्या प्रसंगीं डा० कुन्हे यांचे उपचार योग्य वेळीं झाले आहेत, त्या त्या वेळीं यत्किंचित्‌ही त्रास न होतां स्त्रिया बाळंत झाल्या आहेत डा० कुन्हे यांस आलेल्या आभारप्रदर्शक पत्रांपैकीं प्रत्येकांत डा० कुन्हे यांच्या मार्जनविधीच्या उपयुक्ततेसंबंधानें लिहिलें आहे. एकंदरींत येवढें खरें कीं, सुखप्रसूति होण्याकरितां प्रसूतिकालीं आयत्या वेळीं उपचार करण्यापेक्षां, योग्य वेळीं अगोदरच करणें फार सोईचें आहे. बाळंतपणांत कृत्रिम उपायांची आवश्यकता दिवसेंदिवस जास्त जास्त लागत चालली आहे; यावरून सर्व लोकांच्या शरीरामध्यें जीर्णरोग भयंकर रीतीनें हळुहळू वाढत आहेत, हें स्पष्ट होतें.

ज्यांना ज्यांना ह्मणून आपल्या बायका सुखानें बाळंत व्हाव्या व मुलें निरोगी व्हावीं, असें वाटत असेल, त्यांनीं त्यांनीं स्त्रीशीं संबंध होण्यापूर्वीं

आपल्या शरीरांतील दोषिक द्रव्य काढून टाकून तें विकोप व निरोगी केलें पाहिजे. आणि एकदां शरीरांतील सर्व दोषिक द्रव्य काढून टाकल्यावर या पुस्तकांत सांगितलेल्या नियमांप्रमाणें वागून शरीरांत दोषिक द्रव्याचा संचय होण्याचा संभव जो टाळील तोच मनुष्य निरोगी राहील.

संधिवायु झालेल्या एका बाईस डा० कुन्हे उपचार करीत होते. तिच्या सर्व अंगांत व विशेषेंकरून पोटांत विजातीय द्रव्य फार सांचलें होतें. तिला पांच मुलें झालीं होतीं व प्रत्येकाचे वेळीं तिला अत्यंत क्लेश झाले होते. प्रत्येक बाळंतपणाच्या पर्वी २।३ दिवस प्रसूतीच्या वेदना होत असत. ह्मणून प्रत्येक वेळेस त्या बाईस फार व्यथा होत असे; आणि डाक्टरानें चिमट्याचा उपयोग केल्यावांचून तिची सुटका होत नसे. सहाव्या मुलाच्या वेळीं गरोदर असतांना ती डा० कुन्हे यांचे सांगण्यावरून रोज दोन तीन वेळां मार्जनाविधि करीत असे. त्याचा परिणाम असा झाला कीं, नेहमींप्रमाणें मुळींच त्रास न होतां ती स्त्री सुखानें प्रसूत झाली. यावेळीं प्रसूतीस एक तास देखील लागला नाहीं. प्रसूतीचे वेग योग्य क्रमानें आले, व त्यांपासून वेदनाही झाल्या नाहींत.

त्या बाईच्या स्थितींत एवढा फरक कां झाला, याचा उलगडा तीस होईना. ती स्त्री बाळंत होण्यापूर्वीं जेव्हां या खेपेस तुमची सुखप्रसूति होईल असें त्या स्त्रीस डा० कुन्हे यांनीं सांगितलें, तेव्हां तिला तें खरें वाटेना. काल्पनिक सुखप्रसुति मानल्यावांचून अशी गोष्ट होणें शक्य नाहीं, असें त्या स्त्रीनें डा० कुन्हे यांस उत्तर दिलें.

पुढें कांहीं दिवसांनंतर ती स्त्री डा० कुन्हे यांस ह्मणाली कीं, माझ्या वयावरून मला यापुढें मूल होण्याची आशा फारशी दिसत नाहीं. परंतु ह्या खेपेचें बाळंतपण त्रासावांचून झाल्यामुळें आणखी मुलें व्हावींत अशी इच्छा मला उत्पन्न झाली आहे. शिवाय यापूर्वीं आपलीं मुलें पाजण्याइतकें तिच्या स्तनामध्यें दूध नसे; परंतु यावेळीं आपल्या मुलांस पाजण्याचें सामर्थ्य आपल्या अंगांत आलें आहे, हें पाहून तिला फार आश्चर्य वाटलें.

आतां असें होणें हें अगदीं स्वाभाविक होतें; कारण डा० कुन्हे यांचे उपचार कळल्यापासून ती बाई सृष्टीच्या नियमांस अनुसरून वागत असे व डा० कुन्हे यांचे उपाय नियमानें करीत असे. यामुळें पूर्वीं विजातीय द्रव्यानें व्याप्त झालेलें शरीर त्या द्रव्यापासून बरेंच मुक्त झालें व तिचें आरोग्य व तरतरी बरीच वाढली.

एका बाईनें डा० कुन्हे यांच्या सांगण्यावरून, गरोदर असतांना त्यांच्या उपायांचा उपयोग करून पाहिला व तिला असाच गुण आला. सात महिने उपचार चालू ठेवल्यावर ती बाई बाळंत झाली. बाळंत होण्यास सुमारें अर्धा तास लागला; त्रास मुळींच झाला नाहीं; व सुईणीचीही गरज लागली नाहीं.

अशाच प्रकारच्या उपायांनीं आणखी एक बाई सुखानें प्रसूत झाली. या बाईनें खालील आभारदर्शक पत्र १८९० च्या सप्टेंबरमध्यें डा. कुन्हे यांस पाठविलें.

' महाराज, मी अठ्ठावीस वर्षांची आहें. मूत्राशय व मूत्रपिंड यांच्या विकारानें मी पंधराव्या वर्षापासून पीडलेली होतें. येथें पहिल्यानें मी दोन महिने टी० या ठिकाणीं औषधोपचाराकरितां गेलें, व या ठिकाणीं येवढाच फायदा झाला कीं, मूत्राशयाचा दाह होऊन त्याच्या वेदना अगदीं असह्य झाल्या. मी सर्व वेळ पडून राहत असें, कारण मला ज्या अत्यंत वेदना होत असत, त्यामुळें उभें राहण्याची किंवा चालण्याची सोयच राहिली नव्हती.

असें एक महिनाभर चालू होतें. पुढें मी एल-रस्त्याच्या दवाखान्यांत गेलें; येथें कांहीं दिवस राहिल्यावर हें क्लेशदायक दुखणें कांहीं दिवस थोडें कमी झालें. परंतु रोगाच्या मूळ कारणावर कांहीं उपाय न केल्यामुळें एक वर्षानें तें दुखणें दुप्पट वाढलें. ह्या वेळीं मी शीमनिट्झ येथें राहत होतें, येथें इस्पितळांत मी ३ महिने राहिलें. या ठिकाणीं मजवर सॅलिसिलीक ॲसिड ल्यूनर कॉस्टीक, पट्ट्या व वीज यांचा उपयोग करून पाहिला, पण सर्व व्यर्थ झालें. ह्मणून १८८० च्या एप्रिलांत मी लेपझिक येथें गेलें, आणि तेथें

मला फिरून इस्पितळांत जावें लागलें. येथें माझा गर्भाशय बिघडला आहे, असें ठरवून मला औषध दिलें, पण त्याचा उपयोग झाला नाहीं. वेदना तर मला इतक्या होत असत कीं, पुष्कळ वेळां इस्पितळांतून घरीं जावयाची देखील पंचाईत पडत असे.

गुण येईना म्हणून इस्पितळ सोडिलें, व पुढें ४ वर्षें लेपझिकचे डॉक्टर एम.—यांचें औषध घेत होतें. त्यांनीं मूत्राशयाचा दाह व गर्भाशयाची सूज हे विकार बरे केले. आणि त्यांच्या सांगण्यावरून मी फ्रानझेन्सबाड येथें तीन वर्षें राहिलें, व तेथील औषधी मृत्तिकेचें अंगास अनुलेपन केलें व तेथील औषधी पाणी प्यालें. परंतु त्या योगानें नेहमीं टिकणारा गुण आला नाहीं. फ्रँ० बाड सोडून जाण्यापूर्वीं तेथील डॉक्टरानें मला येथें परत देखील धाडलें. कारण माझ्या प्रकृतीस शस्त्रक्रियेची जरूर आहे असें त्यांना वाटलें. यानंतर लेपझिकचे डॉक्टर एल—यांनीं मजवर शस्त्रक्रिया केली, आणि तेवढ्या वेळेपर्यंत माझा विकार कांहींसा कमी झालासा दिसला. तरी पण मला माझा जुना आजार अजून आहे असेंच वाटे, व 'माझें दुखणें शस्त्रक्रियेनें दबलें गेलें आहे, परंतु त्याचें निर्मूलन झालें नाहीं,' असें मीं स्पष्टपणें ह्मटलेंही. मला पट्ट्या वगैरे लावाव्या लागत असतच. शेवटीं मला फिरून डॉक्टराकडे जावें लागलें. मी लेपझिकचे डॉक्टर झेड यांचें वर्षभर औषध घेतलें; तरी गुण येईना. शेवटीं डॉक्टर झेड मला ह्मणाले कीं, "तुमच्या मूत्रपिंडास दुर्धर विकार झालेला आहे, तुह्मांस माझ्या हातून जास्त गुण येणें शक्य नाहीं, तरी पण तुह्मीं एकदां येथील प्रोफेसर एस यांस भेटा" ह्या गृहस्थांनीं मला आठवडाभर रोज तपासलें आणि यापुढें उपाय होणें शक्य नाहीं, असें ते ह्मणाले, व मग मी परत आलें.

याप्रमाणें निराश होऊन २ वर्षांपूर्वीं जुलै महिन्यांत तुमच्या उपचारास मीं आरंभ केला. थोडक्याच दिवसांत माझ्या दुःसह वेदना बंद पडल्या, आणि एका महिन्यांत मला काम करितां येऊं लागलें. तुमच्या उपायानें आजपर्यंत मला माझें आरोग्य व शक्ति कायम ठेवतां आलीं आहेत.

ज्या वर्षीं मीं उपाय चालू केले त्याच वर्षी मला उल्हास व शक्ति इतकीं वाटलीं कीं, मीं लग्न केलें. सर्व लोक माझ्या विरुद्ध होते व डॉक्टर ह्मणाले, बाळंतपणांतून तुह्मी जीवंत सुटणार नाहीं. तुमच्या सांगण्यावरून व स्वतःच्या अनुभवावरून मीं त्यांचें ऐकलें नाहीं, आणि तुह्मीं सांगितल्याप्रमाणें सर्व गोष्टी घडून आल्या. मीं लग्न तर केलेंच, परंतु पुढें ( गरोदर असतांना ) तुमच्या सांगण्याप्रमाणें वागलें, आणि आश्चर्याची ही गोष्ट कीं, मला मुळींच त्रास न होतां व सुइणीची जरूरी न पडतां मी बाळंत झालें. हें सर्व तुमच्या सुलभ उपायांचें फळ होय."

लेपझिक

लुई. बी.

# भाग ४ था.

## प्रसूतीनंतर करावयाचे इलाज.

---

जी स्त्री खरोखर निरोगी आहे, तिला ह्या इलाजांची व या उपदेशाची मुळींच जरूरी नाहीं. जनावरेंच केवळ नव्हेत, तर रानटी स्थितींतल्या लोकांच्या बायका देखील बाळंत झाल्यावर लागलींच हिंडू फिरूं लागतात, व आपलीं रोजचीं कामें करूं लागतात. सुधारलेल्या राष्ट्रांतील बायकांना मात्र असें क्वचितच करितां येतें. इतकेंच नव्हे, तर त्यांनां बाळंत झाल्यावर बराच वेळ निजवून ठेवण्याची चाल आहे. पूर्वीं नऊ दिवस पुरत असत, परंतु हल्लीं डॉक्टरांच्या मताप्रमाणें बारा दिवस लागतात. याचें कारण बाळंतिणीची अशक्तता नव्हे, तर जननेंद्रियांना पूर्वस्थितीवर येण्यास लागणारा पुष्कळ वेळ हें होय. पण अशाप्रकारें अंथरुणास खिळून राहिल्यानें पुष्कळ प्रकारें आरोग्यास अपाय होतो. शरीराची हालचाल मुळींच न झाल्यामुळें पचन नीट होत नाहीं. व ह्मणून रुधिराभिसरणही नीट चालत नाहीं. व याकाळीं जो मलावरोध होतो त्याचेंही हेंच कारण आहे. तरी पण

जननेंद्रियें पूर्वस्थितीवर आल्याखेरीज उठणें हेंही घात आहे. कारण त्यानें पोट फार मोठें होतें. व याचें प्रत्यंतर ज्या स्त्रियांस पुष्कळ मुलें झालीं आहेत, त्यांच्यामध्यें दिसून येतें.

बायकांना पुष्कळ वेळ अंथरुणांत रहावें न लागतां प्रसूतीपासून होणारा अनिष्ट परिणाम कसा टाळतां येईल याविषयीं पुष्कळ विचार करून डा० कुन्हे यांनीं एक उपाय शोधून काढिला आहे. व या उपायाचा उपयोग उत्तम प्रकारचा होतो, असें प्रत्यक्ष अनुभवानें ठरलें आहे.

बाळंत झाल्याबरोबर बाळंतिणीनें अवश्य वाटेल तितका वेळपर्यंत विश्रांति घ्यावी. अशा वेळीं बाळंतिणीनें थोडी झोंप घेतली तर ती गोष्ट फार हितावह होते. यानंतर स्त्रीनें अंग स्वच्छ धुऊन काढावें. साध्या स्नानाच्या ऐवजीं मार्जनविधि केला असतां विशेष फायदा होईल. हा विधि करितांना पाणी घडवंचीच्या वर एकपासून तीन इंच असावें. (प्र. दुसरें भाग १ ला पहा.) या विधीनंतर एक पट्टा पोटाभोंवतीं घट्ट गुंडाळावा. तो आंतून प्रवाही पदार्थ जातील अशा तागाच्या कापडाचा असावा. व तो बांधतां यावा ह्मणून त्यास दोऱ्या लावलेल्या असाव्या. हा पट्टा कसा बांधावा हें आकृती नं. २२ पहातां समजून येईल. दोऱ्या प्रथम दाराच्या कोयंड्याला बांधाव्या; नंतर पट्ट्याचें दुसरें टोंक पोटाभोंवतीं गुंडाळून गच्च धरावें. बाळंतिणीनें सबंद पट्टा पोटाभोंवतीं गुंडाळला जाईपर्यंत आपल्या भोंवतीं फिरावें; आणि मग दोऱ्या बांधाव्या. पट्ट्याच्या योगानें पोटांतील इंद्रियांस लागणारा आधार मिळतो. यानंतर आपल्या अंगांत शक्ति आहे असें वाटल्यास बाळंतिणीनें अंथरूण सोडावें. पण तिला बरें न वाटल्यास पट्टा तिसऱ्या किंवा चवथ्या दिवसापर्यंत बांधूं नये. हा पट्टा तीनचार आठवडे वापरावा. बाळंतिणीस दुसरा तिसरा कांहीं विकार होत नसल्यास पट्ट्याशिवाय दुसऱ्या कोणच्याही उपचाराची जरूरी नाहीं. पण जर कणकण वाटेल, तर वर सांगितलेला मार्जनविधि चालू ठेवावा. व मार्जनविधीनंतर प्रत्येक वेळीं चिखलाच्या पट्ट्यांचा उपयोग

करावा. ( पान ११० पहा. ) असें केल्यानें घाम येऊन ताप उतरेल, व शरीरांतील सर्व आवश्यक क्रिया सुरू होतील.

शक्य असल्यास बाळंतिणीनें मुलास पाजावें. पुष्कळ खाणें व सपाटून मद्य पिणें यांनीं दूध जास्त येणार नाहीं, उलटें कमी होईल. भूक लागेल तेव्हांच जेवावें, व तहान लागल्यासच पाणी प्यावें. हा नियम जसा इतरत्र तसाच या प्रसंगींही पाळला पाहिजे. पूर्वीं सांगितलेलें पथ्य, आहारासंबंधाचे नियम, बाळंतिणींनींही पाळणें अत्यावश्यक आहे. ज्या स्त्रिया निरोगी आहेत, त्यांनीं या नियमांप्रमाणें आहार केला असतां त्यांना उत्तम प्रकारचें व पुष्कळ दूध येईल.

# भाग ५ वा.

## तान्ह्या मुलांची पहिल्या पहिल्या कांहीं महिन्यांतील जोपासना. लहान मुलें वाढविणें.

---

जर आपण सूक्ष्म रीतीनें सृष्टीचा क्रम व आई व मूल यांच्यामधला संबंध पाहिला, तर आपल्याला कळून येईल कीं, या दोघांच्या प्रकृतींमध्यें बराच काळ निकट संबंध राहतो. विशेषेंकरून पहिल्या पहिल्या वर्षांत आईचा व मुलाचा संबंध फारच निकट असतो. ज्या गोष्टींची मुलास आईपासून जरूरी असते, त्यांपैकीं पहिली गोष्ट ह्मणजे आईच्या कुशीची ऊब ही होय. तान्ह्या मुलाला आईपासून दूर करणें ही मोठी चूक आहे. कारण तसें केल्यानें त्याच्या आरोग्यास लागणारी ऊब त्याला मिळत नाहीं. पुष्कळ बायका या महत्त्वाच्या बाबीकडे दुर्लक्ष करितात ही दुःखाची गोष्ट आहे.

या विषयासंबंधानें डा० कुन्हे लिहितात—"मला एका घरीं सल्लाकरितां बोलाविलें होतें. त्या घरांतील एक तीन वारांचें तान्हें मूल पाळण्यांत मुळींच निजेनासें झालें. शिवाय त्या मुलाला दूध पचत नसे, ह्मणून तर आईला फारच काळजी वाटत होती. आईच्या कुशीची ऊब व तीन कुक्षिस्ना-

नें यांनीं त्या मुलाला झोंप येऊं लागली; व त्याची प्रकृति पहिल्याप्रमाणें झाली.

**मुलें वाढविणें**—वर सांगितलेंच आहे कीं, पुष्कळ स्त्रियांना मुळींच दूध नसतें, किंवा असलें तर तें फारच थोडें असतें. असें आहे ह्मणूनच इतकीं अशक्त मुलें दृष्टीस पडतात. आईला दूध नसेल तर दाई ठेवणें उत्तम. परंतु दाई ठेवली तर हटकून मूल चांगलें निरोगी राहील असें सांगतां येत नाहीं, कारण दाई रोगी असल्यास मुलाच्या शरीरांतील तिच्या दोषिक दुधामुळें पूर्वीं आईबापांपासून प्राप्त झालेल्या विजातीय द्रव्यास भर पडते. आतां हें खरें आहे कीं, माझ्या मुखपरीक्षाशास्त्रानें दाईच्या प्रकृतीची परीक्षा करितां येईल. तथापि खरोखर निरोगी दाई मिळणें कठीण आहे. पुष्कळ प्रसंगीं मुलांना अन्नावर वाढवितात. परंतु पुष्कळ वेळां हें अन्न योग्यही नसतें, किंवा नीट तयार केलेलेंही नसतें. गाईचें दूध दिल्यास तें नुसतें ऊन करावें, उकळूं देऊं नये; कारण उकळलेलं दूध पचावयास जड असतें. दुधांतील रोगजंतु मारण्याकरितां दूध उकळलें पाहिजे, ह्मणून जें सांगण्यांत येतें, त्याचें आपणास विशेष महत्त्व नाहीं, हें कां तें पुढें स्पष्ट करून दाखविलें आहे. जें अन्न अतिशय लवकर पचतें तें अत्यंत पौष्टिक असतें. जोंपर्यंत पचनक्रिया चांगली चालते, तोंपर्यंत शरीरास घातुक होणारे पदार्थ शरीरांतून घालवून देण्याची, किंवा नाहींसे करण्याची शक्ति जठरांतील पचनरसांत असते. दूध उकळलें नाहीं, तर तें लवकर पचलें जातें; परंतु तें उकळलें तर तें अन्नमार्गांत फार वेळ रहातें आणि ह्मणून तें नेहमींच्या अन्नापेक्षां नासण्याची क्रिया शरीरांत लवकर उत्पन्न करितें.

मुलांना होणाऱ्या असंख्य रोगांचें व दिवसेंदिवस वाढणाऱ्या त्यांच्या मृत्युसंख्येचें कारण त्यांची योग्य जोपासना होत नाहीं हें आहे, यांत संशय नाहीं. मुलांकरितां केलेले खाण्याचे पदार्थ किंवा अन्न केवळ अपचनास कारणीभूत होतात. ते दिल्यानें मुलांचे पोटांत वायु होऊन त्यांस तणावा बसतो व पचनक्रिया बिघडून अस्वास्थ्य उत्पन्न होतें. अलीकडे प्रोफेसर **साक्झेल्ट** यांच्या रीतीनें उकळलेल्या दुधाची, व दुधाची साय काढून घेऊन

तें न नासेल अशी कृति करून डब्यांमध्यें भरून ठेवलेल्या दुधाची शिफारस होत असते. पण अशा प्रकारचीं दुधें हीं विस्तवावर उकळलेल्या दुधासारखींच अपायकारक असतात. कारण ज्या पदार्थांच्या योगानें दूध पचण्यास सोपें जातें, ते पदार्थच नाहींसे करण्याचा या प्रोफेसरांचा प्रयत्न असतो. दूध अन्नाशयांत गेल्याबरोबर त्यामध्यें विकार होऊन त्याचें लागलींच रूपांतर व्हावें; ह्मणजेच दूध लवकर पचतें. आईचें जें दूध मुलें पितात, तें मुलांनीं प्यावयाच्या अगोदर त्याचा हवेशीं संबंध घडलेला या सृष्टींत आपणांस कधींच आढळत नाहीं. दूध ह्मणजे एक पौष्टिक रस आहे व त्याचा हवेशीं संपर्क झाल्याशिवाय तें आईच्या स्तनांतून मुलाच्या पोटांत गेलें पाहिजे. हवेशीं संपर्क घडला कीं; त्याच्या रूपामध्यें फरक होतो. अशा प्रकारचें दूध प्याल्यानें त्या मुलाच्या पचनेंद्रियांवर वाईट परिणाम होतो. तें फार वेळ हवेंत उघडें ठेवलें, तर त्यांत फारसा फरक पडत नाहीं. तरी पण ज्या गाईचें दूध आपण मुलास घालतों, तिच्या अंगांत दोषिक द्रव्य आहे किंवा नाहीं, याविषयींची आपणांस चवकशी केली पाहिजे. चांगली पोसलेली लठ्ठ व बारा महिने अठराकाळ गोठ्यांत बांधिलेली गाय उत्तम दूध देईल, अशी कोणाची समजूत असल्यास ती चुकीची आहे. उलट असल्या गाईचें शरीर दोषिक द्रव्याच्या संचयामुळें लठ्ठ झालें असल्यास तिचें दूध रोगट आहे असें समजावें. जगाच्या बहुतेक लोकांच्या नशिबीं रोगट दूध पिण्याचें आहे असें दिसतें. कारण सुधारलेल्या राष्ट्रांत निरोगी गाई क्वचितच सांपडतात. मुलांकरितां गाईचें दूध चांगलें मिळत नसल्यास ओट नांवाच्या धान्याच्या पिठाची अंबील करावी. पीठ किंचित् भरड परंतु चाळलेलें असावें व तें उत्तम प्रकारच्या व ओल्या ओट धान्याचें असावें. अंबिलींत मीठ, तूप किंवा साखर घालूं नये. ओल्या ओट धान्यांचें पीठ लवकर बिघडतें, ह्मणून वाळलेल्या ओटाचें पीठ विकावयास आणतात; करितां ते घेऊं नये. कारण ओट वाळविले असतां ते पचनास जड होतात, व मग तें लहान मुलानां देण्यास निरुपयोगी होतात. ह्मणून वाळलेल्या ओटाचें पीठ मुळींच घेऊं नये. पाहिजे त्या

प्रकारचें पीठ न मिळाल्यास टरफलें असलेलेच ओट घेऊन ते शिजवून त्यांची अंबील करावी. तेंही न मिळाल्यास सबंद ओट घ्यावे व ते वत्त्यानें कुटून अथवा जात्यानें दळून नंतर ते शिजवून त्याची अंबील करावी. अशी केलेली अंबील फार उत्तम, परंतु येवढ्याकरितां ती करण्याचा कोणी कंटाळा करूं नये. कारण कांहीं दिवसांनीं ती करणें सोपें जातें.

मोठी दुःखाची गोष्ट आहे कीं, पुष्कळ आईबापांना मुलें वाढविणें हें फार बिकट व त्रासाचें काम वाटतें. ज्या मुलांची जोपासना लहानपणीं बरोबर होत नाहीं, त्यांच्या आईबापांनीं व शिक्षकांनीं वाटेल तितकी खटपट केली तरी कांहीं मुलें शिकत नाहींत व भलत्याच गोष्टीकडे लक्ष देतात; तीं रागी व चिडखोर असतात, व इतर लोकांशीं कसें वागावें तें त्यांना कळत नाहीं. मुलांस शिक्षण देणें कां कठीण पडतें हें समजणें शक्य नाहीं, असें लोकांस वाटतें व दुसरें कांहीं कारण असेल किंवा नाहीं याचा विचार न करितां या दिवसांत अशीच प्रवृत्ति व्हावयाची असा सिद्धांत ठोकून देतात. जेव्हां जेव्हां लहान मुलांचें शरीर दोषिक द्रव्यानें व्याप्त असतें, तेव्हां तेव्हां मन व शरीर या दोहोंवर नेहमींपेक्षां निराळा परिणाम होऊन त्यांच्यांत फरक पडतो. शरीरांतील दोषिक द्रव्य काढून टाकलें, तर त्यास नेहमींचें आरोग्य प्राप्त होईल. मीं आपला धंदा सुरू केल्यापासून मला आढळून आलें आहे कीं, माझ्या उपचारानें अतिशय खराब मुलें निवळून अतिशय शांत व सभ्य बनतात. जीं मुलें पूर्वींचीं दगड ठरलीं होतीं व जीं तासच्या तास एकच धडा पुढें घेऊन स्वस्थ बसत असत, अशा मुलांच्या शरीरांतील विजातीय द्रव्य काढून टाकल्यावर तीं अगदीं निराळ्या प्रकारचीं झालीं, असें अनुभवास आलें आहे.

यानंतर त्या मुलांना समजूं लागून तीं शिकूं लागलीं, व त्यांचा सुस्तपणा जाऊन तीं आईबापांना फिरून आवडूं लागलीं. योग्य मार्गानें गेलें असतां मुलें निरोगी राहतील; अशा रीतीनें त्यांची जोपासना करणें किती अल्प प्रयासाचें आहे व त्यांत काय सौख्य आहे, हें ज्यास माहीत असेल तो

आपल्या मुलांसाठीं ही तरतूद केल्याशिवाय राहणार नाहीं. माझे उपचार व विशेषेंकरून मुखचर्येवरून रोगपरीक्षा करण्याचें शास्त्र यांविषयीं माहिती करून घेणें प्रत्येक आईबापांचें कर्तव्य आहे. आपल्या मुलांच्या अंगांत दोषिक किंवा रोगमूलक द्रव्य सांचलें आहे किंवा नाहीं, हें त्यांच्या आईबापांना या शास्त्रानें तात्काळ बिनचूक कळून येतें.

आणखी एक महत्त्वाची गोष्ट आहे. या गोष्टीकडे कोणत्याही सबबीवरून दुर्लक्ष करितां यावयाचें नाहीं. ती कोणती ह्मणाल, तर तरुण मंडळींत दिवसेंदिवस वाढणारा कामविकार व त्यापासून उत्पन्न होणारी मुष्टिमैथुनाची संवय ही होय. या दुष्ट संवयीचें कारण अजून सर्व लोकांस कळलें नाहीं, ही दुर्दैवाची गोष्ट आहे; उलट दांभिक सभ्यपणा आणून लोक या विषयाचा नुसता उल्लेख देखील करूं देत नाहींत. असें करणें अगदीं अप्रशस्त आहे. जर जगाची सुधारणा करावयाची असली, तर त्यांत होणाऱ्या चुकांचा उघड उघड विचार केला पाहिजे. अजूनपर्यंत खेडेगावांतील जनावरें सृष्टीच्या नियमाप्रमाणें वागतात, आणि पूर्वीं सांगितलेंच आहे कीं, अशा जनावरांत जास्त कामविकार झाला कीं, त्यांना रोग झाला आहे असें तेथील लोक ओळखितात. सृष्टींतील इतर प्राण्यांना लागू असणारे नियम मनुष्यांस त्यांच्या विशेष स्थितीमुळें लागू पडत नाहींत. अशा प्रकारचे आक्षेप कांहीं लोक आणोत, परंतु मला तें बरोबर वाटत नाहीं. ज्याप्रमाणें जनावरांच्या अंगांत दोषिक द्रव्य सांचल्यानें कामवासना विशेष होतें, त्याप्रमाणेंच मनुष्यांसही झालें पाहिजे. हस्तमैथुनेच्छा ही जननेंद्रियांत विजातीय द्रव्य सांचल्यानें द्योतक आहे. तें द्रव्य त्या इंद्रियांतून काढून टाकिलें, तर ही फाजील कामवासना आपोआप बंद होईल. जननेंद्रिय हातळण्याच्या संवयीबद्दल कांहीं आईबापें मुलांना चोपतात, पण त्यांच्या या करण्याचा कांहीं उपयोग होत नाहीं. ही नेहमींची वासना बंद होण्यास, तीस कारणीभूत जें दोषिकद्रव्य तेंच शरीरामधून काढून टाकलें पाहिजे. मुलांची इंद्रियनिग्रह करण्याची शक्ति वाढवून ती संवय बंद करितां येईल, परंतु मूळकारण नाहींसें झाल्याशिवाय त्यां-

ची इच्छा निर्मूळ होणार नाहीं. हस्तमैथुनाची संवय असलेल्या पुष्कळ रोग्यांच्या फार दिवसांच्या अनुभवावरून माझी खातरी झाली आहे कीं, मार्जनविधि हा उपाय, अनुत्तेजक अन्न व सृष्टिनियमांना धरून वागणें, या उपायांनीं जो गुण येईल, तो कशानेंही येणार नाहीं. ह्मणून माझ्या उपचारानें मुलांत नीतिमत्ता वाढेल अशी माझी समजूत आहे. आणि ज्याअर्थीं ही गोष्ट इतक्या महत्त्वाची आहे, त्याअर्थीं माझ्या ह्मणण्याच्या खरेपणाची खातरी करून घेणें हें प्रत्येकानें आपलें कर्तव्यकर्म समजलें पाहिजे.

# प्रकरण पाचवें.

## भाग पहिला.

### बरे झालेल्या रोग्यांचे रिपोर्ट व कृतज्ञतापूर्वक आलेलीं पत्रें.

फार दूर राहणाऱ्या वाचकांना ह्या डा॰ कुन्हे यांच्या प्रयोगापासून रोग्यांना किती विलक्षण तऱ्हेनें गुण येतो, हें दाखविण्याकरितां नानाप्रकारच्या रोगांपासून रोगी बरे झाल्याचीं आलेलीं आभारदर्शक कांहीं पत्रें, मी छापीत आहें.

हीं पत्रें विन मागतां, मानवजातीचें हित व्हावें, याच हेतूनें व औषधावांचून रोग बरे करण्याचें शास्त्र हें किती खरें आहे, हें प्रसिद्ध करण्यासाठीं लोकांनीं पाठविलीं आहेत. तीं येणेंप्रमाणें:—

**नंबर १ ज्ञानतंतूंची अशक्तता, निद्रानाश जीर्ण आंत्रदाह व गॉलस्टोन्.**-मिसेस आर. या बाईंना फार दिवसांचा आंत्रदाह हा रोग झाला होता. तिला [ रेचक ] औषधें अथवा बस्ति दिल्यावांचून मलशुद्धि होत नसे. तसाच तिला गॉलस्टोन हा विकारही होताच. तिचें शरीर दिवसेंदिवस जास्त जास्त स्थूल होतां होतां शेवटीं अतिशय अवजड होऊन गेलें, तिला झोंप चांगली लागत नसे; यकृतामध्यें दुखत असे व भूक तर मुळींच लागत नसे. शिवाय तिच्या ज्ञानतंतूंसही अशक्तता आली होती. आतां शस्त्रप्रयोगावांचून दुसरा कांहींएक उपाय राहिला नाहीं, असें या स्त्रीस डाक्टरांनीं सांगितलें. यानंतर ती स्त्री डा॰ कुन्हे यांच्याकडे गेली.

डा॰ कुन्हे यांनीं या स्त्रीस दिवसांतून २ पासून पांच वेळपर्यंत उपविश्यस्नानें आठवड्यांतून एक किंवा दोन बाष्पस्नानें, व मांसवर्ज आहार, हे उपाय करण्यास सांगितलें. पहिल्या आठवड्यांत प्रकृतींत अगदीं सक्ष्म फरक पडत चालला. दुसऱ्या आठवड्यांत भूक व झोंप चांगली लागूं लागली

व मलशुद्धिही साफ होऊं लागली. तिसऱ्या आठवड्यांत ज्ञानतंतूसंबंधीं सर्व विकार नाहींसे झाले. चवथ्या आठवड्यांत शरीरांतील सर्व दुर्गंधीयुक्त काळा मळ पडून गेला. एवढ्या वेळांत त्या स्त्रीचें वजन १९ शेर कमी झालें व पोट स्थूल झालें होतें तें सर्व झडून गेलें. पांच आठवड्यांनीं त्या स्त्रीचा **गॉल-स्टोन** हा विकारही निघून गेला, व सात आठवड्यानंतर ती बाई सडसडीत बरी झाली.

**नंबर २ व्रण.**--ब्राझीलमधील एका २९ वर्षांच्या वयाच्या मनुष्यास व्रण झाल्यास आठ वर्षे झालीं होतीं. व्रण पसरतां पसरतां त्यानें मानेपासून पोटापर्यंतचा सर्व भाग व्यापून टाकला होता. जवणानंतर त्या व्रणांतून नेहमीं रक्त वाहत असे, व रोग्याच्या घशांतून अशी दुर्गंधी सुटत असे कीं, त्याच्या जवळ कोणाच्यानेंही क्षणभर बसवत नसे. अशी स्थिति असतांना त्या रोग्यास आपण आत्महत्या करावी ह्मणून इच्छा होत असे, यांत आश्चर्य तें काय !

ज्यांना डा० कुन्हे यांच्या उपायापासून गुण आला होता अशांचे सांगण्यावरून, सदरहू रोग्यानें डा० कुन्हे यांचे उपाय केले. हे उपाय प्रथम चालू असतां दोषिक द्रव्याच्या ठिकठिकाणीं ज्या गांठी बनून व्रण झाले होते, त्या गांठी विरघळून जात असतांना ज्या वेदना होत असत, त्यांमुळें त्या रोग्याची प्रकृति जास्त बिघडत चालली आहे असा भास होई. परंतु तेवढ्यानें श्रद्धा कमी न होतां हे उपाय चालू ठेवण्याचा त्या गृहस्थानें निश्चय केला. कांहीं दिवसांनीं त्याला प्रकृतींत सुधारणा दिसूं लागली व एक वर्षपर्यंत उपचार केल्यावर तो पूर्णपणें बरा झाला.

**नंबर ३ कांवीळ, अशक्तता, डोकेंदुखी.**--लीप्सिक येथील मिसेस एल. यांच्या तेरा वर्षांच्या मुलीस १८८७ सालीं, डोकेंदुखी, अशक्तता, व कोणतेंही काम करण्यास हुषारी व इच्छा न वाटणें, इत्यादि विकार होऊं लागले. कांहीं दिवसांनीं त्या मुलीस कांवीळ होऊन डोळे व सर्व अंग पिंवळें पडलें. त्याच वेळीं त्या मुलीस ज्वर येत असावा असें बाह्य लक्षणांवरून स्पष्ट दिसून येत होतें. या मुलीस डा० कुन्हे यांनीं अनुत्तेजक आहार

व दिवसांतून तीन उपविश्यस्नानें हे उपाय करण्यास सांगितलें. एका पथरवड्यांत त्या मुलीची सर्व कांवीळ निघून गेली.

नंबर ४ हाडीव्रण.--डब्ल्यू० येथाल मिस्टर ए. एच. यांच्या हाडास व्रण झाला होता. त्यावर नऊ महिने डाक्टरी उपाय केले, परंतु कांहीं गुण आला नाहीं. त्याच्या पायावर अनेक वेळां शस्त्रप्रयोग करून हाडांचे कित्येक तुकडे कापून काढले. परंतु त्यानें कांहीं फायदा न होतां उलट तो रोगी पंगू मात्र होऊन गेला होता. अशा स्थितींत त्या रोग्यावर डा० कुन्हे यांनीं आपले उपचार चालू केले. तीन महिन्यांच्या उपचारानंतर त्या रोग्याच्या पायावरील व्रण बरा झाला, व त्यानंतर थोड्या दिवसांनीं त्यास पायांनीं चालतां येऊं लागलें. आणखी तीन महिन्यांनीं तो मनुष्य अगदीं खडखडीत बरा झाला.

नंबर ५. अशक्तता, पाठींतील कळा, सर्द हातपाय, रक्तशोष, सुलभ प्रसूति.—डब्ल्यू येथील मिसेस ई. या बाई गरोदर असताना त्यांना अनेक प्रकारच्या व्याधि जडल्या होत्या. त्यांना डाक्टरांच्या उपचारापासून कांहीं गुण न वाटल्यामुळें त्यांनीं डा० कुन्हे यांचा सल्ला घेतला. डा० कुन्हे यांनीं त्यांना दिवसांतून एक वेळां कुक्षिस्नान व दोन वेळां उपविश्यस्नान करण्यास व त्यानंतर अंगांत ऊब आणण्याकरितां उन्हांत बसण्यास सांगितलें. त्याचप्रमाणें अगदीं अनुत्तेजक व साध्या अन्नाचा आहार करण्याविषयीं तिला समजावून सांगितलें. या उपायांचा त्या स्त्रीच्या प्रकृतीवर इतका परिणाम झाला कीं, तिच्या सर्व व्याधी जाऊन ती सुखानें प्रसूत झाली. तिनें डॉ० कुन्हे यांना सांगितलें कीं, पूर्वीं इतकी सुलभ प्रसूति कधींही झाली नाहीं, व पूर्वीं जो त्रास होई, व जे त्यावेळीं काळें निळें रक्त पडत असे, तशा तऱ्हेचा प्रकार यावेळीं बिलकूल घडून आला नाहीं. शिवाय ज्या तिला पूर्वीं मुलास पुरें इतकें दूध येत नसे, त्या तिला या खेपेस पुष्कळ दूध आलें.

नंबर ६. मांसपिंडावरील गांठ.--ई. के. या नऊ वर्षांच्या एका मुलीच्या मानेंतील एक पिंड सुजून मानेवर गांठ उत्पन्न झाली होती.

ही गांठ वाढतां वाढतां पुढें एका मोठ्या अंड्याएवढी झाली होती. या मुलीस डॉ० कुन्हे यांनीं दर वेळेला अर्धा तासप्रमाणें दिवसांतून कुक्षिस्नान व उपविश्यस्नान, आठवड्यांतून दोनदां मानेस वाफारा देणें व पथ्य आहार हे उपाय करण्यास सांगितलें. कांहीं वेळपर्यंत हे उपाय केल्यावर त्या मुलीचें डोकें मानेवरील गांठीमुळें जरा वांकडें झाल्यामुळें व तिला डोकें फिरवितां येत नसल्यामुळें मानेस वाफारा घेणें जरा त्रासाचें वाटूं लागलें. म्हणून वाफाऱ्याचे ऐवजीं शरीरास सहन होईल इतक्या कढत पाण्याच्या पट्ट्या त्या गांठीस लावण्याचा क्रम सुरू ठेवला. या पट्ट्यांचे योगानें शरीरांतील दोषिक द्रव्य बाहेर पडून जात होतें असें दिसे. कारण जरी गांठीच्या शेजारीं कोठेंही भोंक पडलें नव्हतें, तरी त्वचेंतून पूं पाझरून येऊन त्या पट्टीच्या फडक्यास चिकटून राहिलेला दृष्टीस पडे. पुढें कांहीं वेळानें दोन वाटाण्यांयेवढीं दोन भोंकें त्या जागीं पडून त्यांतून बराच पूं वाहून गेला. त्यानंतर ती गांठ बरीच उतरली. परंतु शेजारीं दुसरी एक गांठ उत्पन्न झाली. परंतु या गांठीतील पूं पूर्वीं उत्पन्न झालेल्या दोन छिद्रांतून वाहून गेल्यावर ही गांठही कमी झाली. याप्रमाणें होतां होतां एका महिन्यानें शाळेंत जाऊं येऊं लागण्यापुरती ती मुलगी बरी झाली. पांच आठवड्यांनीं ती पूर्णपणें बरी झाली व तिला मान व मस्तक वाटेल तिकडे फिरवितां येऊं लागलें.

इतका सर्व फेरफार होतांना त्या मुलीस वेदना बिलकूल झाल्या नाहींत. कारण वाफारा, ऊन पाण्याच्या पट्ट्या व उपविश्यस्नानें यांनीं त्या सर्व वेदना शांत केल्या जात असत, विशेष सांगावयाची गोष्ट ही कीं, या उपायांनीं गांठ झालेल्या ठिकाणीं वण देखील राहिला नाहीं.

**नंबर ७. काळिजाचा रोग व डोळ्यांपुढें काजळी दिसणें.**— डोळ्यामधील कांचेमध्यें विजातीय द्रव्याचे कण सांचल्यानें त्यांची छाया डोळ्यांच्या रेटिनावर पडते, व त्यामुळें डोळ्यापुढें काजळी दिसूं लागते. शरीरांतील सर्व विजातीय द्रव्य, व तें उत्पन्न होण्याचें कारण, हीं नाहींशीं

केल्यानें हा विकार बरा होतो. यास प्रत्यक्ष प्रमाण पुढील उदाहरण आहे. बी. येथील सालिसिटर मि० एफ्. एच्. हे काळिजाच्या रोगावर या नवीन चिकित्सापद्धतीचे उपाय करीत असतां, त्यांचा तो विकार जाऊन त्याबरोबर त्यांच्या डोळ्यापुढें काजळ्या दिसत असत त्याही बंद झाल्या.

**नंबर ८. वेळेवर विटाळ न होणें व गर्भाशयांतून रक्ताचा स्राव होणें**-लीप्सिक येथील मिसेस डब्ल्यू. या बाईंना वरील विकार झाले होते. त्यांनीं प्रथम लीप्सिक येथील डा० एस्. यांचें, व नंतर तेथील स्त्रियांच्या दवाखान्यांत जाऊन त्या ठिकाणचे औषधोपाय केले. पण त्यांना फायदा झाला नाहीं. पुढें रोज उपविश्यस्नानें व अनुत्तेजक अन्नाचा आहार हे उपाय कांहीं महिने केल्यानें त्या स्त्रीचे दोन्ही विकार जाऊन ती चांगली सदृढ झाली.

**नंबर ९. नपुंसकत्व**.-एस् येथील मि. जी. यांचें पुरुषत्व अगदीं नष्ट झालें होतें. त्यांनीं पूर्वी केलेले सर्व उपाय निरर्थक झाले होते. या गृहस्थान दिवसांतून आळीपाळीनें कुक्षिस्नान व उपविश्यस्नान हे उपाय केल्यानें व मांसाहार वर्ज केल्यानें, सहा आठवड्यांमध्यें त्यांस पुरुषत्व फिरून प्राप्त झालें.

**नंबर १०. सायानोसिस**-(ज्यामध्यें मनुष्य काळानिळा पडतो असा एक रोग) मि. ई. एच यांच्या बारा वर्षांच्या मुलीस वरील विकार झाला होता. हा विकार बराच जीर्ण असल्यामुळें तो लवकर बरा होण्याची आशा नव्हती. परंतु डा. कुन्हे यांचे उपाय चालू केल्यावर एका आठवड्यांत त्या मुलीचें अन्नपचन बरेंच सुधारल्यामुळें व भूक चांगली लागूं लागल्यामुळें ती लवकर बरी होईल, अशी आशा उत्पन्न झाली; व चार आठवड्यांत त्या मुलीचा विकार पूर्णपणें बरा झाला.

**नंबर ११ ओकारी, फुफ्फुससंबंधीं विकार-व क्लोरोसिस**-एल येथील मि. एम यांना बारा वर्षें ओकरीचा विकार होता तो कोणत्याही उपायानें बंद होईना. त्यांना आठवड्यांतून एकदां किंवा दोनदां ओकाऱ्यांची पाळी यावयाचीच. व एकदां ओकाऱ्या होऊं लागल्या ह्मणजे त्या सकाळपासून सं-

ध्याकाळपर्यंत चालूं राहत असत. यावर कुक्षिस्नान, उपविश्यस्नान अनुत्तेजक अन्नाचा आहार इत्यादि डा० कुन्हे यांचे उपाय केल्यानें ओकाऱ्या बंद झाल्या. शिवाय त्याचा फुफ्फुसाचा विकार व क्लोरोसिस हा रोगही बरा झाला. एकंदरींत चार आठवड्यांत त्या गृहस्थाचे सर्व विकार निघून गेले.

नंबर १२. अपचन—झेड येथील मि० बी, रसायनिक पदार्थ तयार करणारे एक गृहस्थ, यांना एकसारखीं २० वर्षें भूक चांगली लागत नसे, व अन्नपचन होत नसे. त्यांच्या कारखान्यांत सर्व प्रकारचीं सारक व रेचक औषधें होतीं. परंतु त्यांच्यापासून कांहीं उपयोग झाला नाहीं. एकाद्या औषधापासून थोडा वेळपर्यंत फायदा झाल्यासारखा दिसे, परंतु पुढें त्याचा गुण येत नसे. नेहमीं औषधांचा उपयोग करून त्यांचे दांतही किडून गेले होते. पुढें त्यांच्या नाकांत व श्वासनलिकेंत गांठी उत्पन्न झाल्या व या गांठी कांहीं केल्यानें नाहींशा होईनात या गांठी २६ वेळां कापून काढल्या, परंतु त्या फिरून वाढत असत नंतर डा० कुन्हे यांचे उपाय चालू केले. त्यापासून एका आठवड्यांत जितका गुण आला, तितका पूर्वी २० वर्षांतही आला नाहीं. चार आठवड्यांत तो रोगी पूर्णपणें बरा झाला. डा० कुन्हे यांच्या 'चिकित्सापद्धतीचें' तत्त्व बरोबर आहे, अशी त्या गृहस्थाची पूर्ण खात्री झाली, व त्यानें असें बोलून दाखविलें कीं, ज्याअर्थी पोटांत औषधें घेतल्यानें हितापेक्षां अपाय मात्र जास्त होतो. असा मला अनुभव आला आहे, त्याअर्थी यापुढें लोकांस औषधें विकणें ह्मणजे आपल्या मनोदेवतेच्या विरुद्ध वागण्यासारखें आहे. त्यानंतर तें दुकान दुसऱ्या कोणास विकून टाकावें असा त्या गृहस्थानें निश्चय केला.

नंबर १३. कांपरें व निद्रानाश—एल येथील मिसेस जी० यांच्या पांच वर्षांच्या मुलीस हे विकार झाले होते. तिच्या सर्व अंगास इतकें कांपरें सुटें कीं, त्यामुळें तिला चालतां येत नसे. हातानें कांहीं धरवत नसे व झोंपही येत नसे व खाल्लेलें अन्नही पचत नसे. सर्व प्रकारचे उपाय करून

ते निरर्थक झाल्यावर ही मुलगी तिच्या आईनें डा० कुन्हे यांस दाखविली.

कुक्षिस्नान, बराच वेळपर्यंत टिकणारें उपविश्यस्नान, मोकळ्या हवेंत व्यायाम घेणें व पथ्याहार या उपायांनीं त्या मुलीचा विकार अगदीं निघून गेला.

**नंबर १४. स्वप्नावस्था, क्षय, निद्रानाश, पक्षघात**—हे विकार झालेले एक गृहस्थ मि. एच. हे डा. कुन्हे यांच्याकडे उपचाराकरितां आले. या गृहस्थास चालण्यापासून फार त्रास होत असे व बसल्यानंतर उठतांनाही त्यास बरेच आयास होत असत. त्या गृहस्थास जरी बायको होती व त्याचें वय जरी ४२ वर्षांचें होतें, तरी त्यास स्वप्नावस्था होत असे. यावरून त्याच्या पाठीमध्यें दोषिक द्रव्याचा संचय बराच झाला होता. व त्याचे ज्ञानतंतु बिघडून गेले होते, असें स्पष्ट दिसत होतें. त्यानें सर्व प्रकारचे उपाय केले, परंतु कांहींएक गुण आला नाहीं. या रोग्यास डा. कुन्हे यांनीं पहिल्या पंधरवड्यांत दिवसांतून दोन वेळां **कुक्षिस्नान** करण्यास व पुढें दिवसांतून एक वेळां **कुक्षिस्नान** व दोन वेळां **मार्जनविधि** करण्यास सांगितलें. थोड्याच दिवसांत त्या गृहस्थाचें अन्नपचन सुधारलें व कांहीं आठवड्यांनीं पक्षघातानें गेलेले पाय फिरून आले. दोन महिन्यांत त्या गृहस्थाचा क्षय व अन्य सर्व विकार साफ बरे झाले.

**नंबर १५. मुकेपणा व बहिरेपणा, मेंदूमध्यें रक्तसंचय होणें.**—एल. येथील **मिसेस एस्.** यांची चार वर्षांची मुलगी मुकी व बहिरी होती. हे दोष त्या मुलीला देवी टोंचल्यानें उत्पन्न झाले असावे, असें त्या मुलीच्या आईस वाटत असे. डाक्टरांच्या उपायापासून त्या मुलीस कांहीं फायदा झाला नाहीं. मात्र तिला डाक्टरांच्या शस्त्रप्रयोगाची व ( दाहक ) औषधांची इतकी धास्ती बसली कीं, डाक्टर पाहिला कीं ती मुलगी रडावयास लागे. परीक्षा करितां, त्या मुलीच्या मेंदूमध्यें रक्तसंचय झाला आहे, असें डा० कुन्हे यांस आढळून आलें. त्या मुलीस डा० कुन्हे यांनीं शीतस्नानें घालण्यास व कोरडें व अनुत्तेजक असें अन्न खावयास देण्यास आणि मोक-

ळ्या हवेंत व उन्हांत हिंडवून व्यायाम करविण्यास सांगितलें. निजण्याच्या खोलीचीं दारें रात्रीं उघडीं ठेवावीं ह्मणूनही सांगितलें होतें. दोन आठवड्यांत त्या मुलीची प्रकृति इतकी सुधारली कीं, त्या मुलीस थोडें ऐकतां येऊं लागलें, व आणखी चार आठवड्यांनीं ती मुलगी पूर्णपणें बरी झाली, त्यानंतर तिला ऐकतां व बोलतां येऊं लागलें व तिचा लाजरा व भितरा स्वभावही निघून गेला.

नंबर १६.–गंडमाळा, क्लोरॉसिस व जवळचा पदार्थ न दिसणें हा नेत्ररोग.–जी. येथील शाळामास्तरीण मिस् एच्. जी. यांना पुष्कळ दिवसपर्यंत क्लोरोसिस् व गंडमाळा हे रोग होते. शिवाय त्यांच्या दृष्टीस कांहीं विकार झाल्यामुळें त्यांना फक्त लांबचा मात्र पदार्थ दिसे, जवळचा दिसत नसे. याकारणास्तव त्यांना त्यांच्याकरितां मुद्दाम केलेला चष्मा लावावा लागत असे, त्यावांचून जवळील माणूस किंवा पदार्थ त्यांना दिसत नसे. त्यांना जे गंडमाळा व क्लोरोसिस हे विकार होते, त्यांवर त्यांनीं बरेच उपाय केले, परंतु त्यांचा कांहीं उपयोग झाला नाहीं.

पुढें एका मित्राच्या सांगण्यावरून या बाईनीं डॉ० कुन्हे यांचे उपाय केले. त्या दिवसांतून दोन वेळां उपविश्यस्नान करीत असत. प्रत्येक स्नानाचा अवधि १५ पासून २० मिनिटांपर्यंत होता. शिवाय इतर आहारविहारही त्यांनीं आरोग्यरक्षणशास्त्राच्या तत्त्वांस अनुसरून ठेवला होता. एका वर्षांत त्या बाईचे गंडमाळा व क्लोरोसिस् हे विकार नाहींसे झाले व जवळचे पदार्थ दिसूं लागल्यामुळें त्यांचा चष्माही सुटला. याप्रमाणें जो नेत्रविकार मोठमोठ्या नेत्रवैद्यांच्यानें बरा झाला नाहीं, तो डा. कुन्हे यांच्या उपायांनीं बरा झाला.

# आभारदर्शक पत्रें.

**नंबर १७. दुखरा घसा, मूत्राशय व मूत्रपिंड, यासंबंधीं विकार, जननेंद्रियासंबंधी रोग.**

(ब्रामवर्ग).

डा० कुन्हे महाराज,

आपण आपल्या पत्रांत जे उपचार करण्याविषयीं मला सांगितलें, त्य उपायांपासून मला उत्तम गुण आला आहे. मूत्राशय व मूत्रपिंड यांसंबंधाचे विकार बरे झाले आहेत, व जननेंद्रियासंबंधीं जो एक रोग मल झाला होता, तोही आतां बरा होत आला आहे. शिवाय घशामध्ये पिंवळें गळूं झाल्यामुळें जो ठणका लागत असे, तोही बंद पडला आहे. एकंदरींत पूर्वीपेक्षां मला पुष्कळ हुषारी वाटते. आपल्या पत्रांत जो सल्ला आपण मला दिला, त्यापासून मला फार फायदा झाला आहे. व त्यायोगानें मजवर फार उपकार झाले आहेत.

इ. एम.

**नंबर १८. गुडघ्याचा सांधा सुजणें, मेंदूमध्यें रक्तसंचय होणें, यकृतासंबंधीं विकार इत्यादि.**

( टॉटेनॉ बोहेमिया ).

महाराज,

कांहीं दिवसांपूर्वीं माझ्या उजव्या पायाचा गुडघा सुजल्यामुळें मं आपल्या चिकित्सालयांत उपचाराकरितां गेलों. व १८ दिवस उपचार केल्यावर मी बरा होऊन परत घरीं आलों आहे. प्रथम माझा गुडघ सुजला, त्या वेळीं त्याचा घेर २२ इंच होता. परंतु कुक्षिस्नान, पथ्याहार उजेडांत व मोकळ्या हवेंत फिरणें इत्यादि आपल्या उपायांनीं गुडघ्याची सूज उतरून त्याचा घेर १७ इंच झाला आहे. मला जें आरोग्य सध्य

प्राप्त झालें आहे त्याचें सर्व श्रेय कांहीं दिव पूर्वीं मीं आपलें "**नवीन चिकित्साशास्त्र**" नांवाचें जें पुस्तक विकत घेतलें त्यास आहे. आपल्या चिकित्सालयांतून घरीं आल्यावर मीं आपण सांगितल्याप्रमाणें **उपविश्य-स्नान** व पथ्याहार इत्यादि उपाय चालू ठेवले, व त्यांच्या योगानें पूर्वीं डाक्टरांनीं असाध्य मानलेले, **ज्ञानतंतूंची अशक्तता, मेंदूमधील रक्तसंचय, काळजांत मेदोवृद्धि होणें.** हे विकार व यकृत् आणि मूत्रपिंड यांसंबंधीं कांहीं विकार बरे झाले आहेत. मध्यंतरीं आंतड्यांसंबंधीं कांहीं विकार उद्भवला होता, परंतु तो लवकरच नाहींसा झाला.

वरील दाखला आपण मला मागितल्यावांचून मीं आपल्या खुषीनें आपणांस दिला आहे. याचा आपण खासगी अथवा सरकारी दरबारीं वाटेल त्या कामाकरितां उपयोग करावा. आपण केलेल्या उपकारावद्दल मी आपले मनापासून आभार मानतों.

आपला,
**कार्ल एच.**

## नंबर १९. भयंकर अर्धशिशी.

**( बीलफेल ).**

**डा० कुन्हे महाराज,**

आपणांस आभारांचें प्रदर्शक पत्र पाठवावें असें आज पुष्कळ दिवस माझ्या मनांत आहे. परंतु कांहींना कांहीं तरी अडथळा मध्यें उत्पन्न होत असल्यामुळें ही गोष्ट ह्या वेळपर्यंत लांबणीवर पडली आहे. असो. आपणांस कदाचित् माझी आठवण असेलच. गेल्या आगस्ट महिन्यांत मिसेस एन. यांनीं माझा व माझ्या मुलीचा आपल्याशीं परिचय करून दिल्यावर माझ्या अर्धशिशीवर उपाय करण्याकरितां मीं आपणांजवळ गोष्ट काढली. मी आपणाकडे आलें. त्याच्या दुसऱ्याच दिवशीं अर्धशिशीचा जबर ठणका उठला. त्यावर आपण आपल्या अमोल्य वेळेपैकीं एक तास खर्च करून उपाय केल्यावर अर्धशिशी तावडतोब कमी झाली. त्या वेळेपासून आजपर्यंत मला अर्ध-

शिशी कधींही झाली नाहीं, याबद्दल मी ईश्वराचे व आपले फार आभार मानतें. तारुण्यांत जो उत्साह व जी उमेद मला वाटत असे, ती मला सध्यां वाटते व त्यामुळें आपल्या नियमाप्रमाणें पथ्य आहार करण्यास मला बिलकूल त्रास वाटत नाहीं. आपण जे **स्नानविधि** सांगितले आहेत. त्यांपासून प्रकृतीस अतिशय फायदा वाटतो, व त्यामुळें स्नान करण्याची वेळ टाळण्याची इच्छा कोणासही होणें अशक्य आहे असें मला वाटतें. मात्र आपण तयार केलेलीं **बाष्पस्नानाचीं** साधनें माझ्याजवळ नसल्यामुळें **बाष्पस्नानाची** तयारी करण्यास मला जरा त्रास पडतो. करितां आपण तयार केलेलीं **बाष्पस्नानाचीं** सर्व उपकरणें पाठवून द्यावीं.

माझ्या मुलीचा आपणास साष्टांग नमस्कार. आपल्या उपकाराबद्दल मी आपले आभार फिरून फार फार मानतें.

मिसेस इ. एच.

## नंबर २०. संधिवात, पक्षघात, सायाटिका व नेत्ररोग.

( लिप्सिक् ).

१८९२ च्या पावसाळ्यांत मला वर लिहिलेले विकार झाले व त्यांवर मीं अनेक प्रकारच्या चिकित्सापद्धतीचे उपाय साडे तीन वर्षेपर्यंत करून पाहिले. परंतु त्यांपैकीं एकापासूनही मला गुण आला नाहीं. या शहरांतील प्रसिद्ध डाक्तर व प्रोफेसर मिळून बाराजणांनीं मजवर उपाय केले. त्यांपैकीं कोणासही यश आलें नाहीं. सरते शेवटीं एका प्रोफेसराच्या व एका डाक्टराच्या सांगण्यावरून मी डा० कुन्हे यांच्याकडे गेलों. साडे तीन वर्षेपर्यंत जरी मजवर मोठमोठ्या नामांकित डाक्टरांनीं उपाय केले होते, तरी माझी प्रकृति दिवसेंदिवस जास्त खराब व त्रासदायक होत चालली होती. परंतु आश्चर्य हें कीं, डा० कुन्हे यांनीं मजवर फक्त तीन आठवडे उपाय केल्यानें माझी प्रकृति सर्व रोगांपासून मुक्त झाली आहे व कामधंदा करण्याची शक्ति माझ्या अंगात पूर्णपणें आली आहे.

एच. के.

## नंबर २१. क्षय, हाडास झालेला व्रण, अंतर्दाह, मूळव्याध व लघवीबरोबर रक्त जाणें इत्यादि विकार.

(ग्रोस हिलिग्ज फेल्ड).

कुन्हे महाराज.

सुमारें दोन वर्षांपूर्वी माझे चिरंजीव रे० ह०—यांनीं आपलें नवीन चिकित्साशास्त्र हें पुस्तक आणविलें. त्यानंतर गेल्या जुलै महिन्याचे अखेरीस मी अगदीं मरणोन्मुख होऊन पडलें. मजसंबंधीं सर्व डाक्टरांनीं आशा सोडून दिली होती. या वेळीं माझ्या मुलानें मला आपल्या चिकित्साशास्त्रांतील उपाय करण्यास सुचविलें. ज्याप्रमाणें पाण्यांत बुडणारा मनुष्य शेजारीं तरंगत असलेल्या गवताच्या काडीचा देखील आश्रय घेण्याचा प्रयत्न करतो, त्याप्रमाणें, माझी इतर सर्व आशा खुंटल्यामुळें, मीं माझ्या मुलाच्या सांगण्याप्रमाणें उपाय करण्याचा निश्चय केला. आपण सांगितलेलीं स्नानें व पथ्य आहार यांचा माझ्या प्रकृतीवर विलक्षण परिणाम झाला. पांच महिन्यांतच शौचावाटें रक्त पडणें, फुफ्फुसासंबंधी विकार, मूत्राबरोबर रक्त जाणें, व आंतड्यांचा दाह वगैरे विकार पूर्णपणें बरे झाले. जे विकार बारा वर्षांच्या उपायांनींही डाक्टरांना बरे झाले नाहींत एवढेंच नव्हे, तर जे विकार डाक्टरांचे उपाय चालू असतांही वाढत चालले होते, ते आपल्या उपायांनीं पांच महिन्यांत बरे झाले.

माझ्या शिफारशीवरून मि० एफ् यांनीं आपलें पुस्तक आणविलें व त्यांत सांगितल्याप्रमाणें उपाय केल्यावर त्यांच्या काळिजास असलेला कांहीं विकार पूर्णपणें बरा झाला. याशिवाय इतर पुष्कळ रोगी मीं आपल्या उपायांनीं बरे केले आहेत व आपल्या उपायांचा मीं येथें पुष्कळ प्रसार केला आहे.

उदाहरणार्थ, एका सोळा वर्षांच्या मुलीस सहा वर्षें कॅरिज (हाडास व्रण होणें) हा रोग होता. तीस कोठेंही योग्य औषधोपचार मिळेना. तिची पाठ, पाय, व बाहू यांमधून कित्येक हाडांचे तुकडे गळून पडले होते.

या मुलीस दोनदां **बाष्पस्नान**, दिवसांतून तीन वेळां **उपविश्यस्नान** आणि पथ्यआहार हे उपाय केले. जी मुलगी कांहीं दिवसांपूर्वीं केवळ जीवंत प्रेत दिसत होती, ती आपल्या उपायांनीं सदृढ, निरोगी व सुंदर झालेली पाहून मला अतिशय आनंद वाटला.

आपणासंबंधानें माझी जी कृतज्ञताबुद्धि आहे ती प्रदर्शित करण्याकरितां मीं आपणाकडे हा लेख पाठविला आहे.

मि० एम्. डी. यांची पत्नी.

## नंबर २२. पक्षघात, मलावरोध, गंडमाळा.

बर्ग विंढीम

महाराज,

कांहीं दिवसांपूर्वीं मी आजारी असतांना, आपण मला जो सल्ला दिला व जी मदत केली, त्याबद्दल आपले मनःपूर्वक आभार मानणें, हें मी आपलें कर्तव्यकर्म समजून हें पत्र पाठवीत आहें. १८९२ सालापासून गंडमाळांनीं मी पीडलों आहे. व आज कित्येक वर्षें माझें अन्नपचन बरोबर होत नाहीं. मी आजपर्यंत अनेक प्रकारचे उपाय करून दमलों, परंतु त्यांपासून कांहींएक फायदा न होतां उलट माझी प्रकृति जास्त बिघडल्यामुळें, डाक्टरावरील माझा सर्व विश्वास उडून गेला. अशा निराशेंत असतांना आपल्या चिकित्सापद्धतीसंबंधानें ऐकून मी लीप्सिक येथें येण्यास निघालों ज्या मला पूर्वीं कुबडी व काठी घेतल्यावांचून चालवत नसे, तो मीं थोडके दिवस आपले उपाय केल्यावर कुबडीच्या अथवा काठीच्या मदतीवांचून चालूं लागलों. आपले उपाय चालू असतां मला फार आराम वाटत असे. मी आपणांकडे जरा लवकर आलों असतों, तर गंडमाळांमुळें माझ्या मानेवर जे वण राहिले आहेत, ते राहिले नसते, व अर्थात् मान विद्रूप दिसली नसती.

डा० कुन्हे महाराज, आपल्या उपकाराबद्दल मी आपला सदैव ऋणी राहीन, व मी जेथें जेथें जाईन, तेथें तेथें आपल्या नवीन चिकित्साशास्त्राच्या तत्त्वांचा प्रसार करण्याचा प्रयत्न करीन. ( सही ) **बी.**

## नंबर २३. गरमी, निद्रानाश, शिरोरोग.

लीप्सिक्.

डा० कुन्हे महाराज,

नामांकित डाक्टरांनीं असाध्य मानलेल्या माझ्या गरमी रोगावर आपल्या उपायांपासून मला जो फायदा झाला, त्याबद्दल आपणांस लिहून कळविणें हें माझें कर्तव्यकर्म आहे, अशी माझी समजूत आहे.

पाण्याचे अनेक प्रकारचे प्रयोग व **गंधकस्नानें** ( गंधाचा वाफरा घेणें किंवा गंधक अंगास मर्दन करणें ) हे उपाय मीं ७।८ वर्षे माझ्या रोगावर केले. या उपायांपासून मल फायदा झाल्यासारखा वाटे, परंतु वास्तविकपणें या उपायांनीं रोग शरीरांत जास्त दबून मात्र जाई. त्यामुळें दिवसेंदिवस मला अशक्तता येत चालली होती, व काम करण्याची हुषारीही कमी होत होती. शेवटीं डोकेंदुखीचा आजार मला झाला, व त्या विकाराच्या वेदनांनीं मी अगदीं वेडा होऊन गेलों. पुढें कित्येक महिनेपर्यंत मला झोंप येईनाशी झाली. या वेळीं माझ्या पूर्वीच्या डाक्टरानें मला सांगितलें कीं, तुह्मी **गंधकस्नानें** करा; नाहींतर तुमच्या मेंदूस मोठा विकार होईल.

शेवटीं डाक्टरांचीं औषधें घेणें ह्मणजे केवळ विष घेण्यासारखें आहे, अशी माझी खातरी झाली. व इतर सर्व इलाज खुंटल्यामुळें आपले उपाय करून पाहण्याचा मीं निश्चय केला. आपल्या उपायांपासून इतका विलक्षण गुण वाटला कीं, फक्त तीन स्नानें कारितांच मला सुखकर निद्रा येऊं लागली.

आपल्या सुखकर उपायांचें अवलंबन सर्व लोक करतील तर त्यांचा किती तरी त्रास टळेल. आपल्या उपायांची स्तुति करावी तेवढी थोडी आहे. गरमी हा रोग पूर्णपणें बरा होणें शक्य नाहीं, असें डाक्टरांचें म्हणणें आहे. तें अगदीं चुकीचें आहे, अशी या रोगानें पीडलेल्या सर्व रोग्यांच्या फायद्याकरितां स्वतःच्या अनुभवावरून मी माझी साक्ष देतों.

आपले उपाय कांहीं दिवस चालू ठेवल्यानें माझे सर्व विकार नाहींसे

झाले आहेत, व माझ्या अंगांत हुषारी येऊन माझ्या शरीरावर निरोगीपणाची कांति आली आहे.

या सर्व गोष्टींबद्दल मी आपला आभारी आहें, व यापुढें मी सदैव आपला ऋणी राहीन.

एफ् इ.

नंबर २४. मुतखडा, मूत्रपिंडदाह, मूळव्याध, जलोदर.

लीप्सिक.

महराज,

कांहीं वर्षांपूर्वीं मला मूत्रपिंडदाह, मलावष्टंभ व निद्रानाश हे विकार झाले, व त्यांपासून मला फार त्रास सोसावा लागला.

तीन वर्षांनंतर माझी प्रकृति अतिशय बिघडून मी अगदीं क्षीण होऊन गेल्यामुळें, मला गाडींत घालून दवाखान्यांत नेलें. परीक्षेअंतीं मला मूत्रपिंडदाह, मूतखडा, मूळव्याध व जलोदराची पूर्वावस्था हे विकार झाले आहेत, असें आढळून आलें. मजवर पुष्कळ औषधांचा प्रयोग केला, परंतु त्यांपासून कांहीं गुण आला नाहीं. पुढें मीं आपले उपाय करण्यास आरंभ केल्यावर माझी प्रकृति सुधारूं लागली. माझ्या हल्लींच्या स्थितीवरून माझी पूर्वस्थिति काय होती हें मी कोणास सांगितलें, तर तें खरें देखील वाटणार नाहीं. पूर्वींची स्थिति चालू राहती, तर मला केव्हांच हा लोक सोडून जावें लागलें असतें. माझें सध्यांचें आरोग्य हें आपल्या उपायांचें फळ आहे, असें कृतज्ञताबुद्धीनें मी आपणांस कळवीत आहें.

आपला,

जी. एच्.

नंबर २५. दाढ दुखणें, अंग ठेंचणें व ज्वर.

वॉम्बॅड्, केपकॉलोनी, आफ्रिका.

डा० कुन्हे महाराज,

आपल्या उपदेशाप्रमाणें आपल्या उपायांचा मजवर व इतर लोकांवर

प्रयोग करण्याचे पुष्कळ प्रसंग मला आले. विशिष्ट हवेमध्यें येणारा ज्वर, व दाढ दुखणें, या रोगांवर स्थानिक बाष्पस्नान व कुक्षिस्नान यांपासून पुष्कळ फायदा होतो, असें मला आढळून आलें आहे. त्याचप्रमाणें एक इसमाचा उजवा हात ठेंचला होता, त्यावर आपल्या स्नानांचे प्रयोग केल्यानें हातांतील सर्व ठणका बंद पडला. येथील हाटेंटॉट लोकांमध्येंही पुष्कळांचे रोग आपल्या उपायांनीं मीं बरे केले आहेत, मिशनरींनीं परदेशीं जाण्याच्या पूर्वीं आपल्या चिकित्सालयांत राहून तेथें आपल्या चिकित्साशास्त्राचें ज्ञान संपादन करावें अशी मिशनच्या मुख्य चालकांना कित्येक वेळां सूचनाही करण्यांत आली आहे.

आणखी कांहीं रोगी बरे केल्याची हकीकत आपणांस कळविण्याचा मला लवकरच प्रसंग येईल अशी आशा आहे."

आपला पूर्ण अनुयायी,

**सी. डब्ल्यू. मिशनरी.**

## नंबर २६ काळपुळी व निद्रानाश.

**एच.** येथील **मि. एस्** लिहितात " एप्रिलमध्यें माझ्या मानेवर एक गांठ उठली व ती हळू हळू वाढत चालली. त्यावेळीं माझी एकंदर प्रकृतिही बिघडली होती. भूक चांगली लागत नसे व पाठीमध्यें कळ करीत असल्यामुळें झोंपही चांगली येत नसे. मानेवरील गांठ वाढतां वाढतां शेवटीं अंड्याएवढी मोठी झाली. तिजमधील ठणक्यामुळें माझी झोंप क्षुधा मला अगदीं सोडून गल्या. व त्यांच्या ऐवजी मोठ्या ज्वरानें शरीरांत ठाणें बसविलें. यानंतर मीं आपले उपाय करण्यास आरंभ केला. जेव्हां जेव्हां वेदना असह्य होत असत, तेव्हां तेव्हा मी वाफारा घेत असें व त्यापासून मला तात्काल आराम वाटत असे. दोन स्नानांच्या मध्यंतरीं गांठ आलेल्या भागावर, त्यावर मळ सांचू नये व तो खरचटला जाऊं नये, ह्मणून थंडपाण्याची पट्टी बांधून त्यावर लोकरीचा पट्टा बांधीत असे. ही गांठ ( काळपुळी) प्रथम अस्मानी रंगाची होती, व प्रथम घट्ट होती. या गांठींत वरचेवर

वेदना उत्पन्न होत असत. पुढें ४।५ दिवसांनीं टांचणीच्या आकाराचीं लहान लहान भोंकें ठिकठिकाणीं पडलीं व हीं भोंकें वाढतां वाढतां त्यांची संख्या विसापर्यंत येऊन ठेपली. त्या भोंकांतून रक्त व रक्तासारखें पाणी वाहूं लागलें. इतका वेळपर्यंत ती गांठ कठिणच राहिली होती. आणखी चार दिवसांनीं तीं सर्व भोंकें एक होऊन त्यांचें एक मोठें भोंक बनलें व त्यामधून पूं वाहूं लागला. शेवटीं गांठीजवळचा सर्व भाग एकाएकीं खालीं गेला, व त्याठिकाणीं एक मोठें थोरलें छिद्र पडलें, व त्यांतून रक्त व पूं वाहूं लागला. त्यायोगानें मला बराच आराम वाटला. त्या ठिकाणच्या वेदना नाहींशा झाल्या, व थोड्या दिवसांनंतर काळपुळी हा विकार पूर्णपणें बरा झाला. माझी प्रकृति पूर्वींपेक्षां मला आतां पुष्कळ बरी वाटते. माझ्या डोक्यावरचें मोठें थोरलें ओझें खालीं झालें आहे, असें आतां मला वाटतें, व माझ्या अंगांत सध्यां जितकी ताकद आली आहे तितकी पूर्वीं कधींही नव्हती. ''

## नंबर २७. स्मृतिदौर्बल्य, वातुळपणा–मेदोवृद्धि, फुफ्फुसासंबंधीं विकार, बहिरेपणा, ग्रशासंबंधीं रोग, ज्वर.

डा० कुन्हे महाराज,

पूर्वीं मी तालिमीचा व्यायाम करीत असें, तरी माझ्या वातुळ शरीरामुळें मला यत्किंचित्‌ही श्रम सोसत नसत. परंतु सध्यां माझा वात झडून गेल्यामुळें मी न दमतां तासच्या तास बागेंत काम करीत असतों. पूर्वीं माझीं फुफ्फुसें अशक्त असल्यामुळें, हवा खाण्याकरितां फिरत असतांना मला दम लागून तोंड उघडें ठेवावें लागत असे. परंतु आतां तोंड मिटून मला सहज श्वासोच्छ्वास करितां येतो. त्याचप्रमाणें पूर्वीं मला कित्येक वर्षेपर्यंत डाव्या कानानें मुळींच ऐकूं येत नसे, परंतु आतां मला घड्याळ कानाशीं धरल्यास त्याचें टकटकणें व रस्त्यावरून जाणाऱ्या गाड्यांच्या चाकांचा गडगडाट ऐकूं येतो. व त्यांतून विशेष आनंदाची गोष्ट ही कीं, जरासें मोठ्यानें बोलल्यास मला मनुष्यांचें भाषणही ऐकतां येतें. हे सर्व परिणाम आपल्या उपायामुळें घडून आले आहेत त्याचप्रमाणें पूर्वीं माझी स्मृति बिघडली होती, व

माझ्या घशास वरचेवर विकार होत असे, आणि माझे मज्जातंतु अगदीं निर्बल होते. परंतु हे सर्व विकार आपल्या उपायांनीं साफ बरे झाले आहेत.

त्याचप्रमाणें मजबरोबर मीं एक कुणबीण घेतली होती. तीस एकदां अतिशय ज्वर आला, व तिचें डोकें अतिशय दुखूं लागलें. त्याचप्रमाणें तिचे पायही सुजले होते. या बाईस आपले उपाय करतांच तिची प्रकृति तेव्हांच ताळ्यावर आली. तीन दिवसांत ती बाई अगदीं खडखडीत बरी झाली.

सेंटपीटर्सबर्ग. मिसेस ऑगस्ट बी.

## नंबर २८. डोकें दुखणें.

डॉ० कुन्हे महाराज,

कित्येक वर्षे मला हा डोकेंदुखीचा आजार होता व तो शेवटीं दुःसह झाल्यावर मीं आपले उपाय केल्यानें या आजारांतून मुक्त झालें आहें. माझा आजार घालविण्याचें सर्व श्रेय आपल्या उपायांकडे आहे. मी याच उपायाचा शेवटपर्यंत उपयोग करीन. रुग्णजनांना रोगाच्या यातनांतून सोडविण्याकरितां प्रयत्न करण्याचें आपलें काम निर्विघ्नपणें चालो अशी माझी मनःपूर्वक इच्छा आहे.

लीप्सिक. मिसेस एम डब्ल्यु.

**नंबर २९.**—डॉ० कुन्हे यांनीं सांगितल्याप्रमाणें विशिष्ट आहार व स्नानें यांच्या योगानें माझे **फॅरिंजिअल कॅटार्‍ह** व तोंडावरील पुरळ हे रोग पूर्णपणें बरे झाले आहेत.

याविषयींची सविस्तर माहिती मी वाटेल तेव्हां मोठ्या आनंदानें देईन.

लीप्सिक. एमिल. पी.

## नंबर ३०. अपस्मार, भोंवळ, रक्तशोष.

महाराज,

प्रकृतीसंबंधानें सर्वांची आशा नाहींशी झाली होती, अशा माझ्या मुलीवर आपण जे उपकार केले, त्याबद्दल माझी कृतज्ञताबुद्धि प्रदर्शित करण्याची मला आपण परवानगी द्यावी.

माझ्या मुलीस नवव्या वर्षी अपस्माराचे झटके येऊं लागले. या मुलीची प्रकृति आह्मीं एका डाक्टरास दाखविली. त्यानें सांगितलें कीं, या मुलीस रक्तशोष व ज्ञानतंतूसंबंधी अशक्तता हे विकार झाले आहेत. या डाक्टरानें कांहीं औषधोपचार केले, परंतु त्यांनीं विकार कमी न होतां उलट अपस्माराचे झटके जास्त येऊं लागले. त्यानंतर इतर पुष्कळ डाक्टरांना त्या मुलीची प्रकृति दाखविली. त्या सर्वांनीं तीस तींच तींच औषधें द्यावीं.

शेवटीं एका डाक्टरानें सांगितलें कीं, या मुलीचा विकार असाध्य आहे, यास्तव या मुलीच्या प्रकृतीस फक्त **पॉटेशिअम् ब्रोमाइड्**वांचून इतर सर्व औषधें रद्द आहेत. डाक्टराच्या या सांगण्यानें आमचीही खातरी झाली कीं, यावांचून दुसरें औषध राहिलें नाहीं. परंतु मध्यंतरीं आपली गांठ पडून आपण मला माझ्या मुलीच्या प्रकृतीची वास्तविक स्थिति काय होती हें सांगितलें. आपल्या उपायांनीं माझी मुलगी रोगांतून पूर्णपणें मुक्त झाली आहे. आपण आमचे रक्षणकर्ते व हितकर्ते आहात, अशी माझी व माझ्या कुटुंबांतील सर्व माणसांची आपणासंबंधानें समजूत आहे, व आह्मी सर्व आपणांस अतिशय पूज्य मानतों. फिरून आपली परवानगी घेऊन आपणासंबंधानें माझी कृतज्ञताबुद्धि प्रदर्शित करितों. आपला,

**गॅब्लोंझ बोहेमिया.** एम्. एच.

## नंबर ३९. पडसें, ताप.

**डा० कुन्हे महाराज.**

आपण मजवर व माझ्या आईवर जे उपकार केले आहेत त्याबद्दल आपले आभार मानावे तेवढे थोडे आहेत. मोठ्या जोराचें पडसें व सणसणीत ताप यांनीं मीं पछाडलों गेल्यामुळें आपले उपाय करून पाहण्याची मला इच्छा झाली. आपल्या उपायांनीं जो विलक्षण गुण मला आला, त्यानें मला आश्चर्यचकित करून सोडलें आहे. पुढें सर्व लोक आपल्याच उपायांचा उपयोग करूं लागतील अशी माझी पूर्ण खातरी आहे.

**हॅमबर्ग.** Chr. R. W. पी. एच. डी.

## नंबर ३२. हाडावर होणारे विस्फोट.

डा० कुन्हे महाराज,

शस्त्रक्रियेवांचून चिकित्सा करण्याच्या आपल्या शास्त्राचा जो फायदा माझ्या प्रत्यक्ष अनुभवास आला आहे, त्याबद्दल मी आपले मनःपूर्वक आभार मानतों.

डाक्टरांचे उपाय करीत असताना माझ्या पायावर आठ वेळां शस्त्रप्रयोग करण्यांत आला. प्रथम माझा आंगठा कापला, व नंतर माझा सबंध पाय कापून काढला. यामुळें आतां मला कुबड्या घेऊन हिंडावें लागतें.

परंतु इतके शस्त्रप्रयोग करूनही माझ्या पायास पूर्वीच्याएवढी नवीन गांठ उत्पन्न झाली. मला भीति पडली कीं, फिरून पायावर शस्त्रप्रयोग करावा लागतो कीं काय. पुढें आपल्या नवीन चिकित्सापद्धतीसंबंधानें मला माहिती लागली, व मार्चच्या आरंभीं मी आपणाकडे उपचाराकरितां आलें. आपल्या सांगण्याप्रमाणें शीतस्नानें व कांहीं अन्य उपाय चार आठवडे केल्यावर हाडांवरील गांठ पार नाहींशी झाली व फिरून एक शस्त्रप्रयोग करून घेण्याचा प्रसंग टळला.

रोगास प्रारंभ होतांक्षणींच मीं आपले उपचार चालू केले असते, तर शस्त्रप्रयोग करून घेण्याचा प्रसंग खातरीनें मला मुळींच आला नसता, व माझे सर्व अवयव ( पाय ) धड राहिले असते.

आपण मला जें साहाय्य केलें त्याबद्दल मी आपले फिरून आभार मानतें.

रुइनिझ. सोफिक डब्ल्यू.

## नंबर ३३. गर्भाशयास झालेला व्रण आणि रक्तस्राव.

डा० कुन्हे महाराज,

डिसेंबरमध्यें, रक्तस्रावानें माझें कुटुंब अतिशय आजारी पडलें, व त्या वेळीं मीं डा० के० यांना तावडतोब ( रात्रीं अकरा वाजतां ) बोलावणें पाठविलें. अतिशय उत्तम पिंजलेला कापूस घालून तो रक्तस्राव त्या डाक्टरांनीं बंद केला, परंतु दुसऱ्या दिवशीं पहिल्यापेक्षां जास्तच रक्तस्राव

होऊं लागला. यानंतर दुसरे एक डा० डॉ० डी० बोलाविले. या डाक्टरांनीं सांगितलें कीं, रोग्यावर शस्त्रप्रयोग केला पाहिजे. पुढें मीं प्रोफे० एच. यांना बोलावून त्यांचा सल्ला घेतला. त्यांनींही सांगितलें कीं, शस्त्रप्रयोग केलाच पाहिजे, नाहींतर ही स्त्री प्राणास मुकेल. कारण या स्त्रिच्या गर्भास व्रण झाला आहे.

शस्त्रप्रयोगावांचून दुसरा कोणताही इलाज नाहीं, असें या डाक्टरांचें मत पडल्यावर मी आपणाकडे आलों. आपण माझ्या कुटुंबास शीतस्नानें व विशिष्ट प्रकारचा आहार करण्यास सांगितलें. आपल्या सल्ल्याप्रमाणें उपचार सुरू केल्यावर माझ्या कुटुंबाची प्रकृति सुधारत चालली. माझी बायको सध्यां सकाळचे पांच वाजल्यापासून रात्रींचे दहा वाजेतोंपर्यंत आपल्या कामकाजाकरितां हिंडत फिरत असते; तरी तिला थकल्यासारखें वाटत नाहीं. तिची प्रकृति आतां जितकी निरोगी आहे इतकी पूर्वीं कधींही नव्हती.

आमच्या मनःपूर्वक दिलेल्या आभारांचा आपण स्वीकार करावा. सर्व रोग्यांना आपल्या उपायांची शिफारस करण्यास मी कधींही चुकणार नाहीं. आपल्या उपायांवांचून माझी बायको कधींही आज जिवंत राहिली नसती.

लीप्सिक्. आलबर्ट डब्ल्यू.

## नंबर ३४. डांग्या खोकला.

डा० कुन्हे महाराज,

आमच्या ३।४ महिन्यांच्या मुलास कांहीं दिवसांपूर्वीं डांग्या खोकला झाला. या मुलास आह्मीं कुक्षिस्नान घातलें. मात्र तें मूल रडत असल्याकारणानें हें स्नान थोड्या वेळांत आटपून घेतलें. एवढ्यानें त्या मुलास शौचास थोडेंसें साफ झालें व तिसऱ्या दिवशीं ढांस जरा कमी पडली. याच दिवशीं आपलें पत्र आल्यावरून त्यांत लिहिल्याप्रमाणें माझी बायको तें मूल कुशींत घेऊन त्यास पुष्कळ घाम येईतोंपर्यंत अंथरुणावर निजून राहिली. नंतर जें नित्य स्नान त्या मुलास आह्मी दोन प्रहरीं घालीत होतों, तें बंद केलें, व बारा दिवसांनीं त्या मुलाचा खोकला पार निघून गेला. डांग्या खो-

कल्याविषयीं जें आपण आपल्या पुस्तकांत लिहिलें आहे तें खरें आहे, अशी माझी खातरी झाली आहे.

फिरून मी स्वतःच्या व माझ्या कुटुंबाच्या वतीनें आपले फार फार आभार मानतों; कारण मला असें वाटतें कीं, आमचें मूल आजारांतून लवकर उठलें, याचें श्रेय ईश्वराच्या खालोखाल आपणांस व आपल्या चिकित्सापद्धतीस आहे.

हार्झबर्ग. ई. के.

## नंबर ३५. शिरोरोग, अपस्मार.

डा० कुन्हे महाराज,

मी शिरोरोग व अपस्मार या रोगानें पिडलों होतों. ड्रेस्डेन येथील दोन प्रख्यात वैद्यांनीं मजवर उपचार करून माझी प्रकृति असाध्य आहे, असें सांगितल्यावर मीं आपले उपाय केले, व त्या योगानें माझी प्रकृति रोगमुक्त झाली आहे.

वरील विकारांनीं माझी प्रकृति इतकी बिघडून गेली होती कीं, तीन महिनेपर्यंत मी घरांत आजारी पडून राहिलों होतों. या कारणानें सरकारास मला जबरीनें पलटणींत घालतां येईना.

ड्रेस्डेन. हान्स बी.

## नंबर ३६. कानांनीं चांगलें ऐकूं न येणें, पाठ दुखणें, खोकला, श्वास कोंडून जीव गुदमरल्यासारखा होणें.

डा० कुन्हे महाराज,

आपणांसंबंधानें आह्मी येथें रोज गोष्ट काढतों, आणि आपल्या अमूल्य उपायांनीं माझे मुलाचा फार दिवसांचा बहिरटपणा गेला याबद्दल आह्मी प्रत्यहीं परमेश्वराचे आभार मानतों. माझें मूल पूर्वी फार अशक्त व रडकें होतें, परंतु आपले उपाय करूं लागल्यापासून तें दिवसेंदिवस सदृढ व आनंदी होत चाललें आहे, व तें आतां इतर मुलांमध्यें मिसळूं लागलें आहे. या मुलाचा आपल्या उपायांनीं खोकला जो एकदा निघून गेला, त्यावर तो फि-

रून आलाच नाहीं. मुलाची प्रकृति दिवसेंदिवस कशी सुधारत चालली आहे, याचें प्रमाण प्रत्यहीं आह्मांस पाहण्यास मिळतें, व आह्मी आपली स्तुति नेहमीं गात असतों. डा० कुन्हे महाराज, मी आमच्या यजमानांच्या व माझ्या स्वतःच्या वतीनें आपले मनःपूर्वक आभार मानितें.

आपल्या उपायांनीं माझी प्रकृतिही पूर्वीपेक्षां पुष्कळ सुधारली आहे. विशेषतः माझ्या पाठींत ज्या कळा करीत असत, त्या आपल्या **उपविश्यस्नानानें** अगदीं बंद होतात असें माझ्या अनुभवास आलें आहे. .

रेव्ह. एम. यांची पत्नी.

## नंबर ३७. गर्भाशयापासून रक्तस्राव होणें.

महाराज,

**फ्लोरिका शेॅलरियम्** या नावांची एक बाई चार आठवडे एकसारखा रक्तस्राव होत असल्यानें आजारी झाली होती. आपल्या सांगण्याप्रमाणें तिनें आठवड्यांतून दोन वेळां **कुक्षिस्नान** एक वेळां **बाष्पस्नान**, व दिवसांतून २ किंवा तीन **उपविश्यस्नानें** व अनुत्तेजक अन्नाचा आहार हे उपाय केले. सहाव्या दिवशीं त्या स्त्रीची प्रकृति बरीच सुधारली. व आज ( पंधरा दिवस ) ती अगदीं खडखडीत बरी झाली आहे. या स्त्रीच्या व अन्य रोगपीडित जनांच्या वतीनें मी आपलें आभार मानतों. ईश्वर आपलें सदैव कल्याण करो.

**झेड हंगेरी.** **थिऑडोअर डी.**

**ग्रीक कॅथॉलिक पाद्री.**

## नंबर ३८. ज्ञानतंतूसंबंधीं अशक्तता, स्मृतिदौर्बल्य.

माझ्या कुटुंबास ज्ञानतंतूची अशक्तता हा रोग झाला होता. त्यावर हरतऱ्हेचे उपाय करून पाहिले. परंतु कशानेंही विशेष फायदा झाला नाहीं. पुढें १८९० च्या एप्रिलमध्यें डा० कुन्हे यांच्या चिकित्सालयामध्यें कांहीं दिवस उपचार करून पाहिले, परंतु त्यांपासून प्रकृति जास्तच बिघडत चालली आहे असें दिसलें. तथापि सात आठवड्यानंतर फरक दिसूं लागला. व ११ महिने डा० कुन्हे यांच्या स्नानांचा सतत उपयोग केल्यानें प्रकृति उत्तम सुधार-

ली. माझ्या बायकोची स्मृति व विचारशक्ति पूर्वी नष्ट झाल्यासारखी झाली होती, परंतु डा० कुन्हे यांचे उपाय केल्यावर या दोन्हीही शक्ती फिरून प्राप्त झाल्या. डा० कुन्हे यांचे उपाय सुरू केले, तेव्हां प्रथम माझ्या कुटुंबास २ मैल देखील मध्यें विश्रांति घेतल्यावाचून चालतां येत नसे. परंतु दहा महिन्यांनंतर तिला १२ मैल देखील न थांबतां चालतां येऊं लागलें. तिची प्रकृति एकंदरींत इतकी सुधारली कीं, तिला फिरून नवीन देह प्राप्त झाला आहे असें वाटे.

डा० कुन्हे यांनीं आह्मांस उत्तम सल्ला दिल्याबद्दल ईश्वराच्या खालोखाल त्यांचेच आह्मी ऋणी आहों. आपल्या बांधवांच्या कल्याणार्थ श्रम करण्यास डा० कुन्हे यांस ईश्वर दीर्घायुष्य देवो.

बर्लिन. सी. एस.

नंबर ३९. शिरोरोग, नेत्ररोग, रक्तशोष, क्षीणता व दम लागणें.

लहानपणीं व विशेषतः मी शाळेंत विद्यार्थी असतांना माझें डोकें मधून मधून दुखत असें. पुढें पुढें तर तें बऱ्याच वेळां दुखूं लागलें.

पुढें १९ व्या वर्षीं मी कांहीं कारणानें पडलों, व त्यामुळें माझ्या पायाचें स्नायुबंधन ताणलें गेलें. या कारणानें मला चालतां येईनासें झालें. यावर डाक्टरांचा कांहींही इलाज चालेना, व पांच वर्षेपर्यंत मला बऱ्याच यातना सोसाव्या लागल्या.

कांहीं दिवसांनीं माझे डोळे बिघडले. शिवाय मला नेहमीं ताप येत असे व श्वासोच्छ्वास करण्यासही जड पडत असे. मध्यंतरीं शिरोरोग व रक्तशोष हे विकार बरेच वाढल्यामुळें मला दवाखान्यांत नेलें, तेथें प्रकृतींत कांहींएक सुधारणा न होतां मी दवाखाना सोडून आलें.

शेवटीं दुसऱ्या कोणाच्या उपायापासून फायदा होत नाहीं, असें पाहून या वर्षाच्या सप्टंबर महिन्यांत मी डा० कुन्हे यांच्याकडे गेलें.

डा० कुन्हे यांनीं सांगितल्याप्रमाणें एकदां स्नान केल्याबरोबर मला पुष्कळच आराम वाटला. पुढें सुमारें पांच महिने हे उपाय चालू ठेवल्यानंतर

माझे सर्व विकार नाहींसे झाले या उपायांचा माझ्या कुटुंबांत बराच प्रसार झाला आहे, व त्यांचा सर्व प्रसंगीं चांगला उपयोग होतो, असें आढळून आलें आहे.

आपले उपाय करण्याची सर्व रोग्यांना बुद्धि होवो अशी मी इच्छा कारितें.

लीप्सिक्. मिसेस मेरी आर.

नंबर संधिवात.

डा० कुन्हे महाराजः—

मी अजारी असतांना मला सल्ला देऊन आपण मजविषयीं जी सहानुभूति दाखविली, त्याबद्दल माझी कृतज्ञताबुद्धि आपणापुढें व्यक्त करणें हें माझें कर्तव्यकर्म आहे, असें मी समजतों. गेल्या वर्षाच्या मे महिन्यांत माझे सांधे बरेच दिवस एकसारखे वातानें दुखत होते. व टेप्लिझ् येथें औषध घेऊन माझा सांधिवात गेल्यासारखें जरी मला वाटत होतें, तरी पुढील नोव्हेंबरमध्यें माझे सांधे फिरून वातानें धरले. यावेळीं डाक्टरांचे उपाय सर्व संपल्यासारखे झाले होते असें दिसतें, कारण त्या सद्गृहस्थानें कित्येक आठवडेपर्यंत मला दर्शनही दिलें नाहीं. व शेवटीं जर्मनीच्या दक्षिण भागामध्यें कांहीं दिवस राहणें एवढाच काय तो उपाय उरला आहे, ह्मणून मला सांगितलें. हें ऐकून माझें कुटुंब फार काळजींत पडलें व त्यांनीं आपला सल्ला विचारला व आपण मेहेरबानगी करून पत्रद्वारें आपला सल्ला कळविला त्याप्रमाणें आपले उपाय चालू केल्यावर मध्यंतरीं माझ्या विकाराचीं लक्षणें जास्त वाटूं लागलीं, परंतु पुढें लवकरच प्रकृतींत सुधारणा दिसूं लागली. १४ दिवस उपाय केल्यानें माझें नेहमींचें काम करण्याइतकी माझी प्रकृति सुधारली.

आपल्या शास्त्राचा प्रसार दिवसेंदिवस जास्त होवो अशी माझी मनःपूर्वक इच्छा आहे.

ज़ुलियस् एस्. ( सर्टिफाईड शिक्षक ).

## नंबर ४१. पोटदुखी, क्षुधाभाव, चक्कर करणें, रक्तस्राव, फुफ्फुसासंबंधीं विकार, अशक्तता

माझी बायको ( वय ६१ वर्षें ) कित्येक वर्षेपर्यंत व विशेषतः १८९० सालापासून मस्तकांत चक्कर करणें, पोटदुखी, भूक न लागणें व अशक्तता इत्यादि विकारांनीं पीडलेली होती.

१८९० सालीं मी आपल्या कुटुंबास रॉयल युनिव्हर्सिटी हॉस्पिटल्-मध्यें घेऊन गेलों. तेथील डाक्टरांनीं तिच्या जठरास व मूत्रपिंडास विकार झाला आहे असें आपलें मत दिलें, व अनेक प्रकारचीं औषधें खरडून दिलीं. परंतु या औषधांनीं माझ्या कुटुंबाची प्रकृति सुधारण्याऐवजीं जास्तच बिघडली.

पुढें १८९१ च्या फेब्रुवारी महिन्यांत माझ्या कुटुंबाची प्रकृति अगदीं घाईस आली त्यावेळीं डाक्टर एच् यांस बोलावणें पाठविलें, परंतु तिचा रोग असाध्य आहे, असें सांगून त्या डाक्टरानें पुढें येण्याचें सोडून दिलें.

याच वर्षाच्या एप्रिलमध्यें माझ्या कुटुंबाचा पोटदुखीचा आजार इतका वाढला कीं, तीस थोडेंसें देखील अन्न पचनासें झालें. पुढें छातींत कळा करूं लागल्या व श्वास घेतांना दमही लागूं लागला.

नंतर मीं होमिओपॅथिक औषधांचा उपयोग करून पाहिला. परंतु होमिओपॅथिक डाक्टरानें विकार असाध्य आहे असें सांगितल्यावर, मी आपल्या कुटुंबास डा० कुन्हे यांच्या चिकित्सालयांत घेऊन गेलों.

तेथें डा० कुन्हे यांनीं माझ्या कुटुंबाच्या प्रकृतीस हितावह होईल अशा प्रकारचा विशिष्ट आहार व दिवसांतून दोन वेळां उपविश्यस्नान हे उपाय करण्यास सांगितलें या उपायांनीं माझ्या कुटुंबाचे वर सांगितलेले सर्व विकार नाहींसे झाले व तिची दृष्टि हे विकार होण्याच्या पूर्वीं जशी होती, त्यापेक्षां पुष्कळच सुधारली. याप्रमाणें जें कार्य डाक्टरांच्या हातून दोन वर्षांत झालें नाहीं, तें डा० कुन्हे यांनीं ८ आठवड्यांतच केलें.

याबद्दल डा० कुन्हे यांचें आह्मीं सदैव ऋणी असावें हें साहजिक आहे. रोगपीडित जनांच्या कल्याणार्थ डा० कुन्हे यांणीं जें काम चालविलें आहे, त्यामध्यें त्यांना ईश्वरानें साहाय्य व यश द्यावें, अशी आमची इच्छा आहे. सर्व रोगांची चिकित्सा करून लोकांना साहाय्य करण्यास खरोखरीं समर्थ असे डाक्टर फक्त डा० कुन्हे हेच आहेत.

लीप्सिक. गस्टव्ह पी.

**नंबर ४२. असाध्य नेत्ररोग, मस्तकाच्या ज्ञानतंतूसंबंधीं रोग, मूत्रपिंड दाह, पाठींत व कुशींत कळा करणें.**

**डा० कुन्हे महाराजः—**

लहानपणीं देवी आल्यानें माझे डोळे बिघडले होते मीं पुष्कळ डाक्टरांना आपली प्रकृति दाखविली, व **कॅलोमेल**, पाऱ्याचें मलम, **झिंक लोशन** वगैरे अनेक उपाय केले. या कामीं मीं एकंदरींत दहा डाक्टरांचा सल्ला घेतला; परंतु कोणाच्याही सल्ल्यानें मला फायदा झाला नाहीं.

पुढें माझे डोळे बरेच बिघडले, व त्यांना **इजिप्शियन आय डिसीज** नांवाचा रोग झाला. त्यावर मी **व्हिएन्ना** येथील नेत्ररोगाच्या दवाखान्यांत गेलों. तेथें मीं ६ महिने उपाय केले, परंतु कांहीं फायदा झाला नाहीं. तेथील डॉक्टरांनीं माझ्या डोळ्यावर २ वेळां शस्त्रप्रयोग केला. त्यापासून मला निरर्थक त्रास मात्र झाला.

शेवटीं आपला कांहीं इलाज चालत नाहीं असें पाहून, त्या डाक्टरांनीं दवाखाना सोडून जाण्यास मला सांगितलें. यानंतर मीं आपले उपाय केले नसते, तर मला जन्मभर अंध रहावें लागलें असतें.

आपले उपाय केल्यानें माझ्या डोळ्यांचा विकार पार निघून गेला; एवढेंच नव्हे, तर माझे पूर्वींचे **फॅरिंजायटीस मूत्राशयाचा अशक्तपणा** हे जीर्ण विकारही साफ बरे झाले. आपल्या उपायांनीं माझी प्रकृतिही एकंदरींत बरीच सुधारली आहे. सध्यां इतकी तरतरी माझ्या डोळ्यास पूर्वीं कधींही वाटली नाहीं.

आपणांकडे सर्व रोगी लोक येऊन रोगमुक्त होवोत, व आपल्या उपायांचा लोकांमध्यें दिवसेंदिवस जास्त प्रसार होवो अशी मी इच्छा करितों.

एस ( ट्रॅन्सिल्व्हॅनिया ) यूजिन के.

## नंबर ४३. फुफ्फुसांचा दाह, घटसर्प.

डा० कुन्हे महाराज, आपल्या उपचारांपासून माझ्या नऊ वर्षांच्या मुलीस जो विलक्षण गुण आला, त्याबद्दल आपले जाहीर रीतीनें आभार मानल्याशिवाय माझ्यानें राहवत नाहीं.

आमच्या कुटुंबवैद्यांनीं या मुलीस फुफ्फुसांचा दाह हा विकार झाला आहे अशी परीक्षा केली. व त्या विकारावर दोन महिने औषधोपाय केले. परंतु कांहीं गुण आला नाहीं. ही मुलगी आपणांस लाभत नाहीं अशी माझी व माझ्या कुटुंबाची समजूत झाली, व अशा निराशेंत असतांना मी आपणाकडे आलों. आपले उपाय चालू केल्याच्या दुसऱ्याच दिवशीं मुलीच्या प्रकृतींत सुधारणा दिसूं लागली व एका आठवड्यानंतर तिची प्रकृति इतकी सुधारली कीं, आमची मुलगी या रोगांतून खास जगणार अशी आमची खातरी झाली. आज ती मुलगी अगदीं निरोगी आहे व खुशाल हंसत व इकडे तिकडे धांवत आणि खेळत आहे. माझा असा पक्का ग्रह आहे कीं, आपलें साहाय्य मिळालें नसतें, तर मुलगी हातची गेली असती.

त्याचप्रमाणें माझ्या मुलांना घटसर्प हा रोग झाला असतां, मीं आपले उपाय केले, व त्यांपासून उत्तम गुण येतो, असें मला आढळून आलें.

आपला,

लिप्सिक. कार्ल. ई.

## नंबर ४४. जठरदाह व आंत्रदाह, ज्ञानतंतूंची अशक्तता, स्मृतिदौर्बल्य.

डा० कुन्हे महाराज,

आपल्या उपायांपासून मला उत्तम गुण आला आहे, हें कळविण्याचा मला सुदैवानें प्रसंग आला आहे.—

अयोग्य आहारामुळें माझे ज्ञानतंतु अगदीं बिघडून गेले होते व त्यामुळें मला अतिशय अस्वस्थ वाटून पुष्कळ वेळां आत्महत्या करावी अशी इच्छा होई. शिवाय माझी स्मृतिही अगदीं निर्बळ होऊन गेली होती. परंतु आपल्या उपायानें सहा महिन्यांमध्यें माझे सर्व विकार कमी झाले आहेत.

माझ्यासारखे अन्य रोगानें पीडलेले लोक आपल्या चिकित्सालयांत जाऊन रोगमुक्त होवोत, अशी मी मनापासून इच्छा करतों. आपणांस नेहमीं यशप्राप्ति होऊन आपली संस्था नेहमीं भरभराटींत राहो.

एसटी ( मोरेव्हिया ).

आपला

ह्यगो. बी.

( आस्ट्रियांतील एक पोष्टमास्तर ).

## नंबर ४५. स्त्रियांचा विटाळ बंद पडणें.

डा० कुन्हे महाराज,

गेल्या आगष्ट महिन्यापासून माझ्या कुटुंबाचा विटाळ कांहीं विकारामुळें बंद झाला. त्यावर मीं आपणांस पत्र लिहून आपला सल्ला विचारला. आपल्या सांगण्याप्रमाणें उपाय केल्यावर थोड्याच वेळानें कुटुंब विटाळशी झालें. मध्यंतरीं नऊ महिनेपर्यंत कुटुंबास विटाळ मुळींच झाला नव्हता.

आपल्या उपायांनीं जसा गुण आला तसा इतर उपायांनीं क्वचितच येतो; ह्मणून त्यामुळें मला जो आनंद वाटला तो मीं आपणास मुद्दाम कळविला आहे.

आपला

कील. एच. एच.

## नंबर ४६. संधिवात यकृत्संबंधीं रोग व मूळव्याध.

डा० कुन्हे महाराज,

आपल्या उपायांनीं रोगमुक्त झाल्यास आज दोन वर्षे झालीं. इतक्या अवधींत मला कसलाही विकार झाला नाहीं. माझ्या पूर्वींच्या व हल्लींच्या

स्थितींतील अंतर पाहून मला व इतर सर्वांना अतिशय चमत्कार वाटत आहे. मी आपणांकडे प्रथम आलों, तेव्हां माझ्या प्रकृतीची काय स्थिति होती हें आपणांस माहित आहेच. पूर्वी मला कधीं कांहीं विकार नाहीं, असें क्वचितच होत असे. संधिवात, शैत्य व इतर अनेक प्रकारचे रोग यांची एका पाठीमागून एक अशी सारखी मालिका लागलेली असे. पुढें मूळव्याध व यकृत्संबंधी रोग जडल्यामुळें दहा वर्षेपर्यंत मी निरनिराळ्या डाक्टरांच्या हातांत होतों. अगदीं शेवटीं **बोन युनिव्हर्सिटींतील** एका प्रसिद्ध प्रोफेसरांचेंही औषध कांहीं दिवस घेतलें. परंतु इतकें सर्व करून कांहीं फायदा झाला नाहीं. माझी प्रकृति दिवसेंदिवस जास्त अशक्त होऊन माझ्यानें माझा कामधंदाही करवेना. त्यानंतर मीं आपले उपाय केले व त्यांपासून मला अत्युत्तम गुण आला. हें पाहून पुष्कळ रोगी आपणांकडे उपचाराकरितां आले व त्या सर्वांचे हेतु सफल झाले. आपण मजवर जे उपकार केले आहेत त्याबद्दल मी व माझ्या कुटुंबांतील सर्व माणसें आपलीं नेहमीं ऋणी राहतील. मी बरा झाल्याबद्दल जी हकीकत कळविली आहे, तिचा इतर रोग्यांच्या फायद्याकरितां व आपल्या सत्कार्यास मदत करण्याकरितां होईल तितका प्रसार करवावा, अशी विनंति करण्याच्या मुख्य हेतूनें मी हें पत्र पाठवीत आहें. इतर रोग्यांवर आपले उपाय करून मला जें यश आलें आहे, त्याविषयीं बरेंच लिहितां येईल, परंतु विस्तारभयास्तव मला तसें करितां कामा नये. मला सध्यां ५१ वें वर्ष आहे व १ लक्ष १५ हजार वस्तीच्या शहरामध्यें आज १६ वर्षें **इव्हँजेलिकल** मिशनच्या सुपरिंटेंडेंटचें काम करीत आहें. कांहीं अन्य माहिती आपणांस हवी असल्यास ती वाटेल तेव्हां मजकडून मिळण्यासारखी आहे.

आपला कृतज्ञ मित्र.

**बार्मेन.** **अन्स्ट एफ.**

**नंबर ४७. पोटांतील विकार, मलावष्टंभ, ज्ञानतंतूंची अशक्तता.**

सहा वर्षेपर्यंत मी ज्ञानतंतूसंबंधीं व जठरसंबंधीं कांहीं विकारानें पीडलों

असतांना आपल्या नवीन चिकित्सापद्धतीनें मला जो गुण आला त्याबद्दल मी आपला अतिशय ऋणी आहें.

शौचास साफ होण्याकरितां मला पूर्वी नेहमीं बस्तीचा उपयोग करावा लागत असे. शौचासंबंधाचा जो विकार नामांकित डाक्टरांकडून सर्व प्रकारच्या औषधांनींही हटला नाहीं, तो आपल्या उपायांनीं पांच दिवसांत बंद झाला.

**व्ही वेस्ट प्रशिया.** **झेड्** ( शाळामास्तर ).

## नंबर ४८. ज्ञानतंतूसंबंधीं विकार.

डा० कुन्हे महाराज,

माझे विचार व्यक्त करावेत अशी मला मनांतून प्रेरणा होत असल्यावरून मी हें पत्र लिहीत आहें. खरोखर ज्या इतर चिकित्सापद्धतींमध्यें औषधांचा उपयोग करतात, त्या सर्व पद्धतींपेक्षां आपली चिकित्सापद्धति अत्यंत उपयुक्त आहे. माझी अशी पक्की खात्री आहे कीं, आपण जे उपाय शोधून काढले आहेत, ते आपल्या अलौकिक बुद्धिमत्तेचेंच फळ आहे. मी असें बिन दिक्कत सांगतें कीं, आपणांमुळेंच माझ्या बहिणीचे प्राण वांचले आहेत. त्याचप्रमाणें माझ्या मुलांच्या ज्या अनेक व्याधि आपण अगदीं अल्प कालांत बऱ्या केल्या आहेत, त्यांवरून माझी अशी समजूत झाली आहे कीं, **लीप्सिक्** येथें राहण्यापासून मला जे अत्युत्तम फायदे झाले आहेत, त्यांपैकीं आपला परिचय हा एक आहे. मी जगांत कोठेंही असों, मी आपणांसंबंधानें नेहमीं कृतज्ञताबुद्धि राखीन, व आपल्या तत्त्वांचें मी नेहमीं समर्थन करीन.

व्हिएन्ना. **मिसेस ओल्गा एल.**

## नंबर ४९. संधिवात.

महाराज,

**बाष्पस्नान** व **कुक्षिस्नान** यांचा वारंवार उपयोग केल्यानें माझा दुर्धर संधिवात रोग थोड्या वेळांत बरा झाला आहे हें कळविण्यास मला आनंद वाटतो. आपलें स्नान दुसऱ्यांदां करतांक्षणींच मला दुसऱ्याच्या मदतीवांचून

चालतां येऊं लागलें. अशा प्रकारचे विकार ज्यांना ज्यांना असतील त्यांनीं त्यांनीं आपले उपाय करून पहावेत अशी त्यांना माझी शिफारस आहे.

लीप्सिक्.                                                    जी. ई.

## नंबर ५०. लुला हात.

महाराज,

माझा मुलगा ऑगस्ट व्हॉन बी. हा १२ वर्षांचा असतांना त्याचा उजवा हात दुखूं लागला. ही गोष्ट १८८६ च्या डिसेंबर महिन्यांत झाली. पुढें तो हात इतका बिघडून गेला कीं, तो इकडे तिकडे हालवितां येईना, व यास्तव त्यास नेहमीं कापडाच्या झोळींत ठेवावें लागत असे. त्या हातास पुष्कळ उपाय केले, परंतु ते सर्व व्यर्थ गेले.

नंतर आह्मीं डा० कुन्हे यांचे उपाय करण्याचा निश्चय केला. **कुक्षिस्नान व उपविश्यस्नान** व अनुत्तेजक आहार यांच्या योगानें माझ्या मुलाचा हात बरा झाला; एवढेंच नव्हे तर त्याची पूर्वीं नष्ट झालेली पचनशक्तिही चांगली सुधारली.

ड्रेस्डेन.                                    एडल् के. ( लेफ्टेनन्ट कर्नल
                                                    के. यांच्या पत्नी ).

## नंबर ५१. पोटांतील कांहीं दुर्धर विकार, श्वेत प्रदर (धुपणी).

**महाराज,**

माझ्या विकारावर मीं कित्येक वर्षेंपर्यंत उत्तम उत्तम डाक्टरांचे उपचार केले; परंतु त्यापासून मला गुणापेक्षां अपाय मात्र जास्त झाला. मजवर **शस्त्रप्रयोग** केला पाहिजे असें डाक्टरांचें मत पडलें. परंतु आपले उपाय केल्यानें शस्त्रप्रयोगाची सर्व अवश्यकता टळून मी सर्व विकारांतून मुक्त झालें आहे

**लीप्सिक्.**                                    **मिसेस इ. एल.**

## नंबर ५२. वात.

महाराज,

आपण मजवर आपले उपाय केले, हे आपले मजवर फार उपकार

झाले आहेत. माझा रोग फार दिवसांचा होता व तो बरा होईल अशी मला क्वचितच आशा होती. वातानें माझ्या पावलाचे व हाताचे सांधे इतके दडस होऊन गेले होते कीं, मला या अवयवांचा उपयोग करितां येत नसे. कोणत्याही डाक्टराच्या उपायांपासून मला गुण वाटला नाहीं.

सहा महिन्यांपूर्वीं मीं आपले उपचार सुरू केल्यावर वातविकार कमी होण्यास प्रारंभ झाला. दोन तीन आठवड्यांमध्यें पावलें व हात यांचे सांधे वळूं लागले, व मला चालतां येऊं लागलें. आतां दिवसेंदिवस हातांतील वात कमी होऊन बोटें पूर्वीप्रमाणें चांगलीं होत चालली आहेत.

लीप्सिक.　　　　　　　　　　　　एमिल डब्ल्यू.

## नंबर ९३. मस्तक दुखणें, मूर्च्छा येणें, घशासंबंधीं रोग.

डा० कुन्हे महाराज,

आपल्या उपायामुळें मीं मस्तकदुखी, मूर्च्छा येणें व घशासंबंधीं विकार यांतून मुक्त झालें आहे, यास्तव आपले आभार मानणें हें माझें कर्तव्य कर्म आहे, असें मी समजतें. व्याधीनें पीडिलेल्या जनांच्या कल्याणार्थ श्रम करण्याकरितां ईश्वरानें आपणांस दीर्घायु करावें, अशी मी इच्छा करितें.

लीप्सिक.　　　　　　　　　　　　कॅरोलिन के.

## नंबर ५४. अपस्मार—फेंपरें.

लीप्सिक येथील चिकित्सालयाचे मालक मि० लुई डा० कुन्हे यांनीं गोल या मुलाचा अपस्मार हा रोग पूर्णपणें बरा केला आहे, याबद्दल खालीं सही करणार खात्रीपूर्वक कळवितात.

या मुलास दिवसांतून कित्येक वेळां अपस्माराचे झटके येत असत, व त्यावरून त्याचा मेंदू अगदीं बिघडून गेला आहे, असें लोकांस वाटूं लागलें होतें. परंतु डा० कुन्हे यांनीं हा रोग बरा केल्यापासून त्या मुलास आज-

पर्यंत एकदां देखील अपस्माराचा झटका आला नाहीं, व त्या मुलाचे अंगावर निरोगीपणाची कांति आली आहे.

शिवाय डा० कुन्हे यांची तशी इच्छा नसली, तरी मला हेंही येथें मुद्दाम सांगितलें पाहिजे कीं, या मुलाचा विकार पूर्णपणें जाण्यास जरी चाराहून अधिक महिने लागले, तरी डा० कुन्हे यांनीं त्यापासून फी देखील घेतली नाहीं; इतकेंच नव्हे, तर त्या मुलाच्या गरीब आईस तिला आपल्या पोट भरण्याचा धंदा सोडून मुलाची शुश्रूषा करितां यावी ह्मणून पैशानेंही साहाय्य केलें. ही गोष्ट या वेळपर्यंत खालीं सही करणार व गोल या मुलाची आई यांवांचून इतर कोणासही माहीत नाहीं.

जो गृहस्थ याप्रमाणें आपल्या पदरास झीज लावून रोग्यास उपचार करतो, त्यापासूनच रोग्यांचें खरें कल्याण होईल.

लीप्सिक. ई. एच.

## नंबर ५५. पाठीचा कणा वांकणें, ज्ञानतंतूसंबंधीं रोग.

डा० कुन्हे महाराज,

आपल्या उपायांपासून मला व माझ्या मुलाला जो गुण आला, त्यापासून मला जो आनंद झाला आहे, तो मोठ्या खुषीनें मी आपणांस कळवीत आहें. माझ्या ज्ञानतंतूस कांहीं विकार झाला होता, व माझ्या मुलाच्या पाठीचा कणा वांकला होता.

सहा महिन्यांच्या अनुभवावरून आपल्या उपायांवर आमची श्रद्धा बसल्यामुळें ते आह्मीं चालू ठेवले आहेत. मला कोणींही व केव्हांही विचारलें, तरी वर लिहिल्याप्रमाणें मी बिनदिक्कत उत्तर देईन.

या लेखाचा आपणांस वाटेल तो उपयोग आपण करून घ्यावा.

वीमर. बी. ॲडमिरल (आरमारावरील मुख्य अधिकारी).

## नंबर ५६. इनफ्ल्युएंझा, मेंदू बिघडणें, भ्रांति, चित्तक्षोभ, निद्रानाश.

डा० कुन्हे महाराज—

माझे पति आजारी असतांना आपण जें साहाय्य केलें, त्या योगानें मी

आपली ऋणी झालें आहे, व आपल्या उपायांपासून जो उत्तम गुण आला आहे, त्याबद्दल माहिती आपणांस कळविणें हें माझें कर्तव्यकर्म आहे.

१८९३ च्या डिसेंबर महिन्याच्या मध्याच्या सुमारास माझे यजमान इन्फ्लुएंझा या विकारानें आजारी पडले. त्यावेळीं त्यांना वायुही झाला होता, व त्यांची अत्यवस्था होईल अशी भीति वाटत होती त्यांना ज्या डाक्टराचें औषध चालू होतें, त्यानें आपले सर्व उपाय खुंटले आहेत ह्मणून सांगितलें यानंतर कांहीं मित्रांच्या सांगण्यावरून आपले उपाय सुरू केले.

आपल्या सांगण्याप्रमाणें दोनदां स्नान केल्यावर त्यांना चांगली झोंप आली. व चार दिवस उपाय केल्यावर मेंदु अगदीं साफ झाला व पूर्ण शुद्धि आली. आपल्या उपायांच्या उपयुक्ततेसंबंधानें माझें मन पूर्वी साशंक असे, परंतु आतां मला कबूल केलें पाहिजे कीं, आपल्या उपायांपासून अद्भुत विलक्षण गुण येतो. आपण त्यांचे प्राण वांचविले आहेत असें माझे यजमान समजतात. व मजप्रमाणेंच त्यांचीही आपणांसंबंधानें व आपल्या चिकित्सापद्धतीसंबंधानें आदरबुद्धि आहे.—

ड्रेसडन. कोथिल्ड डब्ल्यू.

### नंबर ५७. दमा, मूळव्याध, घसा सुजणें, इत्यादि विकार.

कुन्हे महाराज—

माझ्या कुटुंबानें **उपविश्यस्नानांचा** दर दिवसांतून तीन वेळां याप्रमाणें सहा महिने प्रयोग केला; व त्याचप्रमाणें आळीपाळीनें **कुक्षिस्नान व बाष्पस्नान** यांचाही उपयोग केला आहे. बिन चाळलेल्या पिठाची भाकर, फळें व मधून मधून भाजीपाला यांवांचून दुसरे पदार्थ क्वचितच तिच्या खाण्यांत येतात. आपले उपाय चालू केल्यावर कांहीं दिवसांनीं जननेंद्रियाजवळच्या भागांत फोड उत्पन्न झाले, व त्यांमधून बराच पूं वाहिला. त्याचप्रमाणें पोटावर एक मोठा फोड येऊन त्यांतून बरेंच दुर्गंधीयुक्त पाणी वाहून गेलें आहे. सध्यां दमा व मूळव्याध हे रोग जवळ जवळ अ-

गर्दी नाहींसे झाले आहेत. आतां तिला चालण्यापासून विशेष त्रास होत नाहीं. तिच्या कांतींत व चर्येतही बराच फरक पडला आहे व ती जें अन्न खाते तें तिच्या अंगीं लागतें. आपल्या उपायांवर माझी चांगली श्रद्धा आहे, व या उपायांपासून गुण सावकाश येतो खरा, पण तो कायमचा येतो असें जें ह्मणतात, त्याविषयीं मलाही अनुभव आला आहे. त्याचप्रमाणें हे उपचार चालू असतां, पूर्वी शरीरांत दबलेले रोग फिरून उद्भवतात. परंतु ते लवकर बरे होतात, असेंही माझ्या प्रत्ययास आलें आहे.

माझ्या ३।४ वर्षांच्या मुलाचा घसा सुजला होता, तेव्हां त्यास मीं उपविश्यस्नान व बाष्पस्नान हे उपाय केले व त्यांपासून त्यास उत्तम गुण आला. आपली चिकित्सापद्धति हीच फक्त खरी चिकित्सापद्धति आहे, याविषयीं माझी पूर्ण खात्री झाली आहे.

आपला कृतज्ञ मित्र,

हॉमर्स डॉर्फ. पी. एल. शाळामास्तर.

## नंबर ५८. गर्भाशयांतील गांठ, धुपणी.

एके दिवशीं एम येथील मिसेस एच या बाई डा. कुन्हे यांच्याकडे येऊन ह्मणाल्या, " आज कित्येक वर्षें मी व्याधीनें पीडलेली आहें. मीं जेव्हां डाक्टरास प्रकृति दाखविली, तेव्हां त्यांनीं सांगितलें कीं, ' तुमच्या गर्भाशयांत एक गांठ उत्पन्न झाली आहे व ती हळुहळू वाढत आहे. आणि या विकारावर शस्त्रप्रयोग करणें आवश्यक आहे. ' शस्त्रप्रयोग सहन करण्याची माझ्या अंगांत शक्ति नसल्यामुळें, जर या रोगापासून आपणास मरण येणार असेल, तर शस्त्रप्रयोगाचे हाल तरी कां सोसावे ' असा विचार करून मीं आपले उपाय माझ्या एका नातेवाईकांच्या सांगण्यावरहुकूम सुरू केले. लागलींच दुसऱ्या दिवसापासून पोटांतील मळाचा खडा मोडून शौचास साफ व पुष्कळ होऊं लागलें. त्याचप्रमाणें मला पूर्वीपेक्षां तिप्पट किंवा चौपट वेळां जास्त पाय धुण्यास ( मोरीवर ) जावें लागूं लागलें. यावेळीं शरीरांतून इतकें मळमूत्र

पडत होत कीं, त्यावरून शरीरांतील दोषिक द्रव्याचा निकाल होत होता, असें दिसत होतें. दिवसेंदिवस पोट झडूं लागलें. शिवाय रोज रात्रीं खूप घाम येत असे, व एकंदरींत दिवसेंदिवस माझ्या अंगांतील हुषारी व ताकद वाढत चालली होती. परंतु मला विशेष आश्चर्य वाटण्यास असें कारण झालें कीं, प्रत्येक **उपविश्यस्नाना**नंतर मला पांढरा स्राव होत असे. अशा प्रकारचा स्राव मला त्यापूर्वीं कधींही झाला नव्हता. हा स्राव दिवसांतून एकदां किंवा दोनदां याप्रमाणें सुमारें चार आठवडेपर्यंत होत होता. पुढें कांहीं दिवस **उपविश्यस्नान** व **पथ्याहार** केल्यानें माझी प्रकृति सर्व विकारांतून मुक्त झाली आहे. ''

**नंबर ५९. पाय आंखूड असल्यामुळें आलेला लंगडेपणा.**

**मिसेस एच.** या डा० कुन्हे यांस पाठविलेल्या एका आभारप्रदर्शक पत्रांत लिहितात.

'' माझ्या **एलसा** नांवाच्या साडेचार वर्षांच्या मुलीच्या ढुंगणाजवळच्या भागास कांहीं विकार झाला. त्यास डॉक्टरी उपाय केले, परंतु तो पाय शेवटीं आंखडून जाऊन तो दुसऱ्या पायापेक्षां लहान झाला. त्यामुळें त्या मुलीस चालतां येईना. त्यानंतर त्या मुलीच्या पायास कांहीं नामांकित डॉक्टरांकडून उपाय करविले, परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं. त्यानंतर माझ्या **एलसास** आपल्या शुश्रूषेखालीं ठेवलें. आश्चर्याची गोष्ट ही कीं, तीन वेळां स्नान केल्यावर **एलसाचें** पूर्वीचें सर्व औदासीन्य निघून गेलें व तिला आपल्या पायावर उभें राहतां येऊं लागलें; तीन दिवसांनीं तिला चालतां येऊं लागलें, व एका पंधरवड्यांत तिची प्रकृति इतकी सुधारली कीं, कोणाच्याही साहाय्यावांचून रस्त्यापासून चार जिने चढून ती माझ्या राहण्याच्या जागेंत येऊं लागली. आज तीन महिन्यांनंतर तिच्या पायाचा सर्व विकार पूर्णपणें बरा झाला आहे. तिचे दोन्ही पाय आतां अगदीं सारख्या लांबीचे झाले आहेत, व तिला दोन्ही पायांनीं अगदीं साफ चालतां येतें.

**लीप्सिक.** **मिसेस् मिना एच.**

## नंबर ६०. संधिवात, मलावष्टंभ, मूळव्याध, टायफस् ज्वर, गर्भाशयभ्रंश, डांग्या खोकला, शेंदऱ्या ताप.

महाराज,

१८९१ सालीं मला आपलें ‘ नवीन चिकित्साशास्त्र ’ या पुस्तकाच्या दुसऱ्या आवृत्तीची एक प्रत मला मिळाली. या पुस्तकाच्या वाचनापासून माझा इतका फायदा झाला आहे कीं, आपणांस मीं कृतज्ञताबुद्धिप्रदर्शक पत्र पाठविणें हें माझें मुख्य कर्तव्यकर्म आहे असें मला आज पुष्कळ दिवस वाटत आहे.

मीं आपलें पुस्तक वाचलें, तेव्हां माझें वय ५२ वर्षांचें होतें. त्या वेळीं माझ्या पूर्वींच्या अनियमित वर्तनामुळें मला संधिवात हा विकार जडला होता व त्याचप्रमाणें माझें मज्जामंडळही अगदीं निर्बळ होऊन गेलें होतें. आपले उपाय केल्यानें माझी प्रकृति आतां अगदीं रोगमुक्त झाली आहे. माझी वृत्ति पूर्वीं स्वाभाविकपणें तामसी असे, परंतु आपले उपाय केल्यापासून मजमध्यें बराच शांतपणा आला आहे. माझ्या वृत्तीमध्यें फरक पडल्यामुळें आमचें दांपत्यसुख वाढलें आहे. व आमच्या घरामध्यें पूर्ण शांतता वास करूं लागली आहे.

पूर्वीं माझ्या कुटुंबास गर्भाशयभ्रंश हा विकार झाला असतां त्यावर आह्मीं दीड वर्षपर्यंत डॉक्टरी उपाय केले, परंतु त्यांनीं कांहीं गुण वाटला नाहीं. नंतर तिनें दिवसांतून तीन वेळां उपविश्यस्नानें व इतर पथ्य आहारविहार करण्याचा क्रम चालू केला. त्या योगानें तिचा वरील विकार जाऊन शिवाय पूर्वीं असलेले तिचे मूळव्याध व मलावष्टंभ हे विकारही नाहींसे झाले. त्यानंतर ती प्रसूत होऊन तिला जो मुलगा झाला, त्याचें संगोपन आह्मीं आपल्या तत्त्वाप्रमाणें केलें, त्यामुळें हा मुलगा त्याच्या वयाच्या इतर पुष्कळ मुलांपेक्षां फारच निरोगी व आनंदी झाला आहे. त्याचा आहार पाहिला, तर तो इतर मुलांना जें अन्न विनाकारण कोंबून भरवितात, त्याचा तिसरा हिस्सा आहे.

बाळंतपणांतील ताप, स्तनास विद्रधि होणें वगैरे विकार माझ्या कुटुंबास मुळींच झाले नाहींत. ( हें सर्व आपल्या उपायांचें फल आहे.)

माझ्या ४।९ वर्षांच्या सहावा मुलगा शेंदऱ्या तापानें आजारी असतां त्यास तीन दिवस वायु झाला होता. त्याचा ताप बराच भडकला कीं, आह्मी त्यास १९ मिनिटांचें **कुक्षिस्नान** घालीत होतों, व त्या योगानें त्याचा वायु उतरून त्यास शुद्ध येत असे. तापाच्या अगदीं कहराच्या दिवशीं आह्मीं त्यास पांच **कुक्षिस्नानें** घातलीं; व पुढील रात्रीं दोन घातलीं. दुसऱ्या दिवशीं सकाळीं वायु उतरला, व प्रकृति लवकर बरी होत चालली. तापाच्या प्रारंभीं त्या मुलास ऊन पाण्याच्या बाटल्यांनीं शेकून आह्मीं घाम आणविला. पुढें त्या मुलास डांग्या खोकला झाला, परंतु प्रत्येक स्नान पंधरा पंधरा मिनिटांपर्यंत याप्रमाणें दिवसांतून दोन वेळां **कुक्षिस्नान** कांहीं दिवस घातल्यानें तो खोकलाही पार निघून गेला.

वरील प्रसंगीं मी डॉक्टराकडे गेलों असतों, तर मला पुष्कळ खर्च पडला असता, व शिवाय गुण आला असता किंवा नाहीं याची शंकाच आहे आपलें सदैव कल्याण व्हावें अशी मी इच्छा करितों.

आपला,

**एल्बर फील्ड.** **बी. एच.**

## नंबर ६१. मूतखडा.

**डा० कुन्हे महाराजः—**

आपल्या उपायानें मला जो अद्भुत गुण आला त्याची हकीगत मी आपणांस कळवीत आहें. मला मूतखडा हा विकार झाला होता, व त्यावर मीं आपले उपाय सुरू केले. लागोपाठ दोन दिवस सकाळीं मला लघवी करतांना बराच त्रास झाला, व ढुंगणाच्या डाव्या बाजूमध्यें बराच वेळपर्यंत कळा निघत होत्या. दुसरे दिवशीं तिसरे प्रहरीं लघवी करतांना लघवीवाटें एक लहानसा खडा पडला, व पुढें बरेच दिवसपर्यंत गढूळ लघवी होऊं लागली. यावरून आपण आपल्या पुस्तकांत जें लिहिलें आहे कीं,

या उपायांनीं मूतखडा विरघळून त्याचे कण लघवीबरोबर बाहेर पडतात, त्याचा अनुभव मला आला.

आपला.

ब्रेडस्टेड. ए.

## नंबर ६२. फार दिवसांचा मलावष्टंभ विकार, मूळव्याध.

डा० कुन्हे महाराजः--

मला आपणांस कळविण्यास अत्यानंद वाटतो कीं, जो माझा मलावष्टंभाचा विकार आज चाळीस वर्षें अनेक उपाय करून गेला नाहीं, तो आपण आपल्या पत्रांत लिहिलेले उपाय केल्यावर पूर्णपणें नाहींसा झाला आहे. सध्यां मला दिवसांतून दोन वेळां चांगली मलशुद्धि होते, व मूळ पूर्वीं शौचास साफ होत नसे, तेव्हां जो मूळव्याधीचा रोग मला झाला होता, तो आतां कमी होत चालला आहे.

त्याचप्रमाणें, माझें यकृत् वाढलें होतें तें, व माझ्या पोटाच्या उजव्या भागांत कळ करीत असे ती, हे दोन्ही विकार बंद झाले आहेत. आपल्या उपायांचा फायदा मला प्रत्यहीं दिसून येत आहे. कारण जे विकार आज चाळीस वर्षें होमिओपॉथिक व ॲलोपॅथिक औषधांनीं बरे झाले नाहींत, ते आपल्या औषधांनीं बरे झाले आहेत.

आपला.

ऐब्लिग. एफ. सी. कॅपटन्.

## नंबर ६३. ज्ञानतंतूंची अशक्तता, दाढ दुखणें, डोकेंदुखी, निद्रानाश व घसा बसणें.

डा० कुन्हे महाराजः--

आपल्या चिकित्साशास्त्राची माहिती मला प्रथम १८८७ सालीं झाली, व त्याच्या सहाय्यानें मीं आपल्या मज्जातंतूंची अशक्तता हा विकार घालविला. त्यानंतर आपल्या उपायांचा अनुभव घेण्यास पुष्कळ प्रसंग मला

आले, व त्या सर्व प्रसंगीं आपल्या उपायांच्या उपयुक्ततेचा अनुभव मला आला आहे, कांहीं दिवसांपूर्वी माझ्या दाढेंत भयंकर ठणका उत्पन्न झाला. दाढ इतकी सुजून गेली होती कीं, तोंडाचा उजवा भाग सुजलेला स्पष्ट दिसून येत होता. प्रथम मीं **उपविश्यस्नानें** केलीं व त्या योगानें ठणका कांहीं कमी पडला, परंतु विशेष फायदा झाला नाहीं. पुढें आपल्या सांगण्याप्रमाणें **बाष्पस्नान** करून त्यानंतर **उपविश्यस्नान** केल्यावर क्षुभित ज्ञानतंतु शांत झाले, व दाढेचा ठणका बंद पडला. आलीकडे डोकें दुखणें, डोळे ठणकणें या विकारांवर मी **बाष्पस्नानाचा** उपयोग करितों, व त्यापासून चांगला फायदा होतो, असें माझ्या अनुभवास आलें आहे.

पुढील हकीकत वाचून आपल्यास अतिशय आश्चर्य वाटेल. कांहीं दिवसांपूर्वी मला थंडी झाली व त्यायोगानें माझा घसा बसून अगदीं घोगरा झाला. तिसऱ्या दिवशीं सकाळीं ८॥ वाजतां मीं **उपविश्यस्नान** केलें. त्या स्नानापासून मला इतका फायदा वाटला कीं, पातेल्यांतील पाणी ऊन होईतोंपर्यंत मीं **मार्जनविधि** चालविला व पाहिलें पाणी ओतून टाकून नवीन पाणी घेतलें. याप्रमाणें दोनवेळां पाणी बदललें. या रीतीनें २॥ तासपर्यंत स्नान केल्यावर माझा बसलेला घसा एकदम इतका सुधारला कीं, मला लागलींच अतिशयच मोठ्या सुरांत गातां आलें.

वरील हकीकत वाचून कित्येक लोकांचा फायदा होण्याचा संभव आहे, यास्तव या लेखाचा वाटेल तो योग्य उपयोग करण्याचा पूर्ण अधिकार मीं आपणांस दिला आहे.

आपला

**लिप्सिक.** **कार्ल. एल.**

**नंबर ६४. कान वाहणें व ठणकणें, ताप.**

**डॉ० कुन्हे** महाराजः--

आपण पत्रांत लिहिल्याप्रमाणें उपाय केल्यावर तीन आठवड्यांत माझा ज्वर व फार दिवसांचे कानांतून पू वाहणें--व कान ठणकणें, हे विकार नाहीं-

से झाले. आपण मला जें साहाय्य केलें त्याबद्दल मी आपल्या परवानगीनें आपले मनःपूर्वक आभार मानतों.

**पेर्दो कॅवेलो.** **कार्लो एल्, बी.**

**व्हेनेझुएला, दक्षिण अमेरिका.**

**नंबर ६५. यकृतामध्यें दुखणें, उन्माद.**

**डॉ० कुन्हे महाराजः—**

माझ्या यकृतामध्यें कित्येक दिवस दुखत होतें. त्यानंतर कित्येक दिवस मला कारणावांचून एकाएकी रडूं येत असे, व त्यापासून मनास फार त्रास होत असे. परंतु आपले उपाय केल्यानें माझ्या प्रकृतींमधील वरील विकार नाहींसे झाले. आज वीस वर्षांमध्यें मीं तीस डाक्टरांचा निरनिराळ्या वेळीं सल्ला घेतला. या डाक्टरांच्या पायीं जो पैसा मी व्यर्थ घालविला, तो खर्च झाला नसता तर माझ्याजवळ बरीच मोठी रक्कम शिल्लक राहिली असती.

**बिलफिल.** **एम्. एच्.**

**नंबर ६६. घटसर्प, मलावष्टंभ. पाठींतील कळा, वेळेवर विटाळ न होणें, डोकें दुखणें, डोळे दुखणें, हे विकार.**

**डॉ० कुन्हे महाराज,**

गेल्या पावसाळ्यांत माझ्या मुलास घटसर्प हा रोग झाला होता, तो मीं केवळ आपले उपाय करून बरा केला. डाक्टरानें दिलेल्या औषधास मीं बेलाशक मोरी दाखविली. मला पूर्वीं मलावष्टंभ, विटाळ वेळेवर न होणें, पाठींत कळा करणें, मस्तक दुखणें, डोळे ठणकणें, हे विकार होते. परंतु आपल्या उपायांनीं ते सर्व बरे झाले आहेत. आपण आपल्या पुस्तकांत लिहिल्याप्रमाणेंच पहिल्या स्नानानेंच मला चांगली मलशुद्धि झाली. केवळ आकस्मिक कारणानें मला आपलें पुस्तक वाचावयास मिळालें. याबद्दल मी ईश्वराची फार आभारी आहें.

**सीले.** **मिसेस. ई. एच.**

## नंबर ६७. अपस्मार.

डॉ० कुन्हे महाराज,–

आपल्या उपायांनीं माझ्या मुलास तात्काळ गुण आला याबद्दल आपणां-संबंधानें माझी कृतज्ञताबुद्धि प्रदर्शित करणें, माझें कर्तव्यकर्म आहे असें मी समजतें. माझ्या मुलास अपस्मार झाला होता. त्यावर आमच्या डाक्टराचे सर्व उपाय थकल्यावर त्यानें मला प्रोफेसर यांना प्रकृति दाखविण्यास सांगितलें. आम्हीं आपल्या सांगण्याप्रमाणें स्नानें व पथ्याहार घालतांच मुलाची प्रकृति सुधारत चालली. एका आठवड्यांत त्या अशक्त मुलाचा मेंदु इतका सुधारला, कीं त्यास आपले शाळेंतील धडे तयार करण्याचें सामर्थ्य आलें.

आपला,

शीनफील्ड. फ्रॅन्स अॅटन. बी.

## नंबर ६८. पृष्ठवंशस्थ मज्जारज्जूचा दाह, ज्ञानतंतूची अशक्तता.

डॉ० कुन्हे महाराज,–

माझें वय सध्यां २८ वर्षांचें आहे. मला पृष्ठवंशस्थ मज्जातंतूचा दाह व ज्ञानतंतूची अशक्तता हे विकार फार दिवस असल्यामुळें मला चालण्याची किंवा वसण्याचीही शक्ति राहिली नव्हती. शेवटीं माझे विकार असाध्य आहेत असेंही मला डाक्टरांनीं सांगितलें. परंतु आपले उपाय ३ महिने केल्यावर माझी प्रकृति इतकी सुधारली का, मला काठीवांचून हिंडतां फिरतां येऊं लागलें. आणि आज तर एक तासाहून अधिक वेळपर्यंत काठीवांचून हिंडण्याची ताकद माझ्या अंगांत आली आहे, याबद्दल मी आपले अत्यंत आभार मानतों.

आपला

बर्केस् डार्फ. गस्टव्ह एस.

## नंबर ६९. जठरदाह, यकृत्, पांथरी, मूत्राशयविकार व मलावष्टंभ.

डा. कुन्हे महाराज,

आपण सांगितल्याप्रमाणें कुक्षिस्नान व इतर पथ्य केल्यानें माझे खालीं

लिहिलेले विकार बरे झाले आहेत. कित्येक दिवसपर्यंत मी जठरदाह या रोगानें आजारी होतों. पुढें हा रोग जठरव्रणावर जाईल, अशी भीति वाटूं लागली. याशिवाय मला यकृतासंबंधीं कांहीं विकार, पांथरी, मूत्रपिंड व मूत्राशय यांसंबंधी कांहीं विकार व मलावष्टंभ या व्याधि होत्याच. मोठमोठाल्या प्रोफेसरांच्या औषधांनींही माझा मलावष्टंभ हा विकार नाहींसा झाला नाहीं, मग इतर विकारांची गोष्ट कशाला. परंतु आपले उपाय सुरू केल्यापासून माझी प्रकृति चांगली झाली आहे, याबद्दल मी आपले अत्यंत आभार मानतों.

आपला,

टेटशेन् डब्ल्यु. ए.

कस्टमहाऊसवरील एक अधिकारी.

## नंबर ७०. क्षय.

डा. कुन्हे महाराज--

माझें मूल बऱ्याच विकोपास गेलेल्या क्षयानें आजारी होतें. त्याची प्रकृति बरी होणें अशक्य आहे, असें डाक्टरानें आपलें मत दिलें. त्यानंतर मीं आपल्या पुस्तकांत लिहिल्याप्रमाणें पथ्य आहार व अन्य उपाय मुलास केले. त्या योगानें तें मूल क्षयरोगांतून उठलें आहे. हें पाहून प्रत्येकास आश्चर्य वाटत आहे.

डलविग् स्लट मिसेस बी. ई.

## नंबर ७१. अंग भाजणें.

डा. कुन्हे महाराज–

माझा मुलगा ऑगस्ट याचा उजवा हात आधणाच्या पाण्यानें भाजला. त्यावर मीं आपल्या पुस्तकांत सांगितल्याप्रमाणें उपाय केला, व आश्चर्याची गोष्ट ही कीं, एका आठवड्यांत तो भाजलेला हात अगदीं बरा झाला व त्यावर भाजल्याचा कांहींएक वण राहिला नाहीं. कांहीं दिवसांपूर्वीं माझें अंग भाजलें होतें, त्यावेळीं मला आपले उपायांसंबंधानें माहिती नसल्यामुळें मीं

डाक्टराचा सल्ला घेतला. प्रत्यक्ष अनुभवावरून मला आतां असें कळून आलें आहे कीं, रात्र व दिवस यांमध्यें जितकें अंतर आहे, तितकें अंतर डाक्टराचे उपचार व आपले उपचार यांमध्यें आहे.

आपला,

टॅंजर्न हेनरी बी.

### नंबर ७२. पोटांतील विकार, छातींतील अशक्तता व फुफ्फुसाचा विकार.

" डा. कुन्हे यांच्या उपायांनीं मला आरोग्य प्राप्त झालें आहे, यास्तव जाहीर रीतीनें त्यांचे आभार मानणें हें माझें कर्तव्य आहे असें मी समजतों. चौदा वर्षेपर्यंत माझ्या पोटांत कांहींएक रोग होता. रेचकावांचून मला शौचास कधींही साफ होत नसे. व आलीकडे ४।५ वर्षे मला लघवी साफ होईनाशी झाली होती. त्याचप्रमाणें छाती फार अशक्त होती व मला फुफ्फुसदाह हा विकार होता. मीं फ्रीबर्ग, बर्न, व जिनीव्हा येथील पुष्कळ डाक्टरांचीं औषधें घेतलीं, परंतु कोणाच्याही औषधापासून मला गुण वाटला नाहीं. परंतु डा. कुन्हे यांनीं मला मुद्दाम सांगितल्याप्रमाणें उपाय केल्यावर माझी प्रकृति इतकी सुधारली आहे कीं, माझ्या हॉटेलसंबंधानें पत्रव्यवहार, हिशेब व सर्व अन्य प्रकारचे व्यवस्थेसंबंधाचें काम करण्याची शक्ति सध्यां माझ्या अंगांत आली आहे. "

श्वॉर्झीबाद स्विट्झरलंड. इ. डब्ल्यू. एस.

### नंबर ७३. कानांतून पू वाहणें, डोकें दुखणें, कानांतील व घशांतील गांठी.

डा० कुन्हे महाराज,—

माझ्या मुलाच्या कानास व घशास ७ वर्षेपर्यंत कांहीं विकार होता. त्यावर पुष्कळ उपाय केले, परंतु ते व्यर्थ गेले. नंतर पुढें या मुलाच्या नाकांत व कानांत गांठी उठल्या कांहीं. दिवसांनीं त्याच्या कानाच्या हाडांतून पू वाहूं लागला. या मुलास आपण मुद्दाम सांगितल्याप्रमाणें उपचार के-

ल्यावर पांच आठवड्यांनीं तो अगदीं बरा झाला. यास्तव आपणांस पत्रद्वारें माझे आभार कळविणें हें माझें कर्तव्यकर्म आहे असें मी समजतों. खरो-खर आपलें पुस्तक हा अत्यंत मूल्यवान ठेवा आहे, व तें प्रत्येकाच्या घरीं असणें ही अत्यंत आवश्यक गोष्ट आहे.

व्हॉलमॉर्शेन्. बर्नो एस्.

नंबर ७४. नेत्ररोग, तोंडावरील त्वचा उतूं येणें, घशासंबंधीं रोग, घटसर्प, गोंवर व शेंदऱ्या ताप.

डा० कुन्हे महाराज,--

आपले मजवर जे उपकार झाले आहेत, त्यांचें माझ्यानें शब्दानें वर्णन करवत नाहीं. लहानपणीं माझ्या डोळ्यास कांहीं विकार झाला होता, परंतु तो पुढें कांहीं दिवसांनीं मावळला, त्यावेळेपासून मला तोंडावरील त्वचे-वर पुरळ उठणें, घसा दुखणें, घटसर्प, गोंवर, शेंदऱ्या ताप वगैरे रोग दर-वर्षी होत असत, व ते इतके विकोपास जात कीं, त्यांतून मी जगेन किंवा नाहीं, याबद्दल शंका उत्पन्न होई. आपण आपल्या पत्रांत सांगितल्या-प्रमाणें उपाय केल्यानें माझी प्रकृति पुष्कळ सुधारली आहे. प्रत्येक प्रसंगीं मजकडून आपल्या उपायांची लोकांस शिफारस करण्यांत येते.

ओटिंगेन. लिना. एम.

नंबर ७५. व्रण झालेला गुडघा.

डा० कुन्हे महाराज,—

आपण मजवर जे उपकार केले आहेत त्याबद्दल आपले कोणत्या श-ब्दांनीं व कसे आभार मानावे हें मला समजत नाहीं.

पूर्वी माझ्या गुडघ्यास व्रण झाला असतां डाक्टरांनीं जे उपाय केले त्यां-ची आठवण होऊन माझ्या अंगावर शहारे उभे राहतात. थोडक्यां-त एवढेंच सांगतों कीं, पांच वर्षेपर्यंत डाक्टरांनीं उपाय करून शेवटीं शस्त्र-प्रयोगही केला. व तुमचा रोग बरा झाला आहे ह्मणून जरी मला त्या-नीं सांगितलें, तरी माझ्या प्रकृतीस स्वास्थ्य वाटत नव्हतें. डाक्टरांनीं मला

गुडघ्याभोंवतीं गुंडाळण्यास १० यार्ड लांब पट्टा दिला होता. हा पट्टा मी पांच वर्षेपर्यंत जरी वापरीत होतों, तरी शेवटीं माझा गुडघा फिरून सुजलाच व पूर्वीं ज्या ठिकाणीं शस्त्रप्रयोग केला होता, त्या ठिकाणीं गुडघ्यास भोंक पडलें. यानंतर आपले उपाय एक दिवस केल्यावर लागलीच पट्टयाची आवश्यकता नाहींशी झाली. कांहीं दिवसांनीं गुडघ्याची सूज उतरली व त्याचें भोंक लहान होतां होतां शेवटीं अगदीं भरून आलें.

मनुष्यांच्या कल्याणार्थ श्रम करण्याकरितां ईश्वर आपणास दीर्घायु करो, अशी मी इच्छा करितों.

आपला

झानो विट्झ — स्टीफन् एस्.

**नंबर ७६. पाठीच्या कण्याचा मणका सुजणें, सुलभप्रसूति.**

कुन्हे महाराज--

माझ्या कुटुंबाच्या पाठीच्या कण्याचा एक मणका सुजला होता. त्यावर उपाय केले, परंतु कांहीं फायदा झाला नाहीं. या ठिकाणीं विद्रधि उत्पन्न होइल असें त्या डाक्टरास वाटलें होतें, ह्मणून उपाय करण्याचें बंद केलें. त्यानंतर आपले पुस्तकांत लिहिल्याप्रमाणें तिनें उपाय केले. त्यानें तिचा विकार बरा होऊन ती कोणाच्याही मदतीवांचून हिंडूं फिरूं लागली. आह्मी दोघे-जण आपले अतिशय आभारी आहोंत. ईश्वर आपलें सदैव कल्याण करो.

झूरिच. — एम्. हॉन् एस्.

**नंबर ७७ क्षय.**

डा० कुन्हे महाराज,-

दोन वर्षांपूर्वीं मला आपलें पुस्तक मिळालें, व त्यांत सांगितल्याप्रमाणें उपाय केल्यानें माझा क्षयरोग बरा झाला आहे. याबद्दल जीवांत जीव राहीतोंपर्यंत मी आपला ऋणी राहीन.

आपला,

ऑवरस्टिनॅक, बव्हेरिया. — जोसेफ एच.

**नंबर ७८. जलोदर, सुजलेले हातपाय, मस्तक दुखणें, मलावरोध.**

महाराज,

माझ्या कुटुंबास लहानपणापासून मलावष्टंभ व डोकें दुखणें हे विकार होते. आज तिला २२ वें वर्ष आहे व आजपर्यंत तिनें जरी पुष्कळ औषधें घेतलीं आहेत, तरी त्यांपासून तिला कांहींएक फायदा झाला नाहीं. आपले उपाय केल्यापासून हे सर्व विकार व शिवाय अलीकडे झालेलें जलोदर व सुजलेले पाय हेहीं विकार बरे झाले आहेत. मला स्वतः शौचास साफ होत नसे, त्यावर आपले उपाय केल्यानें मलाही गुण आला आहे.

आपला,

**बालकेनहेन सायलेशिया.** **कार्ले के.**

**नंबर ७९. यकृत्संबंधीं रोग, मलावष्टंभ.**

महाराज,

मिस्टर **बी.** या गृहस्थाच्या यकृतास अत्यंत दुर्धर विकार झाला होता, व त्यास आपले उपाय केल्यानें तो विकार बरा झाला आहे, हें पाहून येथील सर्व मित्रमंडळीस अत्यंत चमत्कार वाटत आहे. मला स्वतः पुष्कळ दिवस मलशुद्धि साफ होत नसे, ती आपले उपाय केल्यामुळें होऊं लागली आहे.

आपली चिकित्सापद्धति काय आहे, याविषयीं माहिती विचारण्याकरितां आह्मांकडे पुष्कळ लोक येतात. यास्तव आपल्या नवीन चिकित्साशास्त्रसंबंधानें **डॅनिश** व **स्वीडिश** भाषांमध्यें लिहिलेलीं हस्तपत्रकें पाठवावींत ह्मणजे मी तीं **नार्वे, स्वीडन** व **डेन्मार्क** या देशांत वांटीन. या योगानें लोकांमध्यें आपणांविषयीं विश्वास उत्पन्न करण्यास व आपल्या पुस्तकांचा प्रसार करण्यास मला सोपें जाईल.

**मॉडुपगार्ड डेन्मार्क.** **मिसेस् एच. बी.**

**नंबर ८०. जलोदर, प्ल्युरिसि, कफक्षय, फुफ्फुसक्षय.**

**कुन्हे** महाराज,

दोन वर्षें मी प्ल्युरिसि या रोगानें आजारी पडून अंथरुणास खि-

ळल होतें; त्यानंतर मला जलोदर झालें. डाक्टरांनीं माझे विकार बरे करण्याकरितां अनेक उपाय केले, परंतु ते निष्फळ झाले. शेवटीं मला सर्व डाक्टरांचा अगदीं तिटकारा व कंटाळा वाटूं लागला. आज मी जी बरी झालें आहे, ती केवळ आपल्या उपायांमुळेंच आहे मला आरोग्य प्राप्त झाल्यावर मी आपले फिरून मनापासून आभार मानतें.

**बिंझिकॉन् स्विट्झरलंड्.** **मिस ऐडा एस.**

## नंबर ८१. भगंदर व आंत्रव्रण.

महाराज,

आपले पत्रांत लिहिल्याप्रमाणें उपाय केल्यानें माझे भगंदर व आंत्रव्रण हे विकार बरे झाले आहेत, हें कळविण्यास मला फार आनंद वाटतो. मी रोज दोन किंवा तीन वेळां **मार्जनविधि** करीत असें, व आपण सांगितल्याप्रमाणें पथ्य आहार करीत असें.

आपल्या उत्कृष्ट ग्रंथांचा पुष्कळ प्रसार होवो अशी माझी इच्छा आहे.

**होल्द्-डेन्मार्क.** **जूलिया एल्.**

## नंबर ८२. वीर्यपात करण्याची संवय.

**कुन्हे** यांनीं मजवर जे उपकार केले आहेत, त्यांबद्दल मी त्यांचा अत्यंत ऋणी आहें. माझ्या मुलास जननेंद्रिय हाताळण्याची संवय होती. त्याबद्दल त्यास पुष्कळ वेळां धाक दाखवून व मार देऊनही पाहिलें, परंतु उपयोग झाला नाहीं. शेवटीं **मार्जनविधि** व पथ्य आहार या योगानें त्या मुलाची ती संवय अगदीं निघून गेली आहे. सर्व लोकांपुढें **कुन्हे** यांच्या उपायांची शिफारस मजकडून नेहमीं करण्यांत येते.

**लीप्सिक,** **एच. एस.**

## नंबर ८३. जलोदर, जुनाट दमा.

**महाराज,—**

तीन वर्षे मला जलोदर व दमा हे रोग होते. मीं आजपर्यंत पुष्कळ डाक्टरांचे व विशेषतः **क्राको** येथील प्रसिद्ध प्रोफेसर **एच.** यांचेही उपाय

केले, परंतु गुण आला नाहीं. आपले उपाय मीं सहा महिने केले व त्या योगानें माझा दुर्धर व्याधि बरा झाला आहे. याबद्दल मी मनापासून आपले आभार मानतों.

झेसझो, ग्लालिशिया.

एम्. ए.

कारकून जिल्हा कोर्ट आफिस.

## नंबर ८४. संधिवात, काळजासंबंधीं विकार, गर्भाशयास झालेला व्रण, मूळव्याध, अपचन, पाठींत व कुशींत कळा करणें हे विकार.

कुन्हे महाराज,—

जिचे सभासद ३०० हून अधिक आहेत, अशा येथील कुन्हे सोसायटीचा अध्यक्ष या नात्यानें, व विशेषतः आपल्या अलौकिक बुद्धिमत्तेबद्दल माझी पूज्यबुद्धि असल्यामुळें, आपल्या उपायानें मरणोन्मुख रोगीही कसे निरोगी बनले आहेत, याविषयींची आपणांस हकीकत कळविणें, हें माझें कर्तव्य-कर्म आहे, असें मी समजतों. एका रोग्यास संधिवात होऊन तो काळिजापर्यंत जाऊन भिडला होता. परंतु आपल्या उपायानें तो बरा झाला आहे. त्याचप्रमाणें एका स्त्रीच्या गर्भाशयास व्रण झाला होता. त्यावर तिनें दहा प्रसिद्ध डाक्टरांचीं औषधें घेतलीं. परंतु त्यांपासून काहीं उपयोग झाला नाहीं. या डाक्टरांमध्यें येथील दवाखान्यावरील एक मुख्य डाक्टर होता. या डाक्टरानें त्या स्त्रीवर शस्त्रप्रयोग करून पोट फाडलें, व पुढें तो प्रयोग सहन करण्याची शक्ति त्या स्त्रीच्या अंगांत नाहीं, म्हणून तो प्रयोग शेवटास नेला नाहीं. या स्त्रीचा विकार इतका विकोपास गेला होता कीं, ती पुढें फार झालें तर तीन महिन्यांहून जास्त दिवस वांचणार नाहीं, असें डाक्टरांचें मत पडलें. आपले उपाय या स्त्रीस केल्यानें तिचा विकार नाहींसा झाला आहे व आज सहा महिने झाले तरी ती अद्याप जिवंत आहे. मला स्वतःस मूळव्याध व अपचन हे विकार होते व या विकारांमुळें माझ्या पाठींत व कुशींत कळा करीत असत. परंतु एक वर्षभर आपले उपाय केल्यानें माझे

वरील विकार बहुतेक जात चालले आहेत. या सर्व गोष्टींबद्दल मी आले अत्यंत आभार मानतों.

ब्यूनॉसैरीज, दक्षिण अमेरिका,

व्हिन्सेंट डी.

कुन्हे नेचरक्युअर संस्थेचा अध्यक्ष.

## नंबर ८५. नेत्ररोग.

डा० कुन्हे महाराजः—

माझ्या मुलाचे डोळ्यास विकार झाला असतां माझ्या विनंतीवरून आपण पत्रद्वारें मला जो सल्ला दिलात, त्याप्रमाणें तीन आठवडेपर्यंत उपाय केल्यानें माझ्या मुलाच्या डोळ्याचा विकार बहुतेक नाहींसा झाला, व आणखी एक आठवडाभर उपाय केल्यावर तो साफ बरा झाला जो विकार डाक्टरांच्यानें तीन वर्षांत बरा करवला नाहीं, तो आपल्या उपायांनीं फक्त चार आठवड्यांत बरा झाला. आपले आह्मवांर फार उपकार आहेत.

रेमशी हास्टन. जी. एफ्.

## नंबर ८६. मूत्रमार्गाचा संकोच.

महाराज,

आपण पत्रांत लिहिलेल्या माहितीप्रमाणें उपाय केल्यानें मला आरोग्य प्राप्त झाले आहे, हें आपणांस कळविण्यास मला आनंद वाटतो.

आपले उपाय चालू केल्यावर दुसऱ्या आठवड्यामध्यें मूत्रमार्गाचा दाह व सूज बंद झाली, व त्याबरोबर लघवी साफ होऊं लागली. मला आतां लघवी पूर्वीपेक्षांही जास्त साफ होते. याबद्दल मी आपले मनापासून आभार मानतों. ईश्वर आपलें कल्याण करो, व आपल्या चिकित्सापद्धतीचा सर्व जगभर प्रसार होवो.

आपला.

जे. एच.

अल्ट्सोहोल हंगेरी. कारखान्याचा मालक.

## नंबर ८७. सार्वजनिक रीतीनें मानलेले आभार

डा० कुन्हे यांच्या चिकित्सापद्धतीनें मला जो विलक्षण गुण आला आहे, त्याबद्दल, **लीप्सिक** हें शहर सोडण्यापूर्वी, डा० कुन्हे यांचे आपण होऊन आभार मानणें, हें एक अत्यावश्यक कार्य आहे असें मी समजतों.

माझें वय सध्यां ६६ वर्षांचें आहे. मला आज पुष्कळ दिवस मधुमेहाचा विकार झाला होता. व त्यावर मीं अनेक डाक्टरांचे उपाय केले, पण ते सर्व निरर्थक झाले. पुढें **बार्मेन** येथील कांहीं मित्रांच्या सांगण्यावरून. मी **लीप्सिक** येथें आलें, व डा० कुन्हे यांच्या सांगण्याबरहुकूम उपाय चालू केले.

पंधरा दिवस उपाय केल्यावर मूत्रांतील साखरेचें प्रमाण १·८५ पासून १·१० पर्यंत उतरलें व आणखी एक आठवड्यानंतर साखर मुळींच बंद झाली. चार पांच आठवड्यानंतर मूत्राची अन्य ठिकाणीं परीक्षा करितां त्यांत साखरेचा कांहीं अंश नाहीं असें आढळून आलें. याविषयीं, **लीप्सिक लॉ कोर्टाकडे** जे डॉ. रोरिग, डॉ० एल्स्नर, डॉ. बॅक. व **डॉ. प्रेगर** आदिकरून* ॲनॅलिस्ट आहेत, त्यापैकीं प्रत्येकानें स्वतंत्ररीतीनें ( मूत्राची ) परीक्षा करून मत दिलें आहे.

माझ्या स्वतःच्या अनुभवावरून, व विशेषतः या ठिकाणचे व **बार्मेन** येथील माझ्या ओळखीचे बरेच लोक डा० कुन्हे यांनीं बरे केले आहेत, यास्तव, डा० कुन्हे यांच्या चिकित्सापद्धतीचें सर्वांनीं अवलंबन करावें, अशी कसलीही शंका मनांत न आणतां मी सर्व रोग्यांना शिफारस करितों.

**लीप्सिक** ८ आगष्ट १८९८ इ. एल. बी.

बार्मेन येथील कारखानदार.

## आह्मांस आलेलीं पत्रें.

आह्मी डा० कुन्हे यांचे तत्त्वानुसार बरेच रोग्यांवर उपचार करून, **नेत्रविकार, प्लेग, विषमज्वर, हिंवताप, कालरा, दांत दुखणें, गाळगुंड, सरदी, गर्भारपणांतील विकार, धुपणी, संधिवात, ताप, परमा,**

*पदार्थांचें पृथक्करण करून त्यामध्यें कोणकोणतीं द्रव्यें आहेत त्यांची परीक्षा करणारे लोक.

खर पडणें, मुळव्याध, गरमी, उन्हाळे, आदि रोगांवर गुण आले त्यां-
पैकीं कांहींजणांकडून आह्मांस पत्रें आले आहेत तीं:—

**नंबर ८८. तोंडांतील विकार, गालगुंड, गर्भारपणीं आलेली सूज.**

रा० रा० आपाजी विनायक जोशी यांसः—

सा० न० वि० वि० " मीं आपलें रोगी का निरोगी हें पुस्तक पाहि-
ल्यापासून जेव्हां कोणी रोगी ( मी ) वैद्य असल्यामुळें आपले ( वैद्यकाप्र-
माणें ) त्याचा रोग असाध्य वाटला ह्मणजे डा० कुन्हे यांचे प्रयोग केले
व यांपासून गुण आला त्यांपैकीं दोन रोग्यांची हकीकत येणेंप्रमाणें. रा. रा.
सुभराव मंजपा शानभोग वय वर्षे ३६ यांस सात आठ दिवसांपासून कांहीं
रोग होऊन सर्व दांत दुखूं लागले. तोंडही सुजलें व तोंडांत आंवळ्याएव्हढे
फोड उठून त्यास चैन पडेना, झोंप नाहीं, अन्न जाण्याची पंचाईत पडूं
लागली. आह्मीं औषधोपचार केले परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं शेवटीं
निराश होऊन शेवटचे उपाय म्हणून डा० कुन्हे यांचे प्रयोगास सुरवात
केली व त्यापासून जो गुण आला तो काय वर्णन करूं. प्रयोग केल्यानंतर
एक तासानें रोग्यास आराम वाटूं लागला. चार तासांनीं खाऊं लागला.
रात्रीं चांगली झोंप आली. दोन दिवसांत चांगलाच गुण आला.थोडीशी क-
सर राहिली तीही याच प्रयोगानें जाईल अशी रोग्याचीही खात्री जाहली.
चांगला दुरुस्त झाल्यानंतर मागाहून कळवीन.

दुसरा रोगी रा. वामन दासाप्पा दामोदरकर राहणार बिळगी वय २९
वर्षांचें याचा ५।१०।१९०० रोजीं कानाजवळ गाल सुजूं लागला. आमची
समजूत गालगुंड आहे अशी झाली; पण ६।१०।१९०० पासून अन्न गिळ-
ण्याची पंचाईत पडूं लागली. तिसरे दिवशीं तर पाणीही पिण्याची पंचाईत
पडली. आह्मीं त्यास आमचीं औषधें व होमिओपॉथी औषधें दिलीं; परंतु
कांहींएक गुण न आल्यामुळें रोग्याची आशा सुटली. नंतर अखेर डा. कुन्हे
यांचे प्रयोग केले. पहिल्याच प्रयोगानंतर चार तासांत अन्न खाऊं लागला.
रात्रीं झोंप येऊं लागली. याप्रमाणें तीन दिवसांचे प्रयोगानें रोगी रोगमुक्त
होऊन हल्लीं त्याची प्रकृति फारच उत्तम आहे.

अशाचप्रकारें पूर्वींही मजला या प्रयोगाची माहिती असल्यामुळें मी सन १८८० सालीं एका बाईवर प्रयोग केला होता, त्याची हकीकत येणेंप्रमाणें:- ती बाई वय वर्षें २५ ची त्यावेळीं होती. ती आठ महिन्यांची गरोदर असतां तिचें सर्वांग सुजलें. व आजउद्यां मरणार असें सर्वांनीं निदान केलें. औषधोपचारापासून कांहीं उपयोगी झाला नाहीं. अखेर आह्मीं डा. कुन्हे यांनीं उपयोगांत आणलेल्या प्रयोगाचाच तिच्यावर प्रयोग केला. प्रयोग सुरूं केल्यावर दुसरे दिवशीं तिचे जननेंद्रियावर लिंबायेवढे फोड उठले परंतु तिसरे दिवशीं ते फोड फुटून ती दुरुस्त होत चालली व थोडक्यांच दिवसांत तिची प्रकृति चांगली जाहली व आह्मांसही त्याबद्दल चांगलें बक्षीस मिळालें. ती बाई हल्लीं हयात आहे

असो. याप्रमाणें माझी अशी समजूत आहे कीं, कोणत्याही रोगावर या डा० कुन्हे यांचें प्रयोगासारखे दुसरे कोणतेहीं रामबाणप्रयोग नाहींत. तेव्हां सर्व लोकांस या प्रयोगाबद्दल माहिती आपण द्याल अशी आशा आहे. ”
कळावें लोभ असावा हे विनंती.

बिळगी — रामकृष्ण पांडूरंग
जिल्हा उत्तरकानडा — राजवैद्य.

### नंबर ८९ मुळव्याध, अपचन, अशक्तता.

रा. रा. अपाजी विनायक जोशी यांस.

सा. न. वि. वि. मजला २५ वर्षें मुळव्याध होती व मुतखडाही झाला. डाक्टराकडून आपरेशन करविलें, परंतु कांहीं उपयोग झाला नाहीं मुळव्याध फिरून उमटे, मुतखड्याच्या ऐवजी सिस्टिटीज रोग झाला. अन्न जात नसे, नेहमी पथ्यावर राहवे लागत असे. कधीं कधीं लघवी बंद होत असे सळईचा रोज तीनवेळ उपयोग करून मूत्र काढावें लागत असे. मैल दोन मैल मिनतवारीनें चालवत असे. दूध सोसत नसे. हल्लीं आपण सांगितल्याप्रमाणें बाष्पस्नान, व पाण्यांत बसण्याचा क्रम १।१०।१९०० पासून तीन महिने सारखा चालू ठेविला, त्यापासून मुळव्याध मुळींच उमठली

नाहीं. लघवीचा आजार पुष्कळ कमी होत चालला आहे. दोन शेर पर्यंत दूध पचतें पूर्वीं शौचास एरंडेल किंवा बस्तीवांचून होत नसे परंतु आतां दोन वेळ शौचास साफ होतें सात कोस चाललें असतां थकवा वाटत नाहीं एकंदरींत हे प्रयोग फार चांगले आहेत परंतु अभरंवशानें क्रम सोडतां कामानये. मजला ५० सावें वर्ष असून डोळ्यांनीं जास्त दिसूं लागलें. दिव्याजवळ मुळींच वाचतां येत नसे. तें आतां ( उत्तम नाहीं ) वाचूं लागलों. पुढें आणखी जसा प्रकार होईल तसा कळवीन कळावें हे विनंती.

**शेडाणी** **रामचंद्र गणेश भागवत.**

४।१।१९०१ माजी सुपरवाइझर प. व. खातें.

**नंबर. ९० प्लेग.**

श्रीमंत रा. रा. आपाजी विनायक जोशी यांस—

सा० न. वि. वि. आपण सांगितल्यापासून आह्मांस किंवा आमचे कुटुंबांतील कोणाही मनुष्यास कांहीं आजार जाहला असतां आह्मी डा० कुन्हे यांचे प्रयोग करीत असतो. त्या प्रयोगांनीं आह्मास आजपर्यंत नेहमी गुण आले. शिवाय आमचे शेतांत आमचा गडी धोंडी यास २९।९।१९०० रोजी प्लेग जाहला होता. ताप व मांडीचे सांध्यांत गांठ आली होती. त्यास ओटी पोटावर व गांठीवर मातीच्या पट्ट्या लावीत असत त्यायोगानें तो नेहमी शुध्धीवर असे व सहा दिवसांत तो चांगला होऊन हिंडू फिरूं लागला. पुढें त्याचा मुलगा व बायको प्लेगनें अजारी झाली. त्यांनाही तसेच उपचार सुरूं होते. मुलगा तीन दिवसांत बरा जाहला. व बायकोसही नऊ दिवसांत आराम वाटला. हल्लीं तीं गरीब मनुष्यें आपले मोठे उपकार मानीत आहेत व आनंदांत आहेत. असो याप्रमाणें जसा अवांतर रोगांवर डा. कुन्हे यांच्या प्रयोगाचा उपयोग होतो तसा प्लेगासारख्या रोगावरही त्यांच्या प्रयोगापासून गुण येतो अशी माझी खात्री आहे.

पुणें, पेठ नारायण, ता० ९।१।१९०१. **नारायण रामचंद्र ठाकूर.**



आकृति १४.



आकृति १५.
पंधरा वर्षांच्या मुलाची)



आकृति १६
(तेरा वर्षांच्या मुलाची.)



आकृति १९.

(तेरा वर्षांच्या मुलाचा हात अ० १८ मधील.)



आकृति २०.

(पंधरा वर्षांच्या मुलाचा पाय अ० १५ मधील.)



आकृति २१.

(तेरावर्षांचे मुलाचा पाय आ० १६ मधील.)

( मुखपरीक्षा
शास्त्राचीं कांहीं उदाहरणें दाखविण्याकरितां )



आकृति २३.
( विजातीय द्रव्य पुढें आलेलें )



आकृति २४

केवळ पाठीमागचें विजातीयद्रव्य

